सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ३१ वें

# जीवन आणि साहित्य

( स्फुट लेखांचा संग्रह )



लेखक

आचार्य स. ज. भागवत



प्रथमावृत्ति १९४४ ] [ मूल्य २॥ रुपये

## आमचें प्रकाशन

* १, २ **सत्याचे प्रयोग** (खंड १ तृतीयावृत्ति, खंड २ द्वितीयावृत्ति) लेखक : म. गांधी। २–८–०

* ३ **खादी-मीमांसा** (सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति) लेखक : वालुभाई मेहता २–०–०

४ **स्वराज्य-शिष्टाई** (शिल्लक नाहीं) . म. गांधी ०–६–०

५ **संयम कीं स्वैराचार?** (द्वितीयावृत्ति) म. गांधी १–८–०

६ **हिंडलग्याचा प्रसाद** : लेखक : काका कालेलकर (शिल्लक नाहीं) ०–९–०

* ७ **हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना** : लेखक : एस्. राधाकृष्णन् १–४–०

* ८ **उपनिषदांतील दहा गोष्टी** (तृतीयावृत्ति) लेखक : शंकरराव देव ०-१२-०

* ९ **विद्यार्थी-जीवन** (द्वितीयावृत्ति) लेखक : श्री. स. महाजन ०–८–०

* १० **फिलिफाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास** : लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर १–४–०

११ **काँग्रेसचा इतिहास** (द्वितीयावृत्ति) लेखक : डॉ. पट्टाभि सीतारामय्या २–८–०

१२ **समाजवादच कां?** (द्वितीयावृत्ति) : लेखक : जयप्रकाश नारायण १–८–०

१३ **खानबंधूंचा अल्प परिचय** : लेखक : महादेवभाई देसाई ०–९–०

१४ **जवाहरलाल नेहरू** (आत्मचरित्र) : अनुवादक : ना. ग. गोरे (शिल्लक नाहीं) ५–०–०

* १५ **विश्राम** (तृतीयावृत्ति) : साने गुरुजी १–०–०

* १६ **भारतीय संस्कृति** (तृतीयावृत्ति) : साने गुरुजी २–४–०

१७ **प्रसाद-दीक्षा** : म. गांधी १–०–०

| | | |
|---|---|---|
| | १८ **भिल्ल साधु गुलामहाराज :** | |
| | लेखक : शं. वि. ठकार ( शिल्लक नाहीं ) | ०-६-० |
| * | १९ **आधुनिक भारत** : शं. द. जावडेकर | १-०-० |
| * | २० **हिमालयांतील प्रवास** ( द्वितीयावृत्ति ) : | |
| | लेखक : काका कालेलकर | १-१२-० |
| | २१ **गांधीजींचें विविध दर्शन** ( द्वितीयावृत्ति ) : | |
| | संकलनकार : एस. राधाकृष्णन् | २-४-० |
| * | २२ **जिवंत व्रतोत्सव** : काका कालेलकर | १-१२-० |
| | २३ **गांधीविचारदोहन** : किशोरलाल मश्रूवाला | १-४-० |
| | २४ **सत्याग्रही महाराष्ट्र** : प्रेमा कंटक | ३-०-० |
| * | २५ **अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?** ( द्वितीयावृत्ति ) : | |
| | लेखक : जॉन रस्किन, अनुवादक : शं. द. जावडेकर | २-०-० |
| * | २६ **जीवन-दर्शन** ( द्वितीयावृत्ति ) : खलिल जिब्रान | |
| | अनुवादक : र. ग. जोशी | २-०-० |
| | २७ **ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र** : जगदीशचंद्र कुमारअप्पा | |
| | अनुवादक : बाळुभाई मेहता | १-४-० |
| | २८ **बापू** : घनश्यामदास बिडला | |
| | अनुवादक : जोशी-तारकुंडे | १-८-० |
| | २९ **संस्कृतीचें भवितव्य** : एस्. राधाकृष्णन् | |
| | अनुवादक : साने गुरुजी | १-०-० |
| | ३० **महात्मा गौतम बुद्ध** : एस्. राधाकृष्णन | |
| | अनुवादक : साने गुरुजी | १-०-० |
| | ३१ **जीवन आणि साहित्य** : आचार्य भागवत | २-८-० |
| | ३२ **प्राचीन साहित्य** : रवीन्द्रनाथ ठाकुर | |
| | अनुवादक : प्रो. रा. ब. आठवले | १-८-० |

---

* हीं पुस्तकें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील सरकारी विद्याखात्यांनी शाळांतील वाचनालयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर केलीं आहेत.

# निवेदन

प्रस्तुत पुस्तकांत १९३५ ते १९४१ पर्यंत वेळोवेळीं लिहिलेल्या लेखांचा संग्रह करण्यांत आला आहे. 'रवीन्द्र-दर्शन' आणि 'नन्दलाल बसु' यांचे मूळ बंगाली लेख माझे मित्र श्री. गोवर्धन मपारा, एम. ए (कलकत्ता) याचेकडून मिळाले. श्री. मपारा हे शांतिनिकेतनचे विद्यार्थी असल्यामुळें अनुवादाचे कामी त्यांच्या विचारविनिमयाचा मला झालेला लाभ येथें कृतज्ञतापूर्वक नमूद केला पाहिजे. 'रंजन' रहस्य हा लेख आपटे गुरुजींच्या 'कुटुंब-रंजना' ची प्रस्तावना म्हणून प्रकटलेला आहे. 'जीवन आणि रंगभूमि' हा नागपूर येथील नाट्यसम्मेलनांत दिलेल्या व्याख्यानाचा सारांश आहे. 'एक आदर्श जीवन' हा नाना काणे यांच्या चरित्र-ग्रंथांत आठवण म्हणून प्रकट झाला आहे. 'आकाशातील फुलें व पृथ्वीवरील तारे' व 'गांधीजींचें पहिलें दर्शन' हे लेख 'कृपालानींना लेखो' यांतून अनुवादिले आहेत. 'उद्यांची संस्कृति' व 'ध्येयवादी जीवन' हीं १९३६ व ३७ साली पुण्याच्या 'वसंत व्याख्यानमाले' त दिलेली व्याख्यानें होत. हे बहुतेक लेख श्री. ग. गं. जांभेकर यांचें 'लोकशिक्षण' आणि 'लोकशक्ति' इत्यादि नियतकालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले आहेत.

या लेखांतून जीवन आणि साहित्यविषयक माझे बरेच विचार प्रकट झालेले आहेत. यांत सर्व प्रश्नांची सांगोपांग चर्चा सहजच आलेली नाहीं. तथापि, माझ्या विचारांची स्थूल कल्पना येण्यास हा संग्रह उपयोगीं पडेल अशी मला आशा आहे. सर्वांगपूर्ण ग्रंथाची निर्मिति होईपर्यंत थांबण्यापेक्षां स्फुटलेखांचा संग्रह प्रसिद्ध करणें बरें असें वाटल्यावरून मी हें धाडस करीत आहें. महाराष्ट्रीय वाचकांना याचा थोडाफार उपयोग झाल्यास मला समाधान वाटेल.

— स. ज. भागवत

# अ नु क्र म

---

# रवीन्द्र-दर्शन

[ १९३१ च्या डिसेंबरमध्यें कलकत्ता येथें कविसम्राट रवींद्रनाथ ठाकुर यांच्या सत्तराव्या वाढदिवसानिमित्त त्याचा मोठा सत्कारसमारंभ करण्यांत आला. त्या समयी त्यांनी उत्तरार्थ केलेले भाषण.]

ज्या जगांत मी प्रथम नेत्र उघडिले तें अगदींच एकाकी असें होते. नगराबाहेरील उपनगराप्रमाणेंच तेथील आकाश चोहींकडून शेजाऱ्यांच्या घरादारांनी आपल्या कोलाहलाने जखडून टाकलेले नव्हतें.

आमच्या घराण्याची नौका माझ्या जन्मापूर्वीच समाजाचा नागर उचलून दूर पक्क्या घाटाच्या बाहेर येऊन लागली होती. आचारविधि क्रियाकर्में ही त्या ठिकाणी सगळींच विरल असत.

आमचें घर म्हणजे जुन्या काळचा एक प्रचंड वाडा होता. त्यात कांहीं मोडक्या ढाली, भाले आणि गंजलेल्या तरवारी टांगून ठेविलेली देवडी, देवाचे दालन, तीनचार सोपे, आतबाहेरच्या बागा, आणि वर्षाचें गंगा-जळ साठवून ठेवण्याच्या मोठमोठया कळशा रचून ठेविलेली काळोखी खोली इत्यादि भाग होते. त्यांमधून जुन्या काळच्या नानातऱ्हेच्या उत्सव समारंभांची वाजत गाजत थाटमाटानें एके काळीं हालचाल होत असे, मला त्याची आता आठवणहि उरली नाहीं. मी आलों त्यावेळीं पुरातन कालाने या घराचा नुकता निरोप घेतला होता. नूतन काल नुकताच कोठ येऊन उतरला होता, त्याचे सामानसुमान अद्यापि आलें नव्हतें.

परंपरागत सामाजिक जीवनाचा प्रवाह जसा या घरापासून दूर गेला होता, त्याप्रमाणेंच जुन्या काळच्या संपत्तीच्या प्रवाहालाहि ओहटी लागली होती. या ठिकाणीं एकेकाळीं पितामहांची ऐश्वर्यदीपावली नानाज्योतींनी

प्रदीप्त झाली होती. पण यावेळीं मात्र जळून गेलेल्या दिव्यांचे काळे डाग, राख आणि जेमतेम थरथरणारी एक क्षीण ज्योत एवढेंच बाकी राहिलें होतें. वैभवशाली जुन्या काळाच्या सुखविलासाचे सरंजाम कोनाकोपऱ्यांत धुळींत जीर्ण रूपानें थोडेबहुत शिल्लक उरले असले तरी त्याला कांहींच अर्थ नव्हता. श्रीमंतीमध्यें माझा जन्म झाला नव्हताच, पण श्रीमंतीच्या स्मृतीमध्येंहि तो झाला नव्हता.

या एकीकडच्या जागीं या कुटुंबांत जें स्वातंत्र्य निर्माण झालें तें मोठया देशापासून दूर असलेल्या तुटक बेटावरील झाडझुडुप, जीवजन्तु यांच्या स्वातंत्र्याप्रमाणें स्वाभाविक होतें. यामुळे आमच्या बोलण्यांत एक प्रकारची लकब असे. तिला उद्देशून कलकत्त्यांतील लोक "ही ठाकुर घराण्याची भाषा," असें म्हणत. स्त्री-पुरुषांच्या वेषभूषेंत आणि चालचलणुकींतहि तसेंच असे.

त्यावेळी शिक्षित समाजानें बंगाली भाषेला घरांतील अंतःपुरांत ढकलून दिलें होतें. बाहेर पत्रव्यवहार, लिहिणेंवाचणें, इतकेंच काय पण संभाषण-सुध्दां सर्व व्यवहार इंग्रजींत चालत असे. आमच्या घरांत ही विकृति घडूं शकली नव्हती. तेथें बंगाली भाषेविषयी उत्कट प्रेम होतें. तिचा उपयोग सर्व व्यवहारांत होत असे.

आमच्या घरांत आणखी एका गोष्टीचा समावेश होता, तिचा उल्लेख करण्यासारखा आहे. उपनिषदांच्या द्वारा प्राक्पौराणिक युगातील भारताशीं या घराण्याचा घनिष्ठ संबंध होता. अगदीं बाळपणीं, बहुधा दररोज, मी उपनिषदांच्या श्लोकांची शुध्द उच्चारांत अखंड आवृत्ति करीत असे. यावरून समजून येईल कीं, साधारणतः बंगालमध्यें धर्म-साधनेंत जो उद्दाम भावावेग आढळतो त्याचा आमच्या घरांत प्रवेश झाला नव्हता. पितृदेवानी प्रवर्तित केलेली उपासना शांतसमाहित होती.

हें जसें एका बाजूला, तसेंच दुसऱ्या बाजूला आमच्या वडील मंडळींत इंग्रजी साहित्याचा आनंद भरून राहिला होता. त्यावेळीं घरांतील वाता-वरण शेक्सपियरच्या नाटयरसाच्या आस्वादानें आंदोलित झालेलें असे. सर वॉल्टर स्कॉट याचा प्रभावहि प्रबल होता. देशप्रीतीचा उन्माद त्यावेळीं देशांत कोठेहि नव्हता. रंगलालच्या "स्वाधीनताहीनताय के बाँचिते

चायरे" या व त्यानंतर हेमचन्द्राच्या "विंशति कोटि मानेवर वास" या कवितेंतील देशाला मुक्त करण्याच्या कामनेचे सूर पहाटच्या मधुर शब्दांप्रमाणें ऐकूं येत असत. हिंदुमेळयाचा विचार आणि त्याची तयारी करण्याच्या कामीं आमच्या घरातील सर्व मंडळीना तेव्हां मोठा उत्साह वाटत असे. नवगोपाळ मित्र हे त्याचे प्रधान कार्यकर्ते होते. मधल्या दादाने लिहिलेलें "जय भारतेर जय," गणदादानें लिहिलेलें "लज्जाय भारत–यश गाईब की करे," बडया दादाचें "मलिन मुखचंद्रमा भारत तोमारि," ही या मेळ्याची गाणी होतीं. ज्योतिदादानें एक गुप्त सभा स्थापन केली होती. तिची बैठक एका पडक्या घरांत होई. ऋग्वेदाची पोथी, मृताच्या डोक्याची कवटी व नागवी तरवार यांच्या द्वारा तिचें अनुष्ठान चाले. राजनारायण बसु तिचे पुरोहित होते. त्या ठिकाणीं आम्हांला भारतोध्दाराची दीक्षा मिळाली.

या सर्व आकांक्षा, उत्साह, उद्योग यांच्या हालचालींत थोडीसुद्धा गर्दी नसे. शांत अवसरामधून त्यांच्या प्रभावानें आमच्या अंत:करणांत हळूहळू प्रवेश केला. सरकारचे पोलीस लोक त्यावेळीं फारसे जागरूक नसत. किंबहुना ते उदासीनच असत. सभेतील सभासदांचीं टाळकी फोडण्याला अथवा सभेचा रसभंग करण्याला ते कधी आले नाहींत.

कलकत्ता शहराचें वक्ष तेव्हां दगडानें बांधलें नव्हतें, बहुतेक ठिकाणीं कच्चेंच होतें. गिरण्यांच्या धुरानें आकाशाचें मुख काळवंडलें नव्हतें. इमारती आणि मैदानें याच्यामधून असणाऱ्या तळयातील पाण्यावर सूर्याचे किरण चमकत. तिसऱ्या प्रहरीं वडाच्या लांब लांब सावल्या पडत. नारळीच्या पानाच्या झालरी वाऱ्यानें डोलत. बांधलेल्या पाटांतून गंगेचें पाणी आमच्या दक्षिणेकडच्या बागेतील तळयात झऱ्यासारखे पडत असे. मधूनमधून गल्लीतून पालखीच्या भोयांचे 'हॉइ हुंइ' शब्द आणि मोठ्या रस्त्यावरून घोडेवाल्यांची 'होइओ' अशी हांक कानी येई. संध्याकाळीं गोड्या तेलाचा दिवा लावला जाई. त्याच्या मंद प्रकाशांत चटई पसरून म्हाताऱ्या दासीजवळ आम्ही रूपकथा (fairy tales) ऐकत बसूं. या निस्तब्धप्राय जगामध्यें मी एक कोपऱ्यांतील माणूस–लाजाळू, मूक, निश्चल असा होतों.

आणखी एका कारणामुळें मी विशोभित झालों होतों. मी शाळेंतून पळून गेलेला मुलगा. परीक्षा दिली नाही, पास झालों नाहीं. माझ्या भावी कालसंबंधीं माझे शिक्षक हताश झालेले. शाळागृहाच्या बाहेरचा जो आनिर्बंध अवसर त्यांत माझें मन भटक्या लोकांप्रमाणें संचार करीत असे.

याच सुमारास लोक ज्याला कविता म्हणतात, ती छंदोबद्द, यमकयुक्त पद्यें साध्या लेखणीनेच सर्वसाधारण लोक लिहितात, असा एकाएकी मला खात्रीपूर्वक शोध लागला. ते दिवसहि असे होते की, ज्यांना पद्यें रचिता येत त्यांना पाहून लोक विस्मित होत. सध्यां ज्यांना पद्यें रचितां येत नाहीत तेच विलक्षण म्हणून समजले जातात. 'पयार' 'त्रिपदी' इत्यादि छंदांच्या अंतःपुरांत आपला अनिर्बंध अधिकार आहे, या जाणिवेच्या अक्लांत उत्साहाने मी लिहिण्यांत मस्त होऊन गेलों. अष्टाक्षरी षडक्षरी, दशाक्षरी पद्यामधून विविधप्रकारें शब्दांचे विभाग करून घराच्या कोपऱ्यांत माझा छंदाच्या घडामोडीचा खेळ चालू झाला. होतां होता तो दहाजणांच्या पुढें प्रकट झाला.

हे लिखाण कसेंहि असले तरी त्याच्या मागे एक भूमिका आहे. ती म्हणजे कोपऱ्यांत बसून रहाणाऱ्या, एकाकी, वाळींत पडल्यासारख्या, आपल्याच मनाशीं खेळणाऱ्या बालकाची. तो बालक सामाजिक शासनांच्या अतीत, शिस्तीच्या पलीकडे असलेला असा होता. गृहशासनसुद्धां त्याला कमीच होतें. पितृदेव हिमालयांत असत. घरांत वडील बंधु कर्तेसवरते होते. ज्योतिदादांना मी सर्वाहून अधिक मानीत असें. त्यांनी मजवर बाहेरून कोणतेंच बंधन लादले नाही. मी त्याच्याशी वादविवाद करीत असें. नाना विषयांवर बरोबरीच्या नात्यानें चर्चा करीत असे. बालकांचाहि आदर करावा, हें त्यांना ठाऊक होते. माझ्या मानसिक स्वातंत्र्याच्या द्वारेंच त्यानी माझ्या मनोविकासाला साह्य केलें. त्यांनीं मजवर दरारा गाजविण्याच्या आग्रहानें जर कठोरपणा दाखविला असता, तर मारूनमुटकून वांकडातिकडा कसा तरी मी बनलों असतों. कदाचित् प्रतिष्ठित समाजाला त्यामुळें संतोषहि झाला असता. पण माझ्यासारखा मात्र मी कदापि झालो नसतों.

माझ्या मोडक्या छंदांतील त्रुटित कवितांची माला उल्कावृष्टीप्रमाणें चालू

झाली. तीत बालकाचे बरेवाईट भाव शिथिलपणें, अर्धेकच्चे ग्रथित केलेले असत. रीतिभंगाची ही प्रवृत्ति या जगावेगळ्या बालकाची स्वभावसिद्धच होती. यांत यथेच्छ आपत्तींची भीति होती. पण येथेंहि मी अपघातांपासून बचावलो. कारण, त्यावेळी माझ्या सुदैवाने वंगसाहित्यांत कीर्तीच्या बाजारीं फार गर्दी जमली नव्हती. स्पर्धेचा उन्माद प्रखर झाला नव्हता. टीकाकारांच्या दंडाचा, अप्रशंसेचा आप्रिय आघात कोसळे, पण कटूक्ति आणि कुत्सा यांच्या उन्मादाला त्या वेळेस साहित्यांत दाहकता आलेली नव्हती.

त्यावेळच्या अल्पसंख्याक साहित्यिकांमध्ये मी वयानें सर्वांहून लहान व शिक्षणाने सर्वांहून अपरिपक्व होतों. माझ्या छंदांना लगाम नसे, लिहिण्याचे विषय अस्फुट उक्तींमुळे अस्पष्ट असत. भाषा आणि भाव यांची अपरिणति पदोपदीं दिसून येई. त्या वेळच्या साहित्यिकांनीं आपल्या बोलण्यानें वा लिहिण्याने बहुधा मला उत्तेजन दिले नाहीं. माझ्या अर्ध्याकच्च्या लिहिण्याला ते थोडबहुत हसत असत. पण तें कांहीं निंदकाचे हास्य नसे. केवळ दोष काढण्याच्या व्यवसांयातला तो भाग नव्हता. त्यांच्या लिहिण्यांत शासन असे. असौजन्य लेशमात्र नसे. जेथें विमुखता प्रकट होई तेथेंहि विद्वेष दिसत नसे. म्हणून उत्तेजनाचा अभाव असतांहि रूढ पद्धतीच्या विरुद्ध रीतीने मी आपले लिखाण आपल्या इच्छेप्रमाणें निर्माण करूं लागलों.

त्या वेळचा तो ख्यातिहीनतेचा स्निग्ध प्रथम प्रहर निघून गेला. निसर्गाची शुश्रूषा आणि स्वजनांचा स्नेह यांच्या दाट छायेखालीं मी बसलों होतो. केव्हां केव्हां तिसऱ्या मजल्याच्या गच्चीवर एका बाजूला रिकामपणाच्या वेळीं आपल्याशींच आकाश–कुसुमांची माळ ओंवीत, तर केव्हां केव्हां गाजीपूरच्या जुनाट निंबवृक्षाखाली बसून विहिरीच्या पाण्याने बागेचें शिंपणें चालें त्याचा करुण ध्वनि ऐकतां ऐकतां आपली कल्पनानौका अहेतुक वेदनेने भरून तिला समीपच्या गंगाप्रवाहांत दूर सोडून देत, मी आपला काळ घालवीत असें. स्वतःच्या मनांतील छाया–प्रकाशांतून अकस्मात् दुसऱ्यांच्या मनाच्या कोपरखळ्या खाण्यासाठी हमरस्त्यावर यावें लागेल, ही गोष्ठ तेव्हां मनांतहि आली नाहीं. शेवटीं एक दिवस कीर्तीने येऊन मध्यान्हीच्या उघड्या उन्हांत मला ओढून

बाहेर काढलें. तो ताप हळूहळू वाढूं लागला. माझा कोपऱ्यांतील आधार एकाएकी मोडून गेला. कीर्तीच्या बरोबरच जी अवमानाची ग्लानि येते, तिने माझ्या दैवानें इतरांपेक्षां फारच मलिन रूप धारण केलें. इतका अन-वरत, इतका अकुंठित, इतका अकरुण, इतका अप्रतिहत असम्मान माझ्याप्रमाणें दुसऱ्या कोणाहि साहित्यकाला सहन करावा लागला नसेल. हाच माझ्या कीर्तीचें माप करण्याचा मानदंड. मला सांगण्यास आनंद वाटतो की, दैवाने प्रतिकूल टीकेने मला लांछित केलें असलें, तरी परा-भवाच्या दीनतेने लज्जित केलें नाही. शिवाय माझ्या दुष्ट ग्रहानी हा जो काळ्या रंगाचा पडदा सोडला आहे त्याच्यावर माझ्या स्नेह्यांची सुप्रसन्न मुखें समुज्ज्वल दिसत आहेत. त्याची संख्या काही थोडी नाही. ह्या गोष्टीची या समारंभप्रसंगी मला जाणीव आहे. ह्यापैकी काही स्नेह्याना मी ओळखितों, पण पुष्कळाना मी ओळखीत नाहीं. ते सर्व, कांही जव-ळून काही लांबून या उत्सवांत अंशभाक् झाले आहेत, या उत्साहाने माझें मन आनंदित झालें आहे. आज ते मला नौकेवर बसवून देण्यासाठी घाटावर येऊन उभे राहिले आहेत. त्यांचा मंगल ध्वनि कानी घेऊन माझी जीवननौका द्युलोकीच्या परतीराकडे प्रयाण करील.

माझी कर्मपथाची यात्रा सत्तराव्या वर्षाच्या गोरजसमयीं उपसंहारा-जवळ येऊन पोहोंचली आहे. प्रकाश म्लान होण्याच्या शेवटच्या क्षणीं या जयन्तीसमारंभाच्या द्वारा देश माझ्या दीर्घ जीवनाच्या मूल्याचा स्वीकार करीत आहे.

पीक जोंपावेतों शेतात असतें तोंपावेतों संशय वाटत असतो. बुद्धिमान् सावकार शेताकडे पाहून बयाणा देतांना कचरतो. बरेच हातचें राखून ठेवतो. कोठारांत धान्य येऊन पडलें म्हणजे वजनमाप करून त्याचें निश्चित मोल होऊं शकतें. आज माझ्या जीवनांतील पिकाचा शेवटचा हिशेब चुकता करण्याचा दिवस आला आहे असें मला वाटतें.

मनुष्य दीर्घकाल वाचला कीं तो भूतकालांत जमा होतो. माझा जुना वर्तमानकाळ हा सध्याच्या वर्तमानकाळाहून बराच भिन्न आहे हें मी जाणतों. आपली जीवनयात्रा संपवून लोकान्तरीं गेलेल्या सर्व कवींच्या अंगणाशेजारीं तिरोभावाच्या अगदी पूर्वसीमेवर मी येऊन उभा राहिलों

आहे. वर्तमानाच्या धांवत्या रथाच्या वेगामुळें एखाद्याला निरखून पाहणें कठीणच असतें. माझ्या बाबतींत तर ती वेळहि आतां निघून गेली आहे. कल्पनेच्या कॅमेऱ्याने मनुष्याचें समग्र जीवनचित्र घेण्यासाठीं जितकें दूर जावें लागतें तितका मी आधुनिकापुढून दूर गेलों आहे.

पन्नाशीनंतर मनूने वानप्रस्थ्य सांगितलें आहे. त्याचें कारण, मनूच्या हिशेबानें पन्नाशीच्या पुढें मनुष्य वर्तमानाच्या मागे पडतो. त्यावेळीं कंबर बांधून, धांवणाऱ्या कालासंगें सारख्या वेगानें पावलें टाकीत धांवण्यानें जेवढा थकवा येतो तेवढी सफलता येत नाहीं, जितकी झीज होते तितकी भर होत नाहीं. यासाठीं तेव्हांपासून स्वतः–प्रवृत्त होऊन जेथें सर्व कालप्रवाहांचें मीलन होतें–जेथे काल स्तब्ध होतो–त्या स्थानाकडे यात्रा करण्यास मनुष्याने निघालें पाहिजे. गतीची साधना संपवून तेव्हां स्थितीची साधना चालू केली पाहिजे.

मनूने जो काल ठरवून दिला आहे तो आताच्या काळीं घडयाळाप्रमाणें साधणें प्रायः असाध्य आहे. मनूच्या काळीं जीवनांत इतक्या जबाबदाऱ्या खचित नव्हत्या. त्यांत गुंतागुंतहि कमी होती. सध्या शिक्षण म्हणा, उद्योग म्हणा, इतकेंच काय पण आनंद–उत्सव, क्रीडा–करमणुकी या साऱ्या गोष्टी व्यापक झाल्या आहेत. त्यावेळच्या सम्राटाचा रथ कितीहि प्रचंड असला तरी आजच्या आगगाडीप्रमाणें त्यांत पुष्कळ डब्यांचा द्वंद्वसमास नव्हता. या गाडींतला माल उपसण्याला बराच वेळ लागतो. पांच वाजता कचेरीला सुट्टी हें शास्त्रनिर्दिष्ट खरें. पण कागदपत्रें मिटून, दीर्घ निःश्वास सोडून घराकडे निघण्यापूर्वीच दिवे लागतात. आमची तीच स्थिति आहे. म्हणून पन्नाशीची मुदत वाढवून घेतल्याविना सुटी मिळणें शक्य नाहीं. पण सत्तरीच्या घरांत आल्यावर आतां उगाच निमित्त सांगून चालावयाचें नाहीं. बाहेरच्या लक्षणांवरून काळ मला सोडून चालला आहे, हें मला दिसत आहे, कमींत कमी म्हटलें तरी निदान दहा वर्षांच्या पूर्वीच्या तारखेवर मी बसून राहिलों आहें. दूरच्या नक्षत्राच्या प्रकाशाचें असेंच असते. तो प्रकाश दिसतो तेव्हांचा तो मूळचा असत नाही.

तरीपण अगदीं थांबण्यापूर्वी चालण्याच्या वेगामुळें भूतकालाचा वर्तमानकालाला लहानसा धक्का बसतोच. गाणें एकदा सगळें समेवर आलें

म्हणजे त्यांची समाप्ति झाली. तरी पालटून गाण्यासाठीं आणखी कांही काल विनवणी चालते. ती अतीताचीच पुनरावृत्ति. त्यानंतर फा तर एखाददुसरी तान घेऊन चालेल. पण थांबले म्हणून काहीं हा नाहीं. पुनरावृत्तीला दीर्घकाल ताजी राखण्याचा प्रयत्न आणि माशाल भुईवर काढल्यानंतर एखादा महिना जिवंत ठेवण्याचा प्रयत्न दोन्हीहि सारखेच.

कवीची माशाशी केलेली ही तुलना थोडी आणखी पुढे चालवित येईल. मासा जोंपर्यंत पाण्यांत आहे तोंपर्यंत त्याला थोडे थोडे खाद्य घालणें हें सत्कार्य आहे व माशाला स्वतःला त्याचें प्रयोजन आहे. पण त्याला भुईवर काढलें म्हणजे त्याचें स्वतःचे प्रयोजन उरत नाहीं. दुसऱ्या कोणा जीवाचें उरत असेल. त्याचप्रमाणे कवि जोंपर्यंत कांही एका स्प परिणतीला पोचला नाही, तोंपर्यंत त्याला थोडा उत्साह देता आल्यास चांगलेच. कवीला स्वतःला त्याचे प्रयोजन असते. त्यानंतर त्याची जेव्हा पूर्णतेमध्ये समाप्ति होते, तेव्हा त्याच्या बाबतींत जर कांहीं प्रयोजन उरत असेल तर तें त्याचें स्वतःचे नव्हें. तें त्याच्या देशाचें प्रयोजन होय.

देश ही मानवी सृष्टि होय. देश मृण्मय नसतो, तो चिन्मय असतो। माणसें जर प्रकाशमान असतील तरच देश प्रकाशित होईल. सुजला सुफला मलयजशीतला भूमीची कथा आपण जितक्या उच्च कंठाने घोषवूं तितके जबाबदारीचें ओझें वाढेल. नैसर्गिक संपत्ति ही केवळ उपादान–मात्र आहे तिच्या साह्यानें मानव संपत्ति किती निर्माण झाली असा प्रश्न उत्पन्न होईल. माणसाच्या हातून जर देशांतील जल सुकून जाईल, फळ मरून जाईल, मलयजवात जर मारक जंतूमुळें विषारी बनेल, सस्यभूमि जर वंध्य होईल, तर देशाची लाज काव्यकथेनें कांहीं झांकली जाणार नाहीं. देश कांहीं मातीनें निर्मिलेला नसतो, माणसानी त्याची निर्मिति केलेली असते

यासाठीं देश, स्वतःच्या अस्तित्वाचें प्रमाण म्हणून, जे कोणी एखाद्या साधनेमध्यें चरितार्थ झाले असतील अशा पुरुषांकडेच अहर्निश पाहत असतो. असे पुरुष नसले तरीसुद्धां झाडेंझुडुपें, जीवजंतु जन्मतात; पाऊस पडतो; नद्या वाहतात; पण देश वाळवंटाखालच्या भूमीप्रमाणें झाकलेला राहतो.

यामुळें ज्या साहित्यिकामध्ये आपल्याला भाषा लाभली असा देशाला अनुभव येईल त्याला सर्व लोकांसमक्ष "हा आपला आहे," असें दर्शविण्यासाठीं एखादें उपलक्षण निर्माण करण्याची देशाला इच्छा होते. अशा रीतीनें देश ज्या दिवशीं एखाद्या पुरुषाचा आनंदाने अंगीकार करितो, त्या दिवशीं पृथ्वीच्या मांडीवरून देशाच्या मांडीवर त्या पुरुषाचा जन्म होतो.

माझ्या जीवनाच्या समाप्तिदशेंतील या जयंतीसमारंभामध्यें काही सत्य असेल तर तें याच अर्थानें. माझा स्वीकार करण्यानें देशाला कोणत्याहि प्रकारचा लाभ होणार नसेल तर आजचा हा उत्सव अर्थहीन होईल. या म्हणण्यात अहंकार आहे. अशा आशंकेने जर माझ्यासाठी कोणी उद्विग्न होतील तर त्यांचा तो उद्वेग अनावश्यक आहे. ज्या कीर्तीचे भांडवल अल्प असतें तिचा थाटमाट जितका मोठा होईल तितके तिचें दिवाळें लवकर निघते. भूल दिसतांना मोठी दिसेते, पण जातांना अगदी क्षुद्र होऊन जाते. आतषबाजीचा अभ्रविदारक प्रकाश हाच तिच्या निर्वाणाचा उज्ज्वल तर्जनीसंकेत होय.

पुरस्काराच्या पात्राची निवड करण्यांत देशाची चूक होऊं शकेल यांत शंका नाही. साहित्याच्या इतिहासांत क्षणमुखर कीर्ति मूक बनल्याचें अनेकवार आढळलें आहे. म्हणून आजच्या या समारंभामुळें मी आजच अतिशय उत्साह न माननेला बरा, या उपदेशाविरुद्ध युक्तिवाद चालण्यासारखा नाही.पण त्याचप्रमाणें त्याविषयी आजच एकदम विषण्ण होण्याचेंहि कारण मला दिसत नाहीं. वेळोवेळीं साहित्यविचारांतील अभिरुचीची उलटापालट होते. अव्यवस्थित चित्ताच्या मंदगती कालाच्या अंतिम निर्णयानें माझ्या कपाळीं पुरी फसवणूक येणार असली तरी आतांच आगाऊ शोक करीत बसण्यासारखें त्यांत कांही नाही. आजच्यासारखा हा चालू समारंभ हाच नगद लाभ होय. यापुढे अंतिम जाब देण्यासाठीं नातू-पणतू आहेतच. सध्या आपण मित्रांसह आश्वस्तचित्तानें आनंद करू या. उलटपक्षी, ज्यांची इच्छा असेल त्यांनी आपल्या फूत्कारानें हे बुडबुडे फोडण्याच्या उत्साहांत आनंद मानावा. संसारांतील या दोन विरुद्ध भावांच्या कृष्णश्वेत आनंदप्रवाहांत यमकन्या यमुना आणि शिवजटानिःसृता गंगा मिळा-

लेल्या असतात.मयूर आपल्या पिसाऱ्याच्या गर्वानें नाचण्यांत संतुष्ट असतो, तर व्याध आपल्या लक्ष्यवेधाच्या गर्वानें त्याला गोळी घालण्यांत मोठा आनंद मानतो.

सध्या पाश्चात्य देशांत साहित्य व व कलासृष्टि यांमध्ये लोकांची अभि· रुचि वारंवार बदलत असल्याचे दिसून येतें. मनुष्याच्या यानावाहनांचा वेग वाढत चालला आहे. मनुष्याच्या मना–प्राणाला वेग एकसारखा धक्का देत आहे.

जेथे भौतिक प्रतिस्पर्धा उग्र तेथे या वेगाची महती अधिक. भाग्याच्या प्रसादाची लूट करण्यासाठी बाजारच्या गर्दींत धुळीमध्यें जेथें सर्व जगाची ओढाताण चालते, त्या ठिकाणी जो मनुष्य वेगाने जाऊं शकेल त्याचाच विजय. विरामहीन वेग हें तृप्तिहीन लोभाचें वाहन आहे. सगळी पश्चिम मद्यष्याप्रमाणें या लोभाने झिंगून गेली आहे. तेथे वेगवृद्धि ही लाभाचें उपलक्ष्य राहिली नसून स्वतःच लक्ष्य बनली आहे. वेगाचा लोभ आज जळीं, स्थळी, आकाशी भूतोन्मादाचा (hysteric) आक्रोश करीत धांवत सुटला आहे.

परंतु प्राण हा पदार्थ कांही बाष्पविद्युतादि भूतांनी झपाटलेलें लोखंडी एंजिन नव्हे. त्याला एक स्वतःचा छंद असतो. त्या छंदांत एकदोन मात्रांची ओढाताण खपेल, त्याहून अधिक चालणार नाही. कोलांट्या खात चालणें कांहीं थोडा वेळ साधेल. पण दहापांच मिनिटें जातात न जातात तोंच आढळून येईल कीं, मनुष्य म्हणजे कांही बायसिकलची चाकें नव्हत. पदातींची चाल त्याच्या पावलांच्या छन्दानुसार होते. गाण्याची लय जेव्हां कानाच्या सजीव छंदाला धरून चालते तेव्हां ती गोड लागते. तिला दुपटीवरून चौपटीवर नेल्यास ती कलादेह सोडून कौशल देहाचा स्वीकार करण्याला धापा टाकूं लागते. याहून कधिक तगादा वाढवाल तर रागिणी पागलखान्याच्या बाहेरच्या कवाडावर डोकें आपटून मरून जाईल! सजीव नेत्र हा कांही कॅमेरा नव्हे. नीटपणें पाहण्याला त्याला वेळ लागतो. ताशी वीसपंचवीस मैलांच्या दौडीने पाहणे म्हणजे त्याच्या दृष्टीनें धुके पाहणें होय. आपल्या देशांत एकदा तीर्थयात्रा म्हणून सजीव पदार्थ होता. त्यांत भ्रमणाचा पूर्ण स्वाद मिळत असल्यामुळे

तो सफळ होई. आगगाडीच्या अमलांत तीर्थ राहिले आहे, यात्रा उरली नाहीं. भ्रमण उरलें नाही, केवळ पोचणें राहिले आहे. शिक्षण वजा करून परिक्षा पास होणें ज्याला म्हणतात तशासारखेच हें आहे. रेल्वे कंपनीच्या कारखान्यांत यंत्रांत कोंबलेल्या तीर्थयात्रेच्या निरनिराळ्या किंमतीच्या गोळ्या तयार ठेविलेल्या असतात. त्या गिळल्या की झालें. परंतु काय झालें तें पाहण्याला सुद्धां फुरसत असत नाही. कालिदासाच्या यक्षाने मेघदूताला रजा देऊन विमानाला दूत म्हणून अलका नगरीला पाठविलें असतें, तर दोन सर्गांत भरून राहिलेला मंदाक्रान्ता' छंद चार-दोन श्लोक ओलांडून जातो तोच अपघाताने मरून जाता. यंत्रबद्ध विरह अद्यापि बाजारांत आला नाही.

मेघदूतातील त्या शोकावह परिणतीविषयीं ज्यांना शोक वाटणार नाही असे बलवान पुरुष आजकाल दृष्टीस पडतात. कोणीकोणी म्हणतात की, सध्या कवितेचा आवाज ऐकूं येतो ती शेवटची घरघर आहे. तिची घटिका भरली आहे हें जर सत्य असेल, तर ते कांही कवितेच्या दोषामुळे नव्हे. तो कालाचा दोष होय. मनुष्याचा प्राण नित्याचा छंदोबद्ध आहे. परंतु त्याचा काल सध्या यंत्राच्या जाचामुळे भग्नच्छंद झाला आहे.

द्राक्षाच्या मळ्यांत शेतकरी काठी पुरून देतो. त्यावर द्राक्षाचे वेल चढून अश्रय घेतात, त्यांना फळें लागतात. त्याचप्रमाणें जीवनयात्रेला सबल आणि सफल करण्यासाठी कांहीं रीतिनीति बांधून द्याव्या लागतात. यांपैकीं कित्येक रीतिनीति निर्जीव, नीरस उपदेश-अनुशासनाचे केव खुंट असतात. परंतु कुंपणाला लावलेला खुंट जसा पाणी मिळतांच जिवंत होतो, त्याप्रमाणें जीवनयात्रा जेव्हां प्राणाच्या छंदामध्यें शांत गतीनें चालते तेव्हां या वाळलेल्या खुंटांना अंतःकरणांत खोलवर जाण्याची संधि मिळते आणि ते हळूहळू जिवंत होतात. त्या अंतर्भागांतच संजीवनरस असतो. त्याच रसानें तत्त्व आणि नीति यांच्यासारखे पदार्थसुद्धां हृदयाची द्रव्यसामग्री बनून सजीव आणि सज्जित होतात. मनुष्याचा आनंदाचा रंग त्यांना लागतो. या आनंदाच्या प्रकाशांत चिरंतनता असते. एका काळच्या नीतीचें दुसऱ्या काळीं आपणाला ग्रहण नाहीं करतां येणार कदाचित्. पण त्या नीतीनें ज्या सौंदर्याला आनंदाच्या सत्यभाषेंत प्रकाशित

केले असेल, ती प्रीति, तें सौंदर्य आपणांला नित्यनूतनच असेल. आजहि मोगल साम्राज्याचें शिल्प ताजे आहे. तें साम्राज्य व त्या साम्राज्याची नीति आपणाला पसंत असो वा नसो.

पण सर्वच गरजांच्या आक्रमणाखाली अवसर अगदी ठेचून भरल्यामुळें जें युग कठीण बनून जातें तें उपयुक्ततेचें युग होय तें युग प्रीतीचें नव्हे-प्रीतीला गभीर होण्यास वेळ लागतो. हल्लीच्या या त्वराताडित युगांत प्रयोजनाचे तगादे 'कचुरी'*च्या पानाप्रमाणे साहित्याच्या प्रवाहांतहि पुष्कळ घुसले आहेत. ते कांहीं कायमची वसति करण्यासाठी येत नाहींत. "आमच्या समस्येचें समाधान करा," असा अर्ज हातीं घेऊन ते दारि धरणें धरून बसतात तो अर्ज कितीहि अलंकृत असला तरी तें शुद्ध साहित्य नव्हे, तो अर्जच. त्याची मागणी पुरी झाली की त्याचे अंतर्धान झालें.

अशा स्थितीत साहित्याची हवा घटकोघटकीं बदलते. कोठेहि त्याचे हृदय गुंतून राहत नाही. मागच्याला लाथ मारूनच तें पुढें निघतें. ज्याला त्यानें स्वतःच वैभवाला चढविलें असेल त्याची धूळदाण करून ते वर पुनः विकट हास्य करितें. आपल्या स्त्रियांच्या मोठ्या किनारीच्या साड्या, त्यांच्या नीलांबरी, त्यांच्या बनारसी रेशमी साड्या यांत एकंदरीने पाहता आजपर्यंत बदल झाला नाहीं. कारण त्या आपल्या अंतःकरणांतील अनुरागाला चिकटून राहिल्या आहेत. त्यांच्याकडे पाहून आपल्या डोळ्यांना शीण होत नाही. त्यांच्याकडे रसिकतेने पाहण्याला पुरेसा अवसर मनाला न लाभल्यामुळें जर आपलें मन अरसिक आणि अश्रद्धापरायण झालें असतें तर अवश्य शीण झाला असता. हृदयहीन, उथळ विलासाच्या साधनांत अकारण अनायासें वारंवार 'फॅशन' बदलते. सध्याच्या साहित्यांत रीतीचा बदल असाच चालला आहे. हृदयाला प्रीतीच्या संबंधाची राखी धावत धावत बांधतांपेहेरतां येत नाही. त्याला सवड मिळेल तर चांगली सुंदर रीतीने विणून तें ती बांधील. सध्यां कर्मभग्न लोक हृदयाला धमकावून सांगतात, "तुझें सौंदर्य राहूं दे

* कचुरी : एक प्रकारची पाण्यांत वाढणारी वनस्पति. तिची पाण्यांत अमर्याद वाढ होऊन पाण्याची सर्वस्वी खराबी होते. पूर्व बंगालमध्यें या वनस्पतीमुळें कित्येक तलाव वाया गेले आहेत.

तुझ्याजवळ. सौंदर्य जुनें झालें. तें आतां मागें पडलें आहे. कसाबसा पीळ दिलेली एक तागाची दोरी घेऊन ये– त्याला आम्ही वास्तववाद ( Realism ) म्हणूं– आजकालच्या बेफाम दौडणाऱ्या लोकांना तीच पसंत आहे." अल्पायुषी 'फॅशन्' ही अचानक श्रीमंत झालेल्या माणसा-प्रमाणें उद्धट असते. "आपण आधुनिक," हाच तिचा प्रधान अहंकार. अर्थात तिची बढाई गुणांविषयीं नव्हे, तर केवळ कालविषयक.

हें वेगाचें मोटरयंत्र पाश्चात्य देशांचा प्राण बनले आहे. अजून पक्का दस्तऐवज होऊन तें आपल्या मालकीचें झालें नाहीं. तथापि आपलीसुद्धां दौड चालू झाली आहे. त्यांच्या या हवागाडीच्या पायठणीवर उडी मारून आपण चढलों आहों. आपणहि आंखूडकेशी, आंखूडवेशी साहित्य-कीर्तीच्या तंत्राच्या ताज्या 'फॅशन्'वर गंभीरपणे चर्चा करूं लागलों आहों. आधुनिकाच्या अभिमानानें जुन्याची मानहानि करण्यांत आपणांलाहि अत्यंत आनंद वाटूं लागला आहे.

हें सारें ध्यानी घेऊनच "या वयांत मी कीर्तीचा विश्वास धरीत नाहीं," असें मीं वर म्हटलें आहे. या मायामृगीच्या शिकारीसाठीं राना-वनांतून धावत फिरणें हे यौवनांतच साजते. कारण, त्या वयांत मृग नाहीं मिळाला तरी मृगया यथेच्छ लाभते. फुलापासून फळ होईल किंवा होणार नाहीं. तरीपण फुलाला आपल्या स्वभावाचें चाचल्यांत सार्थक करावें लागतें. फूल अशान्त असतें, त्याच्या वर्ण-गंधाचा नित्य उद्योग बाहेरच्या-बाजूलाच चाललेला असतो. फळाचे कार्य आंत असतें. धीरगंभीर शान्ति हे त्याच्या स्वभावाचें प्रयोजन. शाखेपासून मुक्ति मिळविण्यासाठी त्याची साधना चाललेली असते. ती मुक्ति आपल्या आन्तरिक परिणतीच्या योगाने त्याला मिळवावयाची असते.

माझ्या जीवनांत आज, देंठापासून लवकर गळून पडण्याची वाट पाहत असलेल्या फलाचा ऋतु आला आहे. या ऋतूचा सुयोग संपूर्ण ग्रहण करावयाचा झाला तर अंतर्बाह्य शान्ति प्रस्थापित झाली पाहिजे. ती शांन्ति कीर्ति-अकीर्तीच्या द्वंद्वामध्ये विध्वस्त होते.

कीर्तीची गोष्ट असो. तिच्यांतील पुष्कळ अंश अवास्तवाच्या वाफेने फुगलेला असतो. तिच्या संकोचन–प्रसारणामुळें जो माणूस अतिशय क्षुब्ध

होऊन जाईल तो अभिशप्त होय. प्रीति हेंच भाग्याचें परम दान होय. कवीच्या बाबतींत श्रेष्ठ पुरस्कार तोच. जो मनुष्य व्यावहारिक उपयोगाचा असतो त्याला कीर्ति दिली म्हणजे त्याचें वेतन फिटतें. पण आनंद देणें हेच ज्याचें कार्य त्याला प्रीति मिळाली नाहीं तर त्याचें प्राप्तव्य त्याला मिळालें असें होत नाहीं.

अशीहि एक कीर्ति असते कीं, जी मनुष्यांना उपकरण करून वाढते. उदाहरणार्थ राष्ट्राची कीर्ति. त्या ठिकाणीं कर्माचें बल जनसंख्येत असतें—म्हणून तेथें माणसांना आपल्या पक्षांत ओढण्यासाठी केवळ द्वंद्व माजतें. विस्तृत कीर्तीचें जाळें टाकून माणसांना धरण्याचा तो एक व्यापार आहे. लॉईड जॉर्ज यांचें उदाहरण घ्या. त्यांच्या बुद्धीला, त्यांच्या शक्तीला पुष्कळ लोक जेव्हां मान देतील तेव्हांच त्यांचें कार्य चालणार. त्यांचा विश्वास कमी झाला की, जाळे तुटून जातें, मनुष्य-उपकरण पुरेसें मिळत नाहीं.

उलटपक्षीं, कवीची सृष्टि जर सत्य असेल तर त्या सत्याचा गौरव त्या सृष्टीमध्येंच असतो. त्याला दहाजणांच्या संमतीची गरज नसते. दहाजणांनी तिचा स्वीकार केला नाहीं असेंहि क्वचित् घडतें. त्यामुळें बाजारभावांत नुकसान होईल, परंतु सत्यमूल्यांत उणीव येत नाहीं.

फूल फुललें हीच फुलाची अंतिम कथा. ज्याला तें आवडलें त्याने जिंकली. फुलाचें साफल्य त्याच्या आविर्भावांतच असतें. सौंदर्याच्या अंतरात रसमय, रहस्यमय, आयत्ताच्या अतीत असें सत्य असतें. त्याचा आपल्या अंतःकरणाशी अनिर्वचनीय संबंध आहे. त्याच्या संपर्काने आपली आत्मचेतना मधुर, गंभीर, उज्ज्वल होते. आपला अन्तर्यामी पुरुष व्यापक होतो, रंगून जातो, रसयुक्त होतो. आपलें अस्तित्व जणूं त्याच्याशीं रंगारसांनी मिळून जातें. यालाच म्हणतात अनुराग.

या अनुरागाने मानवी चैतन्याला उद्दीप्त करणें, औदासीन्यापासून त्याला उद्बोधित करणें हें कवीचें कार्य होय. ज्यांच्यामध्यें नित्यता आहे, महिमा आहे, व्यापक आणि गभीर अशी मुक्ति आहे, असल्या सर्व विषयात मानवी चित्ताला ज्याने आश्लिष्ट केलें असेल त्या कवीलाच जग मोठा म्हणतें. कला आणि साहित्य यांच्या भांडारांत भिन्न भिन्न देशीं,

भिन्न भिन्न काळीं, मनुष्याची अनुराग–संपत्ति रचित आणि संचित होत आली आहे. या विशाल विश्वांत विशिष्ट देशाच्या लोकांनी कोणत्या विशिष्ट गोष्टीवर प्रेम केलें तें त्यांचें साहित्य पाहिल्याने समजूं शकतें. या प्रेमाच्या द्वाराच माणसांचा विचार करावयाचा असतो.

वीणापाणीच्या वीणेला अनेक तारा आहेत. कांहीं सोन्याच्या, कांहीं तांब्याच्या व कांहीं पोलादाच्या. संसाराच्या कंठांत लाहानमोठे, आनंद-प्रमोदाचे जितक्या प्रकारचे सूर आहेत ते सगळे तिच्या वीणेवर वाजतात. कवीच्या काव्यांतहि सुरांचे असंख्य वैचित्र्य असतें. सगळेंच उदात्त ध्वनींचें वातावरण पाहिजे असें मी म्हणत नाहीं. परंतु सगळ्याबरोबर असें कांहीं तरी असले पाहिजे कीं, जे अनुरागाला वीर्यवान् आणि विशुद्ध करणाऱ्या ध्रुवाला–वैराग्याला ध्वनित करील. भर्तृहरीच्या काव्यांत भोगी माणसाला आपला सूर ऐकूं येतो, परंतु त्याबरोबरच त्या काव्याच्या अंत-रंगामध्यें त्यागी मनुष्य आपली एकतारी घेऊन बसला आहे असें दिसतें. या दोन सुरांच्या समवायातच काव्यात आणि मानव-जीवनांत रसाचें वजन सारखें राहते. दूरच्या काळाला आणि अनेक लोकांना ज्या संपत्तीचें दान केल्यामुळें साहित्याला स्थायित्व लाभून तें कृतार्थ होतें, त्या संपत्तीचे ओझें कागदाच्या होडयांना किंवा मातीच्या घमेल्याना सहन होणार नाहीं. आधुनिककालविलासी अवहेलनेने म्हणतील कीं, हें सगळे म्हणणे आधुनिक कालाच्या बोलीशीं जुळत नाहीं. तसें असेल तर त्या आधुनिक काला-साठींच दुःख करावें लागेल. समाधानाची गोष्ट एवढीच आहे की, तो सदैव आधुनिक राहील इतकें आयुष्य त्याला नाहीं.

काव्याचे चिरकालिक विषय आधुनिक कालीं जुनेपुराणे होऊन गेले आहेत असें कवीच्या क्लान्त मनाला वाटूं लागलें असेल तर आधुनिक कालच वृद्ध आणि रसहीन झाला आहे, असें आम्ही समजूं. चिरपरिचित जगाला त्याचा सहज अनुरागाचा रस पोंचत नाहीं, म्हणून जगताला तो आपणांमध्यें घेऊं शकत नाहीं. ज्या कल्पनेला चारीहि बाजूंनी सारखा रस आता मिळेनासा झाला आहे, ती कल्पना एखाद्या कृत्रिम तंत्राला दीर्घ काल सरस राखूं शकेल अशी आशा करणें ही केवळ विटंबना आहे. ज्याच्या जिभेची चवच मेलेली असते त्याची नित्याच्या अन्नानें तृप्ति होत

नाही, या एकाच कारणामुळें एखादें कृत्रिम अन्न त्याला नित्य गोड लागेल हें संभवनीय नाही.

आज सत्तराव्या वर्षी सर्वसाधारण जनतेशी माझा परिचय एकप्रकारें परिणतीला पोंचला आहे. म्हणून मला आशा आहे, कीं मला जाणण्याचा ज्यांनी थोडाफार प्रयत्न केला असेल त्यांना इतक्या दिवसानंतर निदान एवढें तरी समजून आलें असेल, कीं जीर्ण जगतांत मी जन्म घेतला नाही. मी नेत्र उघडून जें कांही पाहिलें त्यामुळे माझ्या नेत्रांना कधीच शीण झाला नाही, त्यातील विस्मयाचा अंत कधी लागला नाहीं. चराचराला वेष्टन करून अनादिकालाची जी अनाहत-वाणी अनंत कालाकडे वाजत चालली आहे, तिला मी आपल्या प्राणा-मनांनी साथ देत आलो आहे. युगानुयुगीं ही विश्ववाणी मी ऐकत आलों आहे, असें मला सदैव वाटलें आहे. सूर्यमंडलाशेजारी या आमच्या छोटया श्यामल पृथ्वीला ऋतूंचे आकाशदूत विविधरसांच्या वर्णवस्त्रांनी सजवीत असतात, त्या प्रीतीच्या समारंभामध्यें आपल्या हृदयाच्या अभिषेकजलाने भाग घेण्यास मी कधींहि आळस केलेला नाही. प्रतिदिनी उषःकाली काळोख्या रात्रीच्या अंतीं " यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि " या गोष्टीचा साक्षात्कार करून घेण्यासाठी मी शांतपणें उभा राहिलें आहे. सकलवस्तुजातीच्या आत्मीय संबंधाचें जे ऐक्यतत्त्व आहे; ज्याच्या आनंदामुळेंच निरंतर असंख्य रूपांच्या प्रकाशाने विविध प्रकारें माझें जीवन आनंदित होतें आणि " को ह्येवान्यात् कः प्राण्यात् यदेश आकाश आनन्दो न स्यात् " असें बोलूं लागतें, ज्यांना कांहीच व्यावहारिक प्रयोजन नाहीं अशा वस्तूसुद्धा माणसाला केवळ आनंदाच्या आकर्षणाने ओढून घेतात या अत्यंत आश्चर्यमय व्यापाराचा चरम अर्थ ज्या तत्त्वामध्ये आहे; जें मनुष्याच्या हृदयांत राहून त्याला पूर्णत्वाला नेत असतें व यामुळेंच प्राण पणास लावून केलेल्या कठोर आत्मत्यागाचा " तो एक आत्मघातकी माथेफिरूचा मूर्खपणा आहे," असें म्हणून आपण कधीं उपहास केला नाहीं;

* ज्याच्यासाठीं रात्रीच्या अंधकारांतून मानवयात्री युगापासून युगान्तराकडें चालला आहे;
* ज्याच्यासाठीं राजपुत्राने छिन्नकंथा धारण केली आणि तों

विषयाचा विरागी, पथीचा भिक्षुक बनला; ज्या महात्म्यानें संसारांतील क्षुद्र ताप आणि तुच्छ लोकांनी केलेल्या निंदेतील रोजची बीभत्सता क्षणाक्षणाला सहन केली;

* ज्याच्या पायीं मानी जनांनी आपला मान अर्पण केला, धनिकांनीं आपलें धन अर्पण केलें, वीरानी आपले प्राण अर्पण केले;

* ज्याला उद्देशून कवींनी लक्षावधि गीते रचून देशोदेशीं विखुरविलीं;

त्या विराट् तत्त्वाला आपल्या जीवनांत प्रत्यक्ष स्पर्श करण्याची मी इच्छा धरिली आहे.

ईशोपनिषदाच्या ज्या पहिल्या मंत्राने पितृदेवांना दीक्षा मिळाली, तोच मंत्र पुनः पुनः नवीन नवीन अर्थांनी माझ्या मनांत आंदोलित होत आला आहे. मी स्वत:ला वारंवार म्हटलें आहे; "तेन त्यक्तेन भुञ्जीथाः, मा गृधः।"—"तुझ्यापाशी जे सहज आले आहे, जें तुझ्याभोंवती चौबाजूंनी भरून राहिलें आहे, त्यामध्यें आनंद मान. त्यांतच चिरंतनाची वसति आहे. लोभ धरूं नको." काव्यसाधनेला हा मंत्र मोठ्या मोलाचा आहे. आसक्ति ज्याला कोळ्याप्रमाणें आपल्या जाळयात पकडते त्याला जीर्ण करून सोडते, तिच्यामुळें ग्लानि येते, ती शीण आणिते. कां की, आसक्ति त्याला समग्रांतून उपटून काढून आपल्या सीमेमध्ये बांधून टाकते. त्यानंतर तोडलेल्या फुलाप्रमाणें अल्पकाळांतच त्याला म्लानता येते. महत् साहित्य भोगाच्या लोभापासून, सौन्दर्याच्या आसक्तीपासून, चित्ताच्या नित्याच्या गरजांच्या दंडधाऱ्यांपासून उद्धार करिते. रावणाच्या घरी सीता लोभामुळें बंदी होती, तर रामाच्या घरी सीता प्रेमामुळें मुक्त होती. तिच सत्यप्रकाश तेथेंच प्रकट झाला होता. प्रेमाजवळ देहाचें अपूर्व रूप प्रकट होतें, लोभापाशी त्याचें स्थूल मांस दिसून येतें.

कित्येक दिवसांपासून जीवनाच्या नाना पर्वांत आणि नाना अवस्थेत मी लिहीत आलों आहे. अपरिपक्व वयांतच मीं प्रारंभ केला. त्यावेळी मला स्वतःची ओळख पटली नव्हती. म्हणून माझ्या त्या वेळच्या लिखाणांत निरर्थक आणि त्याज्य असा भाग बराच आहे यांत संदेह नाही. हा सर्व केरकचरा वगळला म्हणजे जें बाकी राहते त्यांत मला वाटतें, ही घोषणा स्पष्ट ऐकूं येण्यासारखी आहे की, मी या जगतावर प्रेम केलें आहे, मी

महत्‌ला प्रणाम केला आहे, परम पुरुषाला आत्मनिवेदन करण्यानें लाभणाऱ्या मुक्तीची मीं कामना केली आहे. "सदा जनानां हृदये संनिविष्टः", या महामानवामधील मानवसत्यावर मी श्रद्धा बाळगिली आहे. आबाल्य-अभ्यस्त अशा ऐकान्तिक साहित्यसाधनेच्या सीमेचा अतिक्रम करून एकदां मी त्या महामानवाला उद्देशून यथाशक्ति माझ्या कर्मांचा अर्घ्य आणि माझ्या त्यागाचा नैवेद्य अर्पिला आहे. त्यांत बाहेरून जरी विघ्नें आलीं असलीं तरी अंतःकरणांतून मला प्रसाद लाभला आहे. मी या धरणीच्या महातीर्थावर आलों आहे. येथे सर्व देश, सर्व जाति आणि सर्व काल यांच्या इतिहासाच्या महाकेंद्रांत नरदेवता अधिष्ठित आहे. त्या देवतेच्या वेदीपाशी एकटाच बसून आपला अहंकार, भेदबुध्दि यांचें क्षालन करण्याच्या दुःसाध्य कर्मांत आज मी प्रवृत्त आहे.

माझ्या जीवनांत जें कांही आकिंचित्कर असेल त्याचा अतिक्रम करून माझ्या चरित्रांतील आंतरतम प्रकृति आणि साधना जर माझ्या लेखनांत प्रकट झाली असेल, तिने आनंद दिला असेल, तर त्याचा मोबदला म्हणून मला केवळ आपल्या प्रेमाची अपेक्षा आहे, दुसऱ्या कशाची नाही. माझ्या सर्व त्रुटि जाणूनहि मी सर्व जन्मभर काय इच्छिलें, काय मिळविलें काय दिलें, माझ्या अपूर्ण जीवनांत, असमाप्त साधनेंत काय सूचित झालें आहे हें ज्यांनीं ओळखिलें आहे त्याच्याकडून मला अकृत्रिम सौहार्द लाभलें, हें मला समजलें म्हणजे पुरे.

साहित्यामधून मनुष्याची अनुरागसंपत्ति निर्माण करणें हेंच जर कवीचें यथार्थ कार्य असेल, तर कवीच्या या दानाचे ग्रहण करण्यासाठीं केवळ प्रेमाचीच आवश्यकता आहे. कारण, प्रेमालाच पूर्ण रूप दिसतें. आजपर्यंत साहित्यात ज्यांना सन्मान प्राप्त झाला आहे त्याच्या रचनेकडे आपण साकल्याने पाहतों व म्हणून आपणांला त्यांच्याविषयीं आदर वाटतो. तिचे तुकडे तुकडे करून छिद्रान्वेषण करण्याकडे अथवा छिद्रें पाडण्याकडे आपली स्वभावतः प्रवृत्ति होत नाही. आपल्या अनुरागहीन परुषचित्ताने कोणा मनुष्याला ज्याच्या श्रेष्ठ रचनेची टवाळी करतां येणार नाही, तिला तुच्छ लेखतां येणार नाही, तिला तोंड वांकडें करून दाखवितां येणार नाही, असा कोणी मोठा साहित्यिक जगामध्ये आजपर्यंत जन्मास आला

नाही. प्रीतीची प्रसन्नता हीच सहज भूमिका होय. हिच्यावरच कवीची सृष्टि समग्र, सुस्पष्ट होऊन प्रकाशमान होते.

मर्त्य लोकांतील श्रेष्ठ दान अशी जी प्रीति ती मला मिळाली आहे, हें मी प्रणामपूर्वक कथन करितों. पृथ्वीवरील अनेक श्रेष्ठांच्या हातून ही मला मिळाली आहे. त्यांना कृतज्ञता नव्हे—मी आपलें हृदय निवेदन करीत आहें. त्यांच्या दक्षिण हस्ताच्या स्पर्शामधून विराट मानवाचा स्पर्श माझ्या मस्तकाला झाला आहे. माझ्या मध्ये जें कांही श्रेष्ठ असेल तें त्यांच्या स्वीकाराला पात्र होवो.

याशिवाय माझ्या स्वदेशांतील जे लोक अतिनिकटतेच्या, अतिपरिचया-च्या अस्पष्टतेचा भेद करूनहि मजवर प्रेम करूं शकले, त्यांचाहि आजच्या या अनुष्ठानांत मोठ्या यत्नाने रचिलेला अर्घ्य सिद्ध झाला आहे. त्यांच्या या प्रेमाचा मी अंतःकरणापासून स्वीकार करितों.

* जीवनाचा पथ दिवसाच्या शेवटीं येऊन रात्रीच्या घन. अंध-कारात लुप्त झाला आहे.

* तारागण अंगुली उभवून अनिमेष नेत्रांनी "मा भैः" म्हणून नीरव प्रतिशब्द देत आहेत.

* म्लान दिवसाचें शेवटचें फूल तोडून माझी यात्रा संपूर्ण करण्या-साठीं या तीरावरून नवजीवनाच्या परतीराकडे मी निघालों आहे.

* हे माझ्या जीवनसंध्ये, मजजवळ जें काही होतें तें मी तुझ्या पदराखाली झांकून ठेंविलें आहे.

* माझ्या अंधकारांतील सहचरा, माझ्या हातांतली राखी मी तुझ्या करुण हातावर बांधून दिली आहे.

* निरोप घेत असतां आजहि प्रभातींच्या आशा आणि रात्रींच्या गीति, सुखाच्या स्मृति आणि दुःखाच्या प्रीति कितीतरी शिल्लक उरल्या आहेत.

* जें कांहीं मला प्राप्त झालें, ज्याची फेड होऊन गेली, चालतां चालतां जें कांही पडून राहिले,

* हृदयावर जें रत्न रुळलें, हृदयाला ज्या व्यथेने विद्ध केलें, छाया बनून जें दिगंतरी अदृश्य झालें,

* तें जीवनातील सारें धन यत्किंचितहि फेकून देतां येणार नाही. धुळीमध्ये त्याची कितीहि अवहेलना होवो, त्यावर पूर्णाचा पदस्पर्श उमटलेला आहे.

---

# नन्दलाल बसु

['**विचित्रा**' या वंग मासिकाच्या चैत्र १३४० च्या अंकांतील श्री. रवीन्द्रनाथ ठाकुर यांच्या लेखाचा सरळ अनुवाद.]

स्पिनोझा नांवाचा एक तत्त्व-ज्ञानी होऊन गेला. त्याचे तत्त्वविचार त्याच्या व्यक्तिगत जीवनाहून वेगळे करून पाहता येतील. परंतु त्या दोहींचें एकत्र दर्शन घेतलें तर आपणांला त्याची कृति अधिक उज्ज्वल रूपानें प्रतीत होते. लहानपणीच समाजाने त्याला परका समजून दूर लोटलें; पण दुःसह दुःखांतहि त्याने सत्याला सोडिलें नाही. जन्मभर त्याने अगदी थोड्या पैशांवर आपले दिवस कंठले. फ्रान्सचा राजा चवदावा लुई याने आपल्या नांवाने एखादा ग्रंथ अर्पण केल्यास त्याला मोठें पेन्शन देऊं केलें होतें. पण स्पिनोझानें ती गोष्ट मान्य केली नाही. त्याच्या एका स्नेह्याने मरणसमयीं आपली सगळी संपत्ति त्याच्या नांवें करून दिली; पण त्याने ती संपत्ति स्वतः न घेता त्या दात्याच्याच एका भावाला देऊन टाकली. त्याचें जीवन आणि त्याचें तत्त्वज्ञान हीं एके ठिकाणीं आणून पाहिलीं तरच त्याच्या सत्याच्या साधनेचें यथार्थ स्वरूप दिसून येतें; आणि त्या साधनेचा जन्म केवळ त्याच्या तार्किक बुद्धीतूनच झाला नव्हता, तर त्याच्या संपूर्ण जीवनांतून तिचा उद्भव आणि विकास झाला होता हें समजून येतें.

मला वाटतें चित्रकला आणि साहित्य यांमध्ये तर मनुष्याच्या जीवनाचा त्याच्या कृतींशीं अधिक निकट संबंध असतो. त्यांचें एकत्र दर्शन घेण्याचा

सुयोग आपणांला नेहमींच मिळतो असें नाहीं. पण तसा सुयोग मिळाला तर मनुष्याच्या कृतीच्या अकृत्रिम सत्यतेविषयीं आपली कल्पना विशेष स्पष्ट होऊं शकते. उपजत कवि आणि उपजत शिल्पी (Artist) यांना केवळ त्यांच्या लेखांत, त्यांच्या हातच्या कृतींत पाहतां येतें असें नाहीं, तर त्यांचें स्वरूप त्यांच्या व्यवहारांत, त्यांच्या दैनिक आचारांत व त्यांच्या जीवनांतील रोजच्या बोलण्याचालण्यांतहि दिसून येतें.

चित्र-शिल्पी नन्दलाल बसु यांचें नांव आपल्या देशांत पुष्कळांना माहीत आहे.आपापल्या रुचि, वृत्ति, शिक्षण आणि सवयी यांना अनुसरून अनेकजण अनेक प्रकारें त्यांच्या चित्रांचे समालोचन करीत असतात. असल्या क्षेत्रांत मतैक्य होण्याची कधींच आवश्यकता असत नाहीं. वस्तुतः असलें मतवैचित्र्य हेंच अनेकदा श्रेष्ठतेचें गमक ठरतें. पण भिन्न भिन्न अवस्थांमधून नन्दलाल यांचे जीवन जवळून नीट जाणण्याचा सुयोग मला मिळाला आहे. या सुयोगामुळें चित्रें काढणाऱ्या या पुरुषाच्या जीवनाविषयीं मला अत्यंत पूज्य बुद्धि वाटत आली आहे; आणि म्हणून त्याच्या चित्रांचेंहि मला गौरवबुद्धीने ग्रहण करितां आलें आहे. या पूज्य बुद्धीने दृष्टीला एक शक्ति लाभते, आणि तिच्यामुळे दृष्टीला प्रत्यक्षाच्या अंतरंगांत प्रवेश करितां येतो.

नन्दलाल याना बरोबर घेऊन मी एकदा चीन-जपानच्या सफरीला गेलों होतों. माझ्याबरोबर माझे इंग्रज मित्र मिस्टर अल्म्हर्स्ट हे होते. ते म्हणाले– 'नंदलाल यांचा सहवास म्हणजे एक शिक्षणच होय.' त्यांचें तें म्हणणे अगदीं यथार्थ आहे. नन्दलाल यांची कला-दृष्टि अत्यंत शुद्ध आहे. त्यांची विचारशक्ति अन्तर्दर्शी आहे. कांहीं लोक असे असतात, कीं ज्यांना कलेला कृत्रिम श्रेणीमध्यें सीमाबद्ध करून पाहतां आलें नाहीं तर दिशाभूल झाल्यासारखी वाटते. असले पाहणें म्हणजे लंगडया माणसाचें काठी धरून चालणें होय. जड, बाह्य आदर्शावर विसंबून एखाद्या विशिष्ट प्रमाणाशीं तुलना करून विचार करण्यासारखें तें आहे. असली परीक्षापद्धति पदार्थ-संग्रहालय सजविण्याला उपयोगी पडणारी आहे. जी वस्तु मृत होते तिला सीमा प्राप्त होते. तिचा संपूर्ण परिचय करून घेणें सहज साधतें. यामुळें विशिष्ट छाप मारून तिला वेगळ्या वर्गांत दाखल

करून चालतें. परंतु जी कला इतिहासाच्या स्मृति-भाण्डारांतील निश्चल पदार्थ झाली नाहीं, सजीव वर्तमानाशी जिची नाडी जोडलेली आहे, तिची प्रवणता भविष्यत्कालाकडे असते. ती चालत असते, पुढे जात असते. तिच्या संभूतीचा अद्यापि शेवट झालेला नसतो. तिच्या अस्तित्वाच्या पक्क्या दस्तऐवजावर शेवटची सही पडलेली नसते. कलेच्या राज्यातील सनातनी लोक मृताच्या लक्षणाशीं जुळेल अशी, जीवितासाठीं श्रेणी-विभागाची खिडकी नसलेली एक कबर निर्माण करितात. नन्दलाल हे या जातीचे गृहस्थ नाहीत. त्यांच्या दृष्टीने कला हा सजीव पदार्थ आहे. कलेला ते स्पर्शाने, दृष्टीने, हृदयाने ओळखतात. यामुळे त्यांची संगत म्हणजे एक शिक्षणच होय. शिष्यरूपानें त्यांच्याजवळ येण्याचा सुयोग ज्यांना लाभला ते मोठे भाग्यवान होत असें मला वाटते. या गोष्टीचा ज्याला अनुभव आला नाही अथवा ही गोष्ट ज्याला मान्य नाही, असा त्यांचा एकहि शिष्य आढळणार नाही. यासंबंधात त्यांनी आपले गुरु अवनींद्रनाथ यांची प्रेरणा स्वभावतःच सहज ग्रहण केली आहे. शिष्याच्या अन्तर्हित शक्तीला ते बाहेरच्या एकाद्या सनातन साच्यांत ओतण्याचा कधीच प्रयत्न करीत नाहींत. ते त्या शक्तीला आपल्या मार्गानें जाण्यास मोकळीक देऊं पाहतात. यांतच त्यांना कृतकृत्यता वाटते. कारण त्याच्या स्वतःमध्येहि अशीच मुक्तता आहे.

कांही दिवसापूर्वी मुंबई येथे नन्दलाल यांनी आपल्या सध्याच्या शिष्याच्या चित्रांचें एक प्रदर्शन भरविलें होतें. तेथे एक कला भवन (स्कूल ऑफ आर्ट्स्) आहे हे सर्वांना ठाऊक आहे. त्या कलाभवनाचे अनुयायी आमच्याकडील चित्रांविषयीं अनादर दर्शविणारे लेख लिहीत असतात ही गोष्ट देखील, मला वाटतें, पुष्कळांना माहीत आहे. त्यांची तक्रार अशी असते, की आमच्या कलासृष्टींत आम्ही जुन्या चालीचीच चित्रें निर्माण करितों, ती केवळ थोडक्यांत फसवण्याची युक्ति आहे; यास्तव संसारांतील प्राण-वैचित्र्य त्यांमध्ये नाही. आम्ही वर्तमानपत्रांतून याचा मुळींच प्रतिवाद केला नाही, केवळ चित्रें दाखविलीं. इतके दिवस या-प्रमाणें जे चेष्टा करीत आले होते त्यांना पूर्ण विरुद्ध असें प्रमाण पहावयास सापडलें. त्यांना विविध चित्रें दिसलीं, त्यांमधून विविध हातांनीं

विविध चित्रांचें प्रकटीकरण केलेलें आढळून आलें. त्यात जुन्या काळची नक्कल नव्हती आणि नव्या काळचीहि नक्कल नव्हती. शिवाय कोणत्याहि चित्रांत चालू बाजार-भावाकडे मुळीच लक्ष दिलेलें नव्हतें.

ज्या नदीचा प्रवाह अल्प असतो तिच्यामध्ये शेवाळीची बेटें बनतात; तिचा पुढील मार्ग रुद्ध होऊन जातो. त्याप्रमाणें असे कांही शिल्पी आणि साहित्यिक असतात, की ते आपल्या सवयी आणि आपले छाप यांच्या द्वारा आपल्या अचल सीमा निर्मितात. त्यांच्या कृतींत प्रशंसनीय गुण असूं शकतात, पण त्यांना वळण घेतां येत नाही, पुढे जाण्याची इच्छा होत नाही. एकसारखी आपली आपणच नक्कल करीत राहतात. आपण निर्माण केलेल्या कृतीतून सदा स्वतःचीच उसनवारी त्यांनी चालविलेली असते.

आपल्या प्रतिभेच्या यात्रापथामध्ये सवयीच्या जडतेमुळें उत्पन्न होणारें हें सीमाबंधन नन्दलाल यांना यत्किंचितहि सहन होत नाही हें मला माहित आहे. त्यांच्यामध्ये असलेली ही बंडखोरी मी कित्येक दिवसांपासून पाहात आलो आहें. विश्वशक्तीमध्ये ही बंडखोरी—हा विद्रोह—सर्वत्र भरून राहिलेला आहे. सत्यसृष्टि रुळलेल्या मार्गानें जात नाहीं. प्रलयशक्तिच तिचा मार्ग तयार करून देते. सृष्टि-कार्यातील ही जीवनशक्तीची अस्थिरता नन्दलाल यांच्यामध्ये स्वभाव-सिद्धच आहे. एखाद्या अड्ड्यावर गेल्यावर पुढे न जातां एखाद्या खुर्चीवर बसून पाय हालवीत पडावें हें त्यांच्या भाग्य-लेखांत लिहिलेलें नाहीं. त्यांच्या बाबतींत जर हें शक्य झालें असतें, तर बाजारात त्यांचें दुकान चांगले भरभराटीला आलें असतें. बांधलेली गिऱ्हाइकें असतात त्यांची विचारबुद्धि दृढपणें खुंटीला बांधून ठेवलेली असते. त्यांची भाव ठरविण्याची पद्धति रूढ आदर्शांना धरून असते, आपल्या अभिरुचीला त्या आदर्शांच्या बाहेर जाऊं देण्यास त्यांना भीति वाटते. त्यांच्या आवडी-चें परिमाण लोकमताच्या परिमाणावर अवलंबून असतें. कलावंताच्या कलेविषयीं सर्वसाधारण लोकांत आवड उत्पन्न होण्यास थोडा वेळ लागतो. पण एकदा आवड निर्माण झाली म्हणजे तिच्या अनुरोधानें वागलें असतां कलावंताला कांही भय उरत नाही. पण जो आत्मविद्रोही कलावंत

आपल्या कलमाच्या पद्धतीचा क्षणोक्षणीं भंग करितो त्याचे इतर कांही झालें तरी त्याला बाजारांत वरचेवर फसावे लागते. परंतु एक वेळ बाजारांत फसलें तरी चालेल, पण स्वतःला फसविणें चांगलें नाही. नन्दलाल यांना असल्या आत्मवंचनेचा तिटकारा आहे हें मला निश्चित माहीत आहे. यामुळें त्यांचे काय नुकसान व्हावयाचें असेल तें होईल. अमुक एका ग्रंथापर्यंत अथवा अमुक एका चित्रापर्यंत लेखक वा चित्रकार यांच्या उत्कर्षाची सीमा झाली अशी लोकवार्ता मधून मधून बाजारात उठते. कित्येक वेळा त्याचा अर्थ इतकाच असतो की नित्याच्या मापात व्यत्यय उत्पन्न झालेला आहे. सर्वसाधारण लोकांच्या सवयीचा बांधलेला दुकानदार होण्याचा लोभ आवरतां आला नाही म्हणजे त्या लोभांतून पाप निर्माण होतें. पापाने मृत्यु येतो. इतर कांही झालें तरी नन्दलाल यांना या पापलोभाची मुळीच भीति नाही. त्यांची लेखणी आपल्या भूतकालाचा त्याग करून पुढे चालणारी यात्रिका आहे. विश्वसृष्टीचा यात्रापथ त्या दिशेकडेच आहे. अनंताच्या आह्वानामुळे तिचा अभिसार चालला आहे.

कलावंताच्या चरित्रावरून, त्याच्या जीवनावरून त्याच्या अभिजाततेचा बोध होऊं शकतो, याचें प्रमाण नन्दलाल यांच्या स्वभावामध्ये आपणाला वारंवार मिळतें. प्रथम आपणाला त्यांची कलेवरील संपूर्ण निष्ठा आढळून येते. भौतिक विषयाकडे जर त्यांची आकांक्षा धावली असती तर त्या दिशेने त्यांना उच्च स्थान मिळण्याचा भरपूर योग होता. प्रतिभेचें नाणें पारखण्यासाठी परीक्षक इन्द्रदेव कलासाधकांच्या तपस्येपुढे रजतनूपुरांच्या झंकाराचें मोहजाल पसरून देतो. सरस्वतीच्या प्रसादस्पर्शामुळें त्या लोभापासुन त्यांचें रक्षण होतें. देवी त्यांच्या अर्थाच्या बंधनापासून उद्धार करून त्यांना सार्थकतेच्या मुक्तीचा वर देते. या मुक्तिलोकांत नंदलाल विराजत आहे. त्यांना भय नाही.

त्यांच्या स्वाभाविक अभिजाततेचें आणखी एक लक्षण दिसून येतें. तें म्हणजे त्यांचें अविचलित धैर्य होय. मित्रांच्या तोंडून निघालेल्या अन्याय्य निंदेने देखील त्यांच्या प्रसन्नतेचा नाश कधी होत नाहीं. याचे दाखले मी पाहिले आहेत. जे त्यांना जाणतात त्यांना अशा घटनेबद्दल

दुःख होतें, पण ते स्वतः अत्यंत सहज रीतीने क्षमा करूं शकतात. यामध्यें त्यांच्या हृदयाचें ऐश्वर्य सिद्ध होतें. त्यांचें मन दरिद्री नाहीं. आपल्या व्यवसायबंधूंपैकीं कोणाविषयीहि मत्सराचा आभास देखील त्यांच्या वागणुकींत कधी दिसून येत नाहीं. ज्याला जें श्रेय दिलें पाहिजे तें त्याला दिल्याने आपल्या स्वतःच्या यशांत उणीव पडेल असली भीति त्यांना कधीहि क्षुद्र होऊं देत नाहीं. स्वतःच्या बाबतींत काय अथवा दुसऱ्यांच्या बाबतींत काय, ते सदा सत्यशील असतात. ते आपली फसवणूक करीत नाहींत आणि दुसऱ्याचीहि वंचना करीत नाहीत. जसे कृतींत तसेच स्वभावांतहि ते कलावंत आहेत ही गोष्ट यावरून पाहावयास सापडते. क्षुद्रतेचा दोष स्वभावतःच त्यांना कोठेहि असलेला आवडत नाहीं.

शिल्पी आणि मनुष्यव्यक्ति या दोन्ही बाजू एकत्र जोडून मी नन्दलाल याना जवळून पाहिले आहे. बुद्धि, भावना, नैपुण्य, अभिज्ञता आणि अंतर्दृष्टि या गुणांचा असला समन्वय क्वचितच पाहावयास मिळतो. त्यांच्याजवळ शिक्षण घेणाऱ्या त्यांच्या शिष्याना ह्या गोष्टींचा अनुभव येतो. त्याचप्रमाणें जे त्यांचे मित्र त्यांना रोजच्या मोठ्या व्यवहारांत वागतांना नित्य पाहतात, ते त्यांचें औदार्य व त्यांच्या चित्ताचें गांभीर्य या गुणांनी त्यांच्याकडे आकर्षिले जातात. माझ्या स्वतःच्या व त्या सर्व मित्रांच्या वतीने ही गोष्ट प्रसिद्ध करण्याची इच्छा या माझ्या लेखाच्या रूपाने व्यक्त होत आहे. असल्या प्रशंसेची त्यांना मुळीच अपेक्षा नाहीं; पण माझ्या मनालाच त्याची आवश्यकता भासते.

---

# कालिदास-गौरव

[ श्री. रवींद्रनाथ ठाकुर यांनीं सुमारें ५० वर्षांपूर्वी '**चैतालि**' नामक काव्यसंग्रहांत कालिदासावर पांच सुनीतें लिहिलीं आहेत. एका महाकवीचा दुसऱ्या महाकवीनें केलेला काव्यगौरव हा साहित्यक्षेत्रांत अपूर्व योग होय. ]

## १ ऋतुसंहार

हे कवीन्द्र कालिदास,
कल्पकुंजवनांत यौवनाच्या यौवराज्यसिंहासनावर प्रेयसीसह एकांतीं तूं बसला आहेस.
समस्त पृथ्वी तुमचें मरकतपादपीठ धारण करण्यासाठींच केवळ राहिली आहे.
समस्त गगनानें केवळ तुमच्यावरच सुवर्णाचें राजछत्र उंच धरिलें आहे.
सहा ऋतूंच्या सहा सेवादासी फिरून फिरून येऊन नृत्य करीत आहेत.
तुमच्या तृषित यौवनाला नवनववर्णमयी मदिरेची धारा ओतून त्या नवनव पात्रें भरून देत आहेत.
त्रिभुवन हें एक अन्तःपुर, उत्सवभवन झालें आहे.
दुःख नाहीं, दैन्य नाहीं; जनप्राणी कोणी नाहीं.
केवळ तूं राजा आणि तुझी राणी, दोघेंच आहां !

## २ मेघदूत

तो महाप्रताप एका क्षणांत भंगून गेला !
त्या सुखराज्यांत एक दिवस ऊर्ध्व दिशेहून ईश्वराच्या शापानें विरहाची ज्योत हातीं घेऊन प्रवेश केला.
मीलनाचें मृगजळ—यौवनाचा विश्वग्रासी मत्त अहंकार एका क्षणांत नाहींसा झाला.
प्रखर रौद्र किरणांनीं धुक्याची माया अदृश्य झाली.
षड्ऋतूंच्या सहचरींनीं छत्रचामरें टाकून दिलीं.
सभा विसर्जन करून त्यांनीं एकदम रंगपट वर ओढून घेतला.

एकाएकी चित्रांत रेखल्यासारखें आषाढाचें अश्रुप्लुत सुंदर भुवन दिसूं लागलें.

चारी बाजूंना पर्वत, कानन, नगर, नगरी, ग्राम, हीं दिसूं लागलीं.

विश्वसभेमध्यें तुझी विरहवीणा सकरुण वाजत आहे !

## ३ कुमारसंभवगान

हे कवे,

तूं जेव्हां देवदंपतीला कुमारसंभवगान ऐकविलेंस, त्या वेळीं प्रमथगण चौबाजूंना येऊन उभे राहिले.

शान्त, मन्थर संध्यामेघ शिखरावर येऊन टेकले.

विद्युत्-लीला थांबली; गडगडाट शांत झाला.

कुमाराचा शिखी आपला पिसारा खालीं करून आपली उंच मान थोडी वांकवून पार्वतीपाशीं स्थिर उभा राहिला.

केव्हां देवीचा ओठ स्मितहास्यानें कंपित झाला.

केव्हां न कळत तिनें दीर्घ श्वास सोडिला.

केव्हां तिच्या डोळ्यांच्या पापण्यांवर अश्रुजल चमकलें.

शेवटीं जेव्हां तिच्या नयनांवर व्याकुळ लज्जा निःशब्दपणें अवतीर्ण झाली, तेव्हां—हे कवे,

देवीकडे पाहून तूं एकाएकीं गाणें समाप्त न करितांच थांबलास !

## ४ मानसलोक

हे कवि कालिदास,

मानस-कैलास-शृंगावरील निर्जन भुवनांत, महेशमंदिराच्या प्रांगणांत तूं महेशाचा कवि होतास.

नीलकंठाच्या द्युतीप्रमाणें स्निग्ध, नीलवर्णाच्या चिरस्थिर आषाढींच्या सांद्रमेघदलांमध्यें,ज्योतिर्मय सप्तर्षींच्या तपोलोकतलीं तुझें वास्तव्य असे.

आजहि त्या मानसधामीं तुझी वसति आहे.

हे कविपते, शंकराच्या चरितगायनानें भुवन भरून तूं तेथें चिरदिन राहशील.

मध्येंच उज्जयिनीचें राजनिकेतन, विक्रमादित्य नृपति, नवरत्नसभा हें स्वप्न क्षणभर कोठून चमकलें ?

तें स्वप्न, तें विशाल चित्र अदृश्य झालें.

मानसलोकामध्यें तूं चिरकवि तेवढा राहिला आहेस !

## ५ काव्य

हे अमर कवे,

आमच्यासारखीं सुखदुःखें, आशानिराशांचीं द्वंद्वें तुला कधीं नसतील काय ?

राजसभेंतलि कट, गुप्त आघात, काय क्षणोक्षणीं झालेच नसतील?

अपमान, उपेक्षा, अविश्वास, अन्याय, कठोर क्रूर अभाव हे काय तुला कधीं सहन करावे लागले नसतील ?

हृदयींच्या शल्यामुळें तुला कधीं झोंपेशिवाय रात्र काढावी लागली नसेल काय ?

तरीपण या सर्वांच्यावर आनंदसूर्याकडे मुख करून तुझ्या काव्याचें सौंदर्यकमल निर्लेप, निर्मल फुललें आहे.

त्यावर दुःख, दैन्य, दुर्दिन यांचें कोठेंच कांहीं चिह्न दिसत नाहीं.

जीवनाच्या मंथनांतून निघालेलें विष तूं स्वतः प्राशन केलेंस अमृत निघालें ते जगाला देऊन गेलास !

असहकारितेच्या चळवळीत उडी घेतल्यानंतर शंकररावांनी प्रथम कांहीं काळ खेड्यांतून प्रचार केला. पुढें त्यांनीं इस्लामपूरजवळ (हे तेथलेच राहणारे आहेत) अस्पृश्य लोकांसाठी एक वसतिगृह स्थापिलें. त्याला 'महात्मा बोर्डिंग' असें नांव देऊन 'महात्मा' या शब्दानें जोतीबा फुले व गांधी या दोघांचा समन्वय त्यांनीं साधिला होता. असहकारितेची लाट ओसरल्यावर पुढें काय उद्योग करावा याचा विचार करीत असतां त्यांनीं एखादा ग्रंथ लिहिण्याचें ठरविलें. तत्त्वज्ञान किंवा राजकारण या विषयावर रचना करावी असा त्यांना विचार सुचला. पण तत्त्वज्ञानावर लिहिण्यासाठी बुद्धीला अधिक पक्वता प्राप्त झाली पाहिजे असा निश्चय करून त्यांनीं शेवटी राजकारणावरच ग्रंथ लिहिला (१९२६). त्या ग्रंथाची मांडणी 'गीतारहस्या'च्या पद्धतीवर केलेली आहे—म्हणजे, पौरस्त्य व पाश्चात्य विचारांचा तुलनात्मक परामर्श त्यांत घेतलेला असून समाज-शास्त्राला अध्यात्मशास्त्राची जोड आवश्यक आहे, असें 'गीतारहस्या' प्रमाणेंच 'राजनीतिशास्त्रपरिचयां'तहि प्रतिपादिले आहे. त्यांनी येथें जी विचारसरणी मांडलेली आहे तिचाच पद्धतशीर विकास त्यांच्या पुढील सर्व ग्रंथांत आढळतो. या दृष्टीनें पाहिलें असतां त्यांच्या बुद्धीच्या व्यापकतेचें कौतुक करावेंसें वाटते.

'राजनीतिशास्त्रपरिचया'नें त्यांना थोडी प्रसिद्धी लाभली, आणि लागलीच टिळक-महाविद्यालयांत इतिहास अर्थशास्त्र-राजकारण या विषयांचे अध्यापक म्हणून ते पुण्यास आले. राष्ट्रीय शिक्षणाविषयी त्यांची स्वतंत्र दृष्टि असल्यामुळे टिळक--महाराष्ट्र विद्यापीठासाठी त्यांनी 'राष्ट्रसंघटनशास्त्र' या नांवाने एक नवीन अभ्यासक्रम आखून दिला, आणि टिळकमहाविद्यालयाने साहित्यशाखेसाठी याच अभ्यासक्रमाचा मुख्यतः स्वीकार करावा असें सुचविलें. या अभ्यासक्रमांत सामाजिक शास्त्रांचा समन्वय केलेला आहे. इतिहास-अर्थशास्त्र-राजकारणाबरोबरच त्यांत समाजशास्त्र व तत्त्वज्ञान यांचाहि समावेश केलेला आहे. हा सर्व अभ्यास पौरस्त्य व पाश्चात्य अशा दोनहि पद्धतींनीं करावयाचा असून प्रत्यक्ष भारतीय क्रांतिकारक संघटनेला उपयोगी अशी त्याची आंखणी आहे. सत्याग्रहाच्या दीर्घकालीन लढ्यामुळें या अभ्यासक्रमाप्रमाणें

टिळक-महाविद्यालयाला पुरेसा अवधि मिळाला नाही. तथापि तो विद्यार्थि वर्गांत चांगली मान्यता पावला होता, आणि महाराष्ट्रांतील राष्ट्रीय विचाराच्या बहुतेक मंडळींना तो अभिनव व आकर्षक वाटला होता. राष्ट्रीय शिक्षणाच्या वैचारिक संपत्तीत श्री. जावडेकरांची ही महत्त्वाची भर समजली पाहिजे.

शंकरराव टिळक महाविद्यालयांत अध्यापनाचे काम करूं लागल्यावर एक वर्षानें मीं त्या महाविद्यालयांत प्रवेश केला, आणि थोड्याच काळांत आम्हांमध्यें चांगला स्नेहभाव निर्माण झाला. त्यावेळी गांधींचा महाराष्ट्रांतील खादीप्रचाराचा दौरा संपला होता आणि आगामी लढ्याची राष्ट्रात तयारी चालू होती. यामुळे गांधीवादाविषयी पुष्कळ चर्चा चालत असे. गांधींच्या पुढारीपणावर शंकररावांची दृढ निष्ठा होती, आणि त्यांच्या अहिंसात्मक राजकारणाचें व्यावहारिक दृष्टीनें ते मनापासून समर्थन करीत. तथापि अहिंसेच्या तात्त्विक सिद्धान्तासंबंधी त्यांचे विचार गांधीविचाराहून थोडे निराळे होते. त्यांना त्यावेळी असें वाटे की, टिळकांच्या राजकारणाची जशी गांधींच्या राजकारणात परिणति झाली, त्याप्रमाणें गांधींच्या राजकारणाची अरविंदांच्या राजकारणात परिणति होईल. अरविंदाच्या आध्यात्मिक विचारसरणीचा त्यांच्या मनावर फार खोल परिणाम झालेला होता; आणि "श्रीकृष्णाचा संदेश जगाला अद्यापि द्यावयाचा राहिलेला आहे," अशी त्यांची त्यावेळी समजूत होती. श्रीकृष्णाचा संदेश म्हणजे स्थितप्रज्ञाच्या कर्मयोगाचा संदेश होय. प्रस्तुत कर्मयोगांत निष्कामता असली तरी निरपवाद अहिंसा भौतिकदृष्ट्या आवश्यक मानिलेली नाहीं, अशी रूढ सांप्रदायिक विचारसरणीच शंकरराव योग्य समजत. टिळकांच्या 'गीतारहस्या'पेक्षां अरविंदांच्या 'गीतानिबंधां'त प्रतिपादिलेलें गीतातत्त्व ते अधिक पसंत करीत. 'निष्काम कर्मयोगापेक्षा' 'पुरुषोत्तमयोग' त्यांना अधिक समाधानकारक वाटे. गीतेच्या अनुषंगानेंच शंकराचार्य व रामानुज यांच्या अद्वैत विशिष्टाद्वैत मतांविषयींहि ते बरीच चर्चा करीत. अरविंदांच्या पुरुषोत्तमयोगांत या दोनहि आचार्यांच्या सिद्धान्तांचा समन्वय असल्यामुळें त्यांची विचार-

सरणी त्यांना मान्य झालेली होती. त्यांच्या बुद्धीची समन्वयनिष्ठा दिग्दर्शित करण्यासाठींच ही चर्चा येथें निवेदिली आहे.

पुण्यास आल्यानंतर शंकररावांनीं ' कम्यूनिझम् ' चा आपला अभ्यास वाढविला. याच वेळी ( १९२८ ) महाराष्ट्रांत श्री. जांभेकर यांच्या संपादकत्वाखालीं '**लोकशिक्षणा**'चा नवावतार झाला; आणि उभयत मधील आचारविचारांच्या समानधर्मत्वामुळें शंकररावांचा व त्यांचा स्नेह जमून पहिल्या अंकापासून ते त्या मासिकांत लिहूं लागले. '**लोकशिक्षणां**' त त्यावेळीं त्यांनी ' बोल्शेव्हिक राज्यक्रांती ' संबंधी एक विस्तृत लेखमाला लिहिली. तींतील प्रतिपादनासंबंधीं तरुण कम्युनिस्ट सरदेसाई व शंकरराव जावडेकर यांचा '**लोकशिक्षणां**'त जो वाद झाला त्यांत शंकररावांची समन्वयबुद्धि पुन. एकदा प्रकट झाली. जडवाद हा ' कम्युनिझम् 'चा प्राण होय, हें सरदेसायांचें म्हणणे शंकररावांनी अमान्य केले; आणि मार्क्सवादाचा आध्यात्मिकतेशीं विरोध नाही असे आपले मत निश्चयानें प्रतिपादिलें. तेथपासून मार्क्सवाद व गांधीवाद यांचा समन्वय शोधून काढण्याचे त्यांनीं अविश्रांत परिश्रम केले. १९३० च्या सत्याग्रह-संग्रामात ते शिरोड्याला गेले होते. तेथून त्याना रत्नागिरीच्या तुरुंगात नेण्यात आलें. या तुरुंगवासांत त्यांच्या जीवनाच्या दृष्टीनें दोन महत्त्वाच्या गोष्टी घडल्या. त्यांची एक सहा वर्षांची गोजिरवाणी मुलगी घरीं मेनिंजायटिसनें मृत्युमुखी पडली ! त्यांच्या हृदयावर त्यामुळें फार खोल आघात झाला; आणि याचवेळी महात्माजींच्या अहिंसावादाचा त्यांच्या हृदयानें कायमचा स्वीकार केला. मार्क्सच्या ' कॅपिटल् ' ग्रंथाचे संपूर्ण पारायण याचवेळीं त्यांनीं केलें, आणि समाजवाद सत्याग्रहाच्या अहिंसक मार्गानेंच यशस्वी होऊं शकेल असा त्यांच्या बुद्धीचा अंतिम निर्णय झाला. हीच शंकरराव जावडेकरांची परिणतप्रज्ञेची अवस्था समजली पाहिजे. कारण, तेव्हांपासून गेली दहा वर्षे तें याच जीवनदर्शनाचा आविष्कार अधिकाधिक मनोरमतेनें आपल्या विपुल लेखनांतून करीत आले आहेत. हिंदुस्थानाचा जगाला जो संदेश द्यावयाचा आहे त्याचें स्वरूप त्यांच्या दृष्टीनें आतां स्पष्ट झालें आहे. मानवी समाजाची पूर्णावस्थेचीं स्वप्नें कधींकाळीं यशस्वी व्हावयाची असतील तर अहिंसेच्या

साधनाचाच विकास होत गेला पाहिजे, अशी त्यांची आतां स्वतःची पूर्ण खात्री झाली आहे. युरोपीय संस्कृति भौतिक जडवादाच्या व हिंसात्मक साधनाच्या इतकी आहारी गेली आहे की, आपला नाश टाळण्याचें तिला सामर्थ्य उरलेले नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिस्वातंत्र्य, समता, लोकसत्ता इत्यादि जीवनमूल्यांचा युरोपानें आविष्कार केला खरा, पण या सर्व मूल्यांच्या मुळाशीं असणाऱ्या नैतिक सामर्थ्याची त्यानें उपेक्षा व अवहेलना केली; युरोपाचीं सांस्कृतिक उदार मूल्यें मानवासाठीं जतन करण्याची आवश्यकता आहे; पण त्यासाठीं आध्यात्मिक बलाची जोपासना झाली पाहिजे; गांधींच्या अहिंसावादांत हें आध्यात्मिक बल निर्माण करण्याचें सामर्थ्य आहे, आणि म्हणून सत्याग्रही भारतच जगाला वरील मूल्यांचा लाभ करून घेण्याचा मार्ग दाखवूं शकेल; अशी शंकररावांची आजची दृढ श्रद्धा आहे. हीच भारताची मानवतेला मिळणारी अक्षय्य देणगी होय, असें त्याचें मत आहे. श्रीकृष्णाचा कर्मयोग व गौतमबुद्धाची अहिंसा यांच्या समन्वयानें होणारा अहिंसात्मक सत्याग्रह हेंच तिचें आजचें स्वरूप होय, असें ते प्रतिपादीत असतात.

स्टॅलिनवादी व रॉयवादी असे मार्क्सवादाचे दोन पंथ सध्यां हिंदुस्थानाच्या राजकारणांत वावरत आहेत. आणि राष्ट्रीय सभेमध्येंच एक राष्ट्रीय समाजवादी पक्ष प्रस्थापित झालेला आहे. विशिष्ट देशाच्या विशिष्ट परंपरेप्रमाणें समाजसत्ताक क्रांतीच्या चळवळीला विशिष्ट स्वरूप येणें अपरिहार्य आहे, असें मार्क्सनेंच म्हटलेलें आहे. भारतीय आध्यात्मिक परंपरा व येथील राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं अपरिहार्य झालेला निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग यांमुळें भारतीय समाजवादाला अहिंसेचे आध्यात्मिक अधिष्ठान द्यावें लागणार आहे, असें शंकररावांचें मत असून राष्ट्रीय समाजवादी पक्ष असें अधिष्ठान येथील समाजवादाला मिळवून देईल अशी त्यांची अटकळ आहे. १९३१ च्या **'लोकशिक्षणा'**मध्यें त्यांनीं अशी घोषणा महाराष्ट्रांत प्रथम केली, आणि आतांपर्यंतच्या राजकीय हालचालींकडे पाहिलें असतां त्यांची ही अटकळ हळूहळू मूर्त स्वरूप धारण करीत आहे असें आढळून येईल.

शंकरराव जावडेकर हे एक ध्येयवादी वृत्तपत्र-संपादक म्हणून आजच्या महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. टिळक आगरकरांच्यानंतर 'नवविचारांचा राष्ट्रीय संपादक' म्हणून महाराष्ट्रीय वृत्तपत्रांच्या इतिहासात जावडेकरांचाच उल्लेख करावा लागेल, इतकी त्याची संपादकीय कामगिरी आतापर्यंत होऊन गेली आहे. वृत्तपत्रांचा व्यवसाय हा एक पोट भरण्याचा वैयक्तिक व्यवसाय नसून स्वार्थत्यागपूर्वक देशसेवा करण्याचा तो सामाजिक धर्म आहे, अशी टिळक आगरकराप्रमाणेंच जावडेकरांची मनोधारणा आहे. असहकारयुगात महाराष्ट्रांतील टिळकांच्या राष्ट्रीय पक्षांत दुफळी झाली, आणि गांधींच्या नेतृत्वाला विरोध करणारा एक बलिष्ठ वर्ग निर्माण झाला. महाराष्ट्रात गांधींचे पुढारीपण लोकमान्य करण्यासाठी देव-दास्ताने प्रभृति मंडळींनी या वर्गाशी जी यशस्वी झुंज केली तीत शंकरराव जावडेकर यांचाहि महत्त्वाचा वाटा आहे. गाधीवाद ही एक भावनेची लहर आहे, तिला बुद्धिमत्तेचा शास्त्रीय आधार नाहीं, या विरोधी पक्षाच्या मतलबी प्रचाराविरुद्ध शंकररावानी 'स्वराज्य', 'लोकशिक्षण', 'नवशक्ति' व अलीकडे 'चित्रमयजगत्', 'लोकशक्ति', 'लोकमान्य' या नियतकालिकातून जोरदार हल्ले चढविले, आणि आपल्या तीव्र बुद्धिमत्तेने गांधीवादाचें शास्त्रीय स्वरूप महाराष्ट्रीय बुद्धिवादी लोकासहि पटवून दिलें. 'स्वराज्य' पत्रांतील कित्येक ओजस्वी लेख त्याच्याच लेखणींतून उतरलेले होते, हे आज उघडपणें सांगण्यांत रहस्यभेद होईल असें वाटत नाहीं. गाधींचें राजकारण टिळकांच्या राजकारणास विरोधी नसून टिळकांच्या राजकारणाचें तें यथार्थ परिणत स्वरूप आहे, हे दाखवितांना त्याच्या समन्वयबुद्धीचा मोठा उपयोग झालेला आहे. त्याचप्रमाणें गांधीवादी व समाजवादी कार्यकर्त्यांना महाराष्ट्रात अविरोधानें राष्ट्रकार्य करण्याची प्रेरणाहि त्याच समन्वयबुद्धीनें पुरविलेली आहे.

शंकररावांची वाङ्मयसेवाहि अतिशय मोलाची आहे. महाराष्ट्रांत शास्त्रीय ग्रंथांचें अद्यापि दुर्भिक्ष्यच आहे. सामाजिक शास्त्रांचें तर विशेषच. राज्यशास्त्रावर त्यांनीच प्रथम स्वतंत्र ग्रंथरचना केली. त्यांचा **'राजनीतिशास्त्रपरिचय'** हा आद्य ग्रंथ अद्यापि मराठींत अग्रेसर आहे. श्री. न. चि. केळकर यांनीं पुढें कांहीं वर्षांनीं **'राज्यशास्त्र'** या नांवाचा जो ग्रंथ

लिहिला त्यावर कारागृहांत असतांनाच त्यांनीं एक विस्तृत मार्मिक टीका लिहिली, आणि ती पुढे 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध झाली. तीवरून त्यांचा राज्यशास्त्रांतील थोर अधिकार सहज लक्षांत येतो. त्यानंतर त्यांनीं निर्माण केलेले ग्रंथ एकाहून एक सरस व नवविचारप्रवर्तक असेच झाले आहेत. **'आधुनिक भारत'** या त्यांच्या ग्रंथराजाविषयीं तर बोलावयासच नको. प्रो. वामनराव जोशी यांनी **'गीतारहस्या'**नंतर प्रसिद्ध झालेला महत्त्वाचा मराठी ग्रंथ, म्हणून त्याची थोरवी गायिलेली सर्वश्रुतच आहे ! त्यानंतर आतापर्यंत त्यांचे पाच नवीन ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. 'लोक-शिक्षणा'तून प्रसिद्ध झालेल्या **'आधुनिक राज्यमीमांसे'**च्या दोन भागांत आधुनिक युरोपांतील बहुतेक सर्व प्रख्यात राजनैतिक वादांचा परामर्श घेतलेला आहे, आणि शेवटीं सत्याग्रह-मीमांसा सांगितलेली आहे. राज्यमीमांसेचे हे दोन भाग लास्की, ज्योड, रसेल, कोल प्रभृतींच्या लिखाणाइतके विचारपूर्ण झाले आहेत. याचवेळी वादविवेचन-मालेंत **'लोकशाही'** या नांवाचें त्यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें असून तें इतर भाषात अनुवादण्याइतकें मौलिक विचारांनी भरलेलें आहे. **'अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?'** या नांवाने रस्किनच्या 'Unto This Last'चा शंकररावांनी केलेला अनुवाद पुण्याच्या 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाले'नें प्रसिद्ध केला असून त्याच्या प्रस्तावनेंत जीवनाचें अर्थशास्त्र कोणत्या स्वरूपाचें असलें पाहिजे याची त्यानी मार्मिक चर्चा केली आहे. हा त्यांचा अर्थशास्त्रावरील प्रबंधहि असाच स्वतंत्र विचारांनी भरलेला आहे. **'गांधीवाद'** नांवाच्या त्यांच्या शेवटच्या ग्रंथांत गांदीवादाची संपूर्ण मांडणी आलेली आहे. अल्पाव-धीतच इतक्या भरदार ग्रंथांची रचना करणाऱ्या विचारवंताला साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान मिळाल्यानें अर्थात् संमेलनाचाच खरोखर गौरव होणार आहे. शंकररावांनीं मुख्यतः शास्त्रीय साहित्यच निर्माण केलें असलें तरी ललितवाङ्मयाशींहि त्यांचा मार्मिक परिचय आहे. मराठींतील प्राचीन-अर्वाचीन वाङ्मय त्यांनीं चांगलें अवलोकिलें असून संस्कृत व आंग्ल साहित्यहि त्यांनीं आस्वादिलेलें आहे;आणि विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे वाङ्मयाचें जीवनांत काय स्थान असलें पाहिजे याचा त्यांनी सम्यक्

शास्त्रीय विचार केला असल्याकारणानें साहित्यिकांचें मार्गदर्शन करण्याची शक्ति त्यांच्या अंगी आहे.

शंकररावांचें व्यक्तिगत जीवन त्यांच्या वैचारिक जीवनाशीं योग्य अनुबंध राखणारें आहे. तरुण वयांत त्यांच्यावर अज्ञेयवादाची बरीच छाप होती. रवींद्रनाथांच्या 'साधना' या इंग्रजी ग्रंथांच्या वाचनानें आपण आस्तिक बनलों, असें ते सांगतात. त्यांच्या वडिलांच्या ठिकाणीं उदारपणा होता. थोडा लौकिक धर्मोचारहि होता, परंतु भक्तीचा जिव्हाळा नसावा असें वाटतें. शंकररावांच्या तर्ककर्कश बुद्धिवादाच्या बुडाशी भक्तीचा जिव्हाळा असलेला मला आढळून आला आहे. त्यांच्या पत्नी सौ. सुशिलाबाई सुविद्य व सुगृहिणी आहेत. आपल्या पतीच्या जीवनाशी त्या पूर्णपणें समरस झालेल्या असून त्यांच्या जीवनांत श्रद्धामय भक्तवृत्ति उत्कटतेनें दिसून येते. त्याच्या संगतीने शंकररावाच्या जीवनांतील भक्तवृत्ति जागृत झालेली दिसते. अशा या अनुरूप पति-पत्नीच्या संसारांत समन्वयाचें संगीत आढळले तर त्यांत काय आश्चर्य ? शंकररावांच्या प्राचीन आश्रमपद्धतीवर विश्वास आहे, आणि आपल्या जीवनांत त्याप्रमाणें वागण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. त्यांचा स्वतःचा संसार अगदीच लहान असला तरी त्यांचा संबंधी परिवार मोठा आहे, आणि उभयता पतिपत्नींची वृत्ति विश्वकुंटुंबी आहे. विचार हेंच शंकररावांचें जिवन आहे. तुम्ही त्यांच्याकडे कधींहि जा, त्याना केव्हांही पाहा, ते सदासर्वदा विचारांशीच खेळत असलेले तुम्हांला आढळतील. लेखन, चर्चा, अथवा एखाद्या नवीन ग्रंथाचें वाचन असें त्यांचें त्रिकांडात्मक जीवन असतें. अलीकडे कांही वर्षे शंकररावांना मधूनमधून दम्याशीं झुंजत बसावें लागते, हें दुर्दैव होय ! एकंदरीनें विचार हीच त्यांची कृति आणि विचार हीच त्याची क्रीडा ! विचाराच्या स्वर्गंगेतच त्यांचा जीवनहंस अखंड अवगाहन करीत असतो. प्रख्यात महाराष्ट्रीय सत्याग्रही आचार्य विनोबा यांचे बंधु शिवाजीराव 'गीताई' च्या प्रचारासाठीं दोन वर्षांपूर्वी पुणें साताऱ्याकडे हिंडत होते. तेव्हां इस्लामपुरास शंकररावांकडे त्यांनीं चार दिवस मुक्काम केला होता. तेथून गेल्यावर त्यानीं पत्रद्वारे त्यांच्याविषयींचा आपला अभिप्राय मला कळविला होता. त्यात

त्यांनी पुढील मार्मिक उद्गार काढले होते; " शंकररावांचें घर जसे इस्लामपुरास गांवाच्या एका बाजूस आहे त्याचप्रमाणें त्यांचे मनहि गांवकीपासून सर्वस्वी अलिप्त आहे. त्यांच्या शरीराची बैठक जशी उंच मजल्यावर असते तशी त्यांच्या मनाची बैठक उंच पातळीवर दिसते. त्यांचा अर्थशास्त्राचा व्यासंग जरी दांडगा असला तरी त्यांचा अर्थसंग्रह अगदींच तोकडा आहे ! ते भारतीय संस्कृतीचे अभिमानी असले तरी त्यांच्याभोंवती पाश्चात्य ग्रंथांचीं कपाटें भरलेलीं दिसतात ( भारतीय संस्कृतीमध्ये ते स्वतः राहत असल्यामुळे त्यांना भारतीय संस्कृतीच्या ग्रंथांची तितकी आवश्यकता नसावी, पण पाश्चात्य संस्कृतीचा परिचय पुस्तकांविना कसा होणार, म्हणून पाश्चात्य ग्रंथांचे आधिक्य योग्यच आहे. ) त्यांच्यावर लेखणीचा वरदहस्त आहे असें म्हणण्यापेक्षां त्यांचाच लेखणीवर वरदहस्त आहे, असे म्हणणे अधिक शोभेल. वादविवादामध्यें त्यांचा सूर जरी चढत असला, तरी त्यांच्या बोलण्यांत कधीं कटुता आढळत नाहीं. "

शंकररावांच्या जीवनसमन्वयांत एकच उणीव दाखवितां येईल. ते केवळ तत्त्वचिंतक आहेत. सामाजिक संघटना करून प्रत्यक्ष चळवळी करणाऱ्या लोकनायकाची शक्ति अथवा वृत्ति त्याच्यामध्ये नाहीं. पण हा दोष म्हणण्यापेक्षां ही त्यांचीं जीवनमर्यादा मानिली पाहिजे. शंकररावांना आपल्या मर्यादेचें चांगलें भान आहे. आपल्या मर्यादित क्षेत्रात राहूनच आपला विकास साधावा आणि आपल्या विचारशक्तीच्या साधनाने यथाशक्ति समाजाची सेवा करावी यात त्याना समाधान आहे. जीवनाच्या नवमंत्रशोधकाला आपल्याकडे 'ऋषि' ही पदवी देतात. त्याच्या अंगी जीवनाला वळण लावण्याचेंहि सामर्थ्य असतें. अनेक ऋषींच्या अनेक मंत्रांचें मनन करून त्यांचा वैचारिक समन्वय दाखवून देणाऱ्याला आपल्याकडे 'आचार्य' पदवी दिली जाते. श्री. जावडेकर यांना ही 'आचार्य' पदवी देण्यास कोणाचा विरोध होईल असें मला वाटत नाहीं.

---

# सानेगुरुजींचें साहित्य

## 'पत्री' पासून 'भारतीय संस्कृती' पर्यंत

प. वा. ना. गोखले, इतिहाससंशोधक राजवाडे, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर इत्यादि थोर पुरुषांच्या चरित्रग्रंथांचे लेखक व अमळनेर येथील '**विद्यार्थी**' या गत मासिकाचे संपादक म्हणून ी. पाडुरंग सदाशिव साने, एम्. ए. हे मराठी वाचकांना परिचित आहेतच. तथापि विशेषतः गेल्या दोनअडीच वर्षांत त्यांचे काव्य, कादंबरी, कथा, संवाद, प्रबंध इत्यादि जें बहुविध साहित्य प्रकाशित झालें आहे ते बरेंच अपूर्व असल्यामुळें त्याचा योग्य तो पुरस्कार करण्यासाठी हे चार शब्द लिहिण्यात येत आहेत.

प्रख्यात फ्रेंच विचारप्रवर्तक रोमॉ रोलॉ यांना " आपण का लिहितां ? " असा प्रश्न एकदा करण्यांत आला असतां त्यांनी उत्तर दिले, " कारण, मला तसे करण्याविना गत्यंतरच नाहीं...कारण, लेखन हें माझे विचाराचें व आचाराचे श्रेष्ठ साधन आहे. कारण, माझ्या बाबतीत लिहिणे म्हणजेच श्वासोच्छ्वास करणें वा जगणे होय. " श्री. साने यांच्याविषयींहि असेच म्हणता येईल. त्याचे लेखन म्हणजेच त्याचें जीवन. या म्हणण्यात यत्किंचित अतिशयोक्ति नाही. त्यांचें अंतःकरण अखंड तळमळत असतें आणि ती तळमळ किंचित् हलकी करण्यासाठी ते लेखनाचा आश्रय करितात. यामुळें त्यांनी आतापर्यंत प्रचंड लेखन करून ठेविलें आहे. देशबंधु दास याच्या निधनानंतर त्यांनी फार परिश्रम करून त्यांचे चरित्र लिहिलें. १९३०–३२ च्या सत्याग्रहाच्या लढयात त्यांना अनेकदा कारागृहवास लाभला. या काळांत त्यांनी रात्रंदिवस खपून सारखें लेखन केले. रवीन्द्रनाथ ठाकुर, टॉल्स्टॉय, भगिनी निवेदिता यांच्या कित्येक ग्रंथांचीं त्यांनी सुंदर भाषांतरें केली. 'Amiel's Journal' या टॉलस्टॉय यांनी नांवाजलेल्या सुंदर पुस्तकाचें व तामिळ वाङ्मयात 'वेद' म्हणून मान्यता पावलेल्या प्रख्यात 'कुरळ' काव्याचें त्यांनी मराठींत रूपांतर केलें. याशिवाय कविता,

खंडकाव्ये, नाटकें, लघुनिबंध, कादंबऱ्या आणि गोष्टी अशीहि बरीच रचना केली. यांतील थोडाच भाग गेल्या दोनअडीच वर्षांत प्रकाशित झाला आहे; तथापि प्रसिद्ध झालेल्या कांहीं पुस्तकांवरून त्यांचें साहित्यांतील उच्च स्थान सिद्ध होण्यासारखें आहे. हें साहित्य जो कोणी वाचील त्याला श्री. साने यांचें सर्व लिखाण सत्वर प्रसिद्ध झालें पाहिजे असें वाटल्याविना खचित राहणार नाही.

साहित्याचा मोठेपणा साहित्यिकाच्या जीवनाच्या मोठेपणावरच अवलंबून असतो. साहित्य हा केवळ बुद्धीचा अथवा कल्पनेचा खेळ नव्हे. ज्याने आपल्या जीवनांत उत्कट भावनांचा अनुभव घेतला नाहीं, ज्याच्या दृष्टीपुढे दिव्य ध्येयें कधीं उभीं राहिलीं नाहीत, क्षुद्र वासनांच्या पलीकडे ज्याचें मन गेलें नाही, व्यावहारिक उपयुक्ततेच्या पलीकडील आत्मिक अस्तित्वाचा अनुभव ज्याने चाखला नाही, जीवनाच्या प्रत्यक्ष संग्रामांत न्यायाच्या बाजूने उभें राहण्याचें धैर्य ज्याने दाखविले नाही, ज्याच्या चित्ताला निर्भयतेचा निष्पाप आनंद कधी स्पर्शला नाही, त्याच्या साहित्यांत मानवी मनाला मुग्ध करून टाकणारें सौंदर्य, देहभावाची विस्मृति पाडणारा आनंद आणि प्रत्यक्ष जीवनांतील असत्यांशी व दुःखांशीं झगडा करावयास अवश्य लागणारा मंगलमय आशावाद या श्रेष्ठ साहित्यगुणांची कधीच निर्मिति होणार नाही.

जीवनाचे हे श्रेष्ठ गुण अंगीं असून ज्याचें कलासामर्थ्य उच्च प्रकारचें असतें, याच लेखकाचें साहित्य चिरंतन होतें. श्री. साने याच्या साहित्यांत हे जीवनाचे उच्च गुण सर्वत्र आढळतात. विद्याभिरुचि, स्वातंत्र्यप्रीति आणि आत्मिक शुचितेचा हव्यास हे त्यांच्या जीवनाचे विशेष होत. त्यांचा विद्याव्यासंग दांडगा आहे. मराठी, संस्कृत व इंग्रजी या भाषांतील साहित्य व तत्त्वज्ञान त्यांनी चांगलें अभ्यासिलें आहे. बंगाली, गुजराती आणि हिंदी या भाषाहि त्यांना अवगत आहेत. जगांतील प्रमुख धर्मांचा अभ्यास त्यांनी केला आहे. यामुळे त्यांच्या लेखनांत उदात्त आणि गंभीर विचार परोपरी आढळतात. विद्येमुळे मनुष्याच्या मनाला जो एक उच्च संस्कार प्राप्त होतो तो त्यांच्याठाई आढळून येतो. स्वातंत्र्यप्रीति हा त्यांचा दुसरा महत्वाचा विशेष होय. राजकीय पारतंत्र्य हें हिंदुस्थानाला

सर्वांगांनी नाशकारक झालें आहे अशी त्यांची पक्की खात्री झाली असल्या-मुळे त्यांच्या जीवनांत स्वातंत्र्याचा अखंड ध्यास दिसून येतो. तसेंच त्यांची स्वातंत्र्याची कल्पना राजकीय क्षेत्रापुरतीच संकुचित नाही. भारतीय समाजांत जो सामाजिक विषमतेचा घोर अन्याय सर्वत्र पसरलेला आहे त्याविषयी त्यांच्या मनाला विलक्षण चीड वाटते. आर्थिक दास्या संबंधीहि त्यांना तशीच तळमळ लागलेली आहे. स्वातंत्र्याच्या तळमळी-मुळेच त्यांनी पूर्वीचा केवळ पाठशालीन शिक्षकाचा व्यवसाय सोडून दिला आणि प्रत्यक्ष स्वातंत्र्यसंग्रामांत उडी घेऊन खानदेशांतील सामान्य जनतेंत प्रचार प्रारंभिला. स्वातंत्र्याचा संग्राम म्हटला म्हणजे त्याग आणि दुःखभोग हे आलेच. त्याचाहि त्यांनी आनंदाने स्वीकार केला आहे. आत्मिक शुचितेचा हव्यास हा त्याचा तिसरा विशेष होय. भारतीय संताच्या संगतींत वाढल्यामुळे त्यांच्या जीवनात अन्तर्बाह्य शुचितेची तळमळ अत्यंत उत्कटतेने आढळून येते. आपलें सारें आयुष्य दुःखी देशबांधवांच्या सेवेंत घालवावें, ही त्यांची एकच एक इच्छा आहे. लेखनाहूनहि प्रत्यक्ष सेवाकार्य त्यांना अधिक आवडतें. प्रत्यक्ष सेवा जेव्हा अशक्य होईल त्या वेळीं त्यांची लेखनसेवा चालू होते. ह्या सेवापरायण साधुवृत्तीमुळें त्यांना 'सानेगुरुजी' असें नांव मिळाले असून ते त्यांना अतिशय शोभतेंहि. त्यांना निसर्गाचें, फुलांचें आणि मुलांचें विलक्षण वेड आहे. मुलांशीं ते तात्काल समरस होऊन जातात. आपल्या विद्येच्या आगरांतून या बालमित्रांना अनेक सुंदर सुंदर गोष्टी सांगून त्यांची जीवकुसुमे विकसित करण्यांत त्यांना अत्यंत आनंद वाटतो. लहानपणापासून त्यांचें जीनव आपत्तीच्या शाळेत घडत आलें आहे. यामुळे त्यांच्याजवळ नाना प्रकारचा अनुभव गोळा झालेला आहे. इतके उदार, इतकें पवित्र, इतकें त्यागमय, इतकें ज्ञानपूर्ण, इतकें सेवा-मधुर जीवन आज महाराष्ट्रीय लेखकांत अत्यंत विरळ आहे. इतक्या समृद्ध जीवनाचा लेखक जें साहित्य निर्माण करील तेच अक्षर साहित्य होऊं शकेल. जीवनाची ही समृद्धता त्यांच्या वाङ्मयांत चांगली उतरली आहे.

अलीकडे कित्येक वर्षे साहित्याची संसारांतील जिवंत प्रश्नांशीं फारकत

झाल्यामुळे महाराष्ट्रवाङ्मयांत कृत्रिम कलाविलास, नकली सौंदर्य आणि विचाराचा उथळपणा यांना ऊत आलेला दिसतो. साहित्याला पराक्रमी व्हावयाचें असेल तर जीवनातील पुरुषार्थांना डावलून चालणार नाही. जीवनाशी सत्यनिष्ठ राहावयाचें म्हटलें म्हणजे लेखकाला श्रेयोर्थी साधक बनलें पाहिजे. लोकभय, राजभय मृत्युभय इत्यादि भयापासून मुक्त झाल्याविना समाजांतील सत्य गर्जून सांगण्याचें सामर्थ्य येणार नाही. ही सत्याची निर्भय गर्जना साहित्यांत घोषविणारा महान् साहित्यिक महाराष्ट्रात अद्याप निर्माण व्हावयाचा आहे. आजचे महाराष्ट्रसाहित्य कृपण भावना व्यक्त करणारें आहे. धर्माच्या नावाखाली भ्याड लोकाकडून अत्यंत रटाळ विचार एकीकडे प्रकट होत आहेत, तर दुसरीकडे नवमतवादाच्या नावाखाली हिडीस कामुकपणा कलेच्या नांवाने बोकाळू लागला आहे. राष्ट्रीय म्हणविणाऱ्या कित्येक लोकाचे लिखाण प्रांतिक मत्सर, जातीय द्वेष इत्यादि विषारी भावनांनी ग्रस्त झालें आहे. साहित्यांत जो एक आनंद-संप्रदाय वाढत आहे त्याचा आनंद जीवनाबाहेरील कल्पनानिर्मित थिल्लर गोष्टीवर उभारलेला आहे. वास्तववाद्याच्या लिखाणात वास्तवतेचा मागमूसहि सापडत नाही, आणि ध्येयवाद तर आम्हाला मान्य नाही, असें ते स्वतःच ओरडून सांगत आहेत! अशा वेळी श्री. साने यांचें प्रसिद्ध झालेलें वाङ्मय मनाला आश्वासन देणारे, साहित्यावरील श्रद्धा वाढविणारें असें झालें आहे.

'**पत्री**', '**श्यामची आई**', '**श्याम**', '**विश्राम**', '**सोन्या मारुति**' व '**भारतीय संस्कृति**' अशी त्यांची लहानमोठी सहा पुस्तकें गेल्या दोनअडीच वर्षांत प्रकाशित झाली आहेत. '**पत्री**'मध्ये देवभक्तिपर व देशभक्तिपर कविता असून 'सत्याग्रही' नावाचें एक खंडकाव्य आहे. देशभक्तीच्या कवितांत हृदयाची आर्त भावना प्रकट झाली असून सत्कर्मांमध्ये आपले जीवन व्यतीत व्हावें अशी तळमळ व्यक्त झाली आहे. देशभक्तीच्या कवितात जन्मभूमीची सुंदर स्तोत्रें असून स्वातंत्र्यप्रीति रसरसलेली आहे. 'सत्याग्रही' ह्या खंड काव्यांत अस्पृश्यता-निवारण, हिंदु-मुसलमानांचें ऐक्य, ध्येयवादाची महती, महात्मा गांधी आणि रवींद्रनाथ ठाकुर यांचे संदेश, सत्याग्रहयुद्धनीति इत्यादि विषय

आले आहेत. हा तेजस्वी काव्यसंग्रह प्रसिद्ध होतांच खानदेशच्या खेड्यापाड्यांत त्याचा प्रसार होऊं लागला, म्हणून तो तात्काळ सरकारच्या रोषास बळी पडला! राष्ट्रसभेच्या प्रधानमंडळाने त्यावरील बंदी नुकतीच उठविली हे योग्यच झालें. या संग्रहांतील बहुतेक कविता तुरुंगांत तयार झाल्यामुळे त्यांच वेळीं सामान्य जनांत त्यांचा प्रसार झाला होता. सानेगुरुजींचे हृदय समजून घेण्याला हा काव्यसंग्रह अत्यंत उपयोगी आहे. त्यांची भक्ति, त्यांची स्वातंत्र्यप्रीति, त्यांची विरक्ति आणि त्यांची विनयवृत्ति येथे एकवटून पाहावयास सापडते.

'**श्यामच्या आई**'मध्ये कोकणामधील साध्याभोळ्या संस्कृतीचें करुणरसपूर्ण शब्दचित्र रेखाटण्यात आलें आहे. साधी आणि शुद्ध मराठी भाषा, संसारातील नित्याच्या गोष्टींचें प्रेमाने केलेलें वर्णन, कुटुंबांत नित्य येणारे सुखदुःखाचे प्रसंग, भाविक मनाची श्रद्धापूर्ण वृत्ति, वात्सल्य, सुहृद्भाव इत्यादि कोमल भावाचा उद्रेक, कोकणांतील निसर्गसौंदर्याचें वर्णन, तत्कालीन समाजातील बऱ्यावाईट गुणदोषाचे यथार्थ दर्शन इत्यादि विविध गुणामुळे हें पुस्तक मराठी वाङ्मयात अजरामर होऊन राहणार आहे.

'**श्याम**' या पुस्तकात विद्यार्थिदशेचें असेच मनोरम चित्र आलें आहे. वरील दोनहि पुस्तकाना ग्रंथकाराने आपल्या चरित्रातील गोष्टीचा आधार घेतला आहे. तथापि ती पुस्तकें त्यांची चरित्रे नव्हत, तर कल्पनाचित्रेंच होत.

'**विश्राम**' हा चार गोष्टीचा संग्रह आहे. 'मोलकरीण' ह्या गोष्टीत दरिद्री आईबापानी शिकवून मोठा केलेला मुलगा आय्. सी. एस्. झाल्यावर त्याना विसरतो, बापाचा अपमानदुःखाने अंत होतो, आई आपल्या मुलाच्या घरी मोलकरीण म्हणून राहते, आणि शेवटीं त्या मुलाला पश्चात्ताप होऊन त्याचें पुनर्मीलन होतें. 'शशी'च्या गोष्टींत आजच्या कृत्रिम शिक्षणपद्धतीत बालकाच्या स्वाभाविक प्रवृत्ती कशा चुरडल्या जातात याचें भेदक वर्णन असून मुसलमानाच्या विरुद्ध सध्या जो कोठे कोठे तामसी प्रचार केला जात आहे त्याचा ओंगळपणा दर्शविला आहे. 'श्यामची आत्या'ही गोष्ट 'श्यामच्या आई'सारखीच आहे. 'विश्राम' ह्या कथेंत मालक आणि मजूर याच्यामधील विषम संबंधाची कल्पना रंगविली आहे.

**'सोन्या मारुति'** या पुस्तकांत नाट्यमय संवाद आहेत. त्यांत हिंदुस्थानांत जे अनेक दलित वर्ग विखुरले आहेत त्याचें दर्शन घडविलें असून त्यांचें दुःखनिवारण हीच परमेश्वराची खरी पूजा होय, असें उपदेशिलें आहे.

**'भारतीय संस्कृति'** हा एक मोठा प्रबंध असून त्यांत अद्वैत, बुद्धीचा महिमा, प्रयोग करणारे ऋषि, वर्ण, कर्म, भक्ति, ज्ञान, संयम, चार पुरुषार्थ, चार आश्रम, स्त्रीस्वरूप, मानवेतर सृष्टीशीं प्रेमाचे संबंध, अहिंसा, ध्येयांची पराकाष्ठा, प्रतीकें, मृत्यूचे काव्य इत्यादि तेवीस प्रकरणें आहेत. भारतीय संस्कृतीचीं मूलतत्त्वें समजून घेण्याच्या दृष्टीनें हा प्रबंध अत्यंत उपयुक्त झाला आहे. कर्म, अहिंसा, प्रतीकें, हीं प्रकरणे तर फारच उद्बोधक झालीं आहेत.

सानेगुरुजींचें हें सर्व साहित्य अनेक दृष्टींनी अपूर्व असें झालें आहे. सध्या समाजांत नानाप्रकारचे वाद उत्पन्न झाले असून साहित्यांतहि त्यांचे प्रतिध्वनि निघूं लागले आहेत. आत्मिकता आणि भौतिकता, संयम आणि स्वैराचार, वैराग्य आणि भोग, व्यक्तिवाद आणि समाजवाद, आदर्शवाद आणि वास्तववाद, रूढनीति आणि नवनीति इत्यादि परस्परविरोधी द्वंद्वांपैकीं कोणत्याहि एका कल्पनेच्या आहारीं न जाता जीवनाच्या दृष्टीनें त्या सर्वांमध्ये जें ग्राह्य आढळून येईल त्याचा संग्रह करणाऱ्या उच्च समन्वयाची आज आवश्यकता उत्पन्न झाली आहे. या समन्वयालाच **'जीवनांतील सत्य'** म्हणतां येईल. या सत्याची अखंड साधना करणाऱ्या पुरुषासच साहित्यांतून समाजाला तें सत्य दाखविण्याचें सामर्थ्य येईल. सानेगुरुजींच्या साहित्यामध्यें ही समन्वय दृष्टि सर्वत्र राखलेली आढळते. सनातन्यांपासून साम्यवाद्यांपर्यंत त्यांना जेथें जेथें सत्यांश आढळला तो माक्षिक वृत्तीनें, साक्षेपानें ग्रहण करून त्यांनी आपल्या साहित्याच्या मधुपुटांत सांठविला आहे. त्यांच्या साहित्यांत हेतुपूर्वक प्रचार आहे, पण तो केवळ सत्याचाच प्रचार आहे. कोठेंहि विकारशील एकांतिकता नाहीं. यामुळें त्यामध्ये अत्यत उन्नत, उदार, असे आर्यभाव प्रकट झाले आहेत. जीवनांत अशा आर्यभावनांची प्रस्थापना करणें हें साहित्याचें प्रधान कार्य होय. श्री. साने यांचें साहित्य असल्या आर्यसाहित्याचा चांगला आदर्श म्हणून मान्य करण्यास मला संकोच वाटत नाहीं.

सानेगुरुजींच्या साहित्यांत ज्ञान असलें तरी पांडित्य नाहीं. तें प्रेमानें अपरंपार भरलें आहे. त्यांत दुःखितांविषयीं दया, पीडकांविरुद्ध त्वेष, सेवेचा उत्साह आणि त्यागाची तळमळ आहे. जीवनाला जागृत करून पुरुषार्थाच्या मार्गाकडे प्रवृत्त करण्याची प्रेरणा त्यांत भरपूर आहे. यामुळें महाराष्ट्रांतील तरुण स्त्रीपुरुषांच्या हातीं हें साहित्य अवश्य पडलें पाहिजे. प्राचीन परंपरा आणि आधुनिक प्रगति याचा मनोहर संगम या साहित्यांत आढळतो. आज महाराष्ट्रांत नवी पिढी आपल्या प्राचीन परंपरेंतील सौंदर्याला, साधुतेला पारखी होत चालली आहे. हें साहित्य ह्या पिढीतील लोकाना तें सौंदर्य व ती साधुता पटवून देईल. सनातनी विचारांत गुरफटून गेलेल्या लोकांना हें साहित्य आजच्या जिवंत प्रश्नांकडे कसें पाहावें हें शिकवील. श्रद्धा आणि बुद्धि यांचा विरोध मिटवून त्यांचे सहकार्य हें साहित्य घडवून आणील. जीवन आणि कला यांच्यामध्यें आज जी एक खाडी निर्माण झाली आहे ती भरून काढून हें साहित्य जीवनाला सौंदर्य आणि कलेला जिवंतपणा आणून देईल. कारण, हें साहित्य जीवनाशीं सर्वांशानें समरस झालेल्या सत्यनिष्ठ साधकानें अंतरीच्या तळमळीने निर्माण केलें आहे. तें केवळ आनंद देण्यासाठीं प्रवृत्त झालेलें नाहीं. जीवनाच्या निर्मितीसाठीं त्याची निर्मिति झाली आहे. आज जगात रशियन साहित्यिकांना जें मानाचें श्रेष्ठ स्थान मिळालें आहे त्याचे कारण म्हणजे रशियन साहित्यकार आपल्या कल्पनाकुंजाचा त्याग करून जीवनांतील दुःखांच्या खाईंत जाऊन उभे राहिले आणि प्रत्यक्षाचा परिचय करून घेऊन त्यांनीं आपल्या भोंवतालच्या जीवनाला वाचा फोडली. आधुनिक काळीं महाराष्ट्रांत समाज-जीवनाशीं सर्वांशानें समरस झालेला असा साहित्यकार कोण आहे, असा प्रश्न विचारल्यास सानेगुरुजींकडेच कोणालाहि बोट दाखवावें लागेल. **महाराष्ट्रांतील पहिला सत्याग्रही साहित्य निर्माता** म्हणून सानेगुरुजींचें नांव महाराष्ट्राच्या इतिहासांत चिरकाल प्रकाशत राहील. सानेगुरुजींच्या साहित्यांत तंत्रवादाला मुळींच स्थान नाहीं. त्यांचें लिहिणें कळकळीच्या प्रेमाचें असतें, त्यांत दिखाऊपणा नसतो. तथापि त्यांच्यामध्यें स्वाभाविक उच्च कलाशक्ति आहे. '**श्यामच्या आई**'-मध्ये ती अत्यंत मोठ्या प्रमाणांत व्यक्त झाली आहे. अन्य ठिकाणीं कोठे

कोठे रचनेची शिथिलता, रसापकर्ष करणारी पाल्हाळ-वृत्ति, कल्पनाचा ओबडधोबडपणा इत्यादि दोष आढळतात; हे दोष त्यांनी आपल्या पांडित्याचा उपयोग करून घेण्याचे मनांत आणिले तर ते सहज दूर करूं शकतील. त्यामुळे त्यांच्या साहित्याला अधिक संस्कार लाभेल. त्यांची प्रभा सर्वांना दिपवूं शकेल. भावना हाच साहित्याचा प्राण हे खरें; परंतु आजच्या संशयवादाच्या काळांत या भावनांना विवेचक बुद्धीची जोड भरपूर मिळाल्याविना ती भावना बुद्धिमंतांना तरी पुरेशी जागृत करूं शकणार नाहीं. सानेगुरुजींचा भर शुद्ध भावनेवर अधिक असतो. सामान्य जनतेला जागृत करण्याच्या कामीं ते यशस्वी होत आहेत; पण आपल्या बुद्धीचा उपयोग करून सुशिक्षित बुद्धिवादी वर्गालाहि त्यांनी आपला संदेश पोंचविला पाहिजे. असें करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं वसत आहे अशी माझी समजूत असल्यामुळें सानेगुरुजींच्या वाढत्या विकासांत या अपेक्षा पूर्ण झाल्याविना राहणार नाहींत, असा मला विश्वास वाटतो.

---

# श्यामची आई

## सानेगुरुजींचा नवा निर्मळ ग्रंथ

जननी, जन्मभूमि आणि जगदंबा या त्रिविध रूपानें नटलेल्या मातृ-देवतेचे श्री. साने हे प्रेमळ पुजारी आहेत. ‘ पत्री ’ मध्यें जन्मभूमि आणि जगदंबा यांची स्तोत्रें गाइली होतीं. ‘ श्यामची आई ’ या ग्रंथांत त्यांनीं जननीचा महिमा वर्णिला आहे. या दोन पुस्तकांच्या द्वारा त्यांनीं आपल्या जीवन-देवतांचें पूजन परिपूर्ण केलें आहे. ‘ सीदन्ति सन्तो विलसन्त्यसन्तः ’ याप्रमाणें भिकार पुस्तकें गौरवानें मिरवत असतां ‘ पत्री ’सारखें सात्त्विक पुस्तक सरकारच्या रोषाला बळी पडावें हें आजच्या रियासतीला साजेसेंच आहे. जीवन आणि वाङ्मय यांचा परस्पर संबंध कसा असतो आणि जीवनाच्या तळमळींतूनच आदर्श वाङ्मय कसें निपजतें याचें उदाहरण म्हणून ‘ श्यामची आई ’ या पुस्तकाचा निर्देश आनंदानें करतां येईल.

काहीं वर्षांमागे अमळनेरच्या ' विद्यार्थी ' मासिकांत श्री. साने यांचा ' श्यामची आते ' या नावाचा एक सुंदर लेख आला होता. पवित्र जीवनाचें एक आदर्श शब्दचित्र म्हणून मला तो लेख अत्यंत आवडला होता. अशीं चित्रे विपुलतेनें महाराष्ट्राच्या हातीं पडावीं असें मला वाटे. श्री. साने यांच्या ' श्यामच्या आई ' ने ही इच्छा कांहीशी सफल होत आहे.

**जीवनाची शब्दमयमूर्ति म्हणजे वाङ्मय.**

' श्यामची आई, ' हे ' आईच्या प्रेममय थोर शिकवणीचे सरळ, साध्या व सुंदर संस्कृतीचें एक करुण व गोड कथात्मक चित्र ' आहे. ' श्यामची आई ' वाचून वाचकांच्या हृदयात मातेबद्दल प्रेम, भक्ति व कृतज्ञता यांच्या अपार भावना उत्पन्न होतील यांत शंकाच नाही. पण हृदयशुद्धि होऊन त्यांच्या जीवनांत नवीन दृष्टि, नवीन आशा आणि नवीन ध्येयवाद निर्माण होईल. जीवनांत परिवर्तन घडविण्याची शक्ति या पुस्तकांत खचित आहे. इतके सत्यपूर्ण, अकृत्रिम आणि जिवंत वाङ्मय वारंवार पैदा होत नाही. आश्रमांतील स्नेह्याच्या आग्रहामुळें श्याम आपल्या आईच्या आठवणी सांगतो. प्रार्थनेनंतर संध्याकाळी उघड्या आकाशाखाली बसून या कथा चालतात. अशा एकंदर ४२ ' रात्री ' यात आहेत. 'आरंभी' मनुष्याचा मोठेपणा आईबापांवरच कसा अवलंबून असतो याचें विवरण आहे. कोंकणातील ब्राह्मण घराण्याचे, एके काळी श्रीमंत परंतु पुढें भाऊबंदकी, कज्जेदलाली, कर्जबाजारीपणा यामुळे मोडकळीस आलेल्या आणि शेवटी अन्नालाहि महाग झालेल्या सात्त्विक, सदाचारसंपन्न अशा कुटुंबाचे करुणा उत्पन्न करणारें वर्णन एवढाच या पुस्तकाचा विषय आहे. तथापि हा साधाच विषय इतक्या तन्मयतेनें, श्रद्धेनें, आपुलकीनें आणि सत्यतेनें वर्णिला आहे कीं, वाचकांचे हृदय तद्रूप होऊन जाते. रस बाह्य वस्तूंत नाहीं. तो मनुष्याच्या हृदयांत आहे आणि अशा हृदयाच्या रसानें रंगून जेव्हां मनुष्य लिहील तेव्हां त्याला वाङ्मयांत कायमचें स्थान मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. केवळ कल्पनांचे तरंग नाचीविणें, शब्दांच्या कसरती करणें, वाङ्मय प्रकाराचें अनुकरण करणें, अथवा तन्त्राची नक्कल उठवून देणें म्हणजे वाङ्मय नव्हे. जीवनाची शब्दमय मूर्ति म्हणजे वाङ्मय. वाङ्मय निर्माण करूं इच्छिणारा जर केवळ

स्वतःच्या जीवनाशीं प्रामाणिक राहील आणि परिणाम घडवून आणण्याच्या मोहांत सांपडणार नाही तर तो कितीतरी चांगलें वाङ्मय निर्माण करूं शकेल. 'श्यामची आई' या पुस्तकांत वाङ्मयाचा हा पहिला आणि महत्वाचा गुण उत्कटतया प्रकट झाला आहे.

## रोजच्या जीवनांत केवढी गोडी असते !

'श्याम'च्या आठवणी या केवळ कल्पनेनें रचलेल्या नाहीत. ग्रंथकाराच्या अनुभवातील रसांनीं त्या ओतप्रोत भरलेल्या आहेत. आत्मकथेचा जिव्हाळा लाभल्यामुळें 'श्यामच्या आई'त कृत्रिम कलाविलास नाही. स्वतःच्या भावना सत्यनिष्ठेनें वर्णिल्यामुळे तीत उच्च कला प्रकट झाली आहे. ग्रंथकाराला आपल्या कथा-विषयाबद्दल प्रेम वाटलें पाहिजे. 'श्यामच्या आई'त ग्रंथकारानें इतकें प्रेम प्रकट केलें आहे की, संसारांतील अगदी नेहमीच्या प्रसंगांना अनुपम माधुर्य आले आहे. सबंध पुस्तकांत एकहि गोष्ट अशी दाखविता येणार नाहीं की जींत अद्‌भुतता अथवा अकल्पितता आहे. रोजच्याच घडणाऱ्या घटना-मुलांची भाडणें, बायकांचीं कामें-धामें, पुरुषांचे व्यापार-उदीम, कुटुंबांतील प्रेम-द्वेष, जीवनाच्या आशा-निराशा, अगदीं-अगदी नित्याचा व्यवहार. पण हा सारा नीरस व्यवहार जिवंत आणि रसमय झाला आहे. रोजच्या व्यवहारांत इतकी गोडी असते याची आपण अतिपरिचयानें आठवणच विसरलों आहों. खोट्या महत्त्वाकांक्षेच्या नादीं लागून, काल्पनिक स्वर्गाच्या आणि कलेच्या कृत्रिम आनंदाच्या मागें धांवून आपण जीवनांतील हा स्वर्ग, ही कला लाथाडीत आहों ही केवढी भूल आहे याची जाणीव या पुस्तकाच्या वाचनानें होते.

## कोंकणची साधी संस्कृति

प्रगतीच्या नांवानें आपण इतके कृत्रिम आणि जड होत चाललों आहों कीं आपणांला साधें सौंदर्य प्रतीतच होत नाहीं. आपल्या भोंवतालच्या वस्तुजातांशीं आपली इतकी फारकत झाली आहे की आपल्या भाषेंत, चालीरीतींत, आपल्या आशाआकांक्षांत आपण अगदीं उथळ बनलों आहों. आत्मिक संबंध असल्याशिवाय आपल्या सर्व कृतींत जिवंतपणा

येणार कसा ? श्री. साने यांच्या या पुस्तकांत जीवनाशीं आत्मिक संबंध टिकविलेला आढळून येईल. पुस्तकाची भाषा इतकी घरगुती आहे कीं, आपण प्रत्यक्ष माणसांशींच बोलतों आहों इतका भास निर्माण होतो. ओंव्या, गाणीं, उखाणे, म्हणी यांची इतकी सहज पेरणी झाली आहे कीं, या अव्याज मनोहरपणाचें कौतुक वाटतें. कोंकणची संस्कृति ती काय? केळी–पोफळी, द्रोणपत्रावळी, गाई–मांजरें, सुकंबाचें लोणचें, कुळिथाचें पिठलें, खांडवी, पातोळे, नारळाचें घाटलें, फार झाले तर श्रीमंतांच्या घरीं श्रीखंडाच्या वड्या. साधेपणा तर विचारूंच नका. चौघडी पांघरायला. विरलें पावसांत डोक्यावर. कोंकणाच्या स्त्रीजीवनांत प्रसंग ते कसले? वडा–तुळशीची पूजा, दक्षिणा-प्रदक्षिणा, नवस-नजराणा, लग्न-कारणें, व्रते-उद्यापनें, मुलीचें माघारपण, शेजारणीचें बाळंतपण. मुलांच्या आयुष्यांत काय घडावयाचें ? पोहणें, खेळणें, श्लोक-स्तोत्रें पाठ करणें, भांडणें-झगडणें, शिकणें–सवरणें. पुरुषांचे जीवन तरी काय ? शेत-वाडी, वैरण-काडी, गुरें, गोठा, कर्जवाम, स्नान-संध्या, देव-देवतार्चन. तथापि या सर्व संसारांत मानवी हृदय गुंतले आहे आणि त्या हृदयाची धडपड, खडखड अखंड चाललेली आहे. या हृदयाच्या प्रेमाचे चित्रण हें कलेचें कायमचे कार्य आहे. अनेक संकटांतून, मोहांतून, दुःख-सुखाच्या अनुभवांतून मानवी आत्म-शक्तीचा चाललेला प्रवास प्रदर्शित करणे, त्याचें अंतिम स्थान प्रेममय आहे याची श्रद्धा निर्माण करणें हें वाङ्मयाचें कार्य. श्यामच्या आईनें हें कार्य उत्तम तऱ्हेनें केलें आहे. यामुळेंच या पुस्तकाला वाङ्मया-चा उत्तम नमुना म्हणून मी म्हणतों.

### कुटुंबापलीकडे पाहण्याची जरूरी

श्यामच्या आईचा अंत अतिशयच दारिद्र्यांत, दुःखांत झाला. आज घरोघर बहुतेक असाच प्रकार चालला आहे. यामुळें श्यामच्या आईच्या चरित्राला एक राष्ट्रीय महत्त्व आलें आहे. हें दुःख कांहीं थोडे सुखवस्तु आणि श्रीमंत लोक सोडले तर जवळजवळ सार्वत्रिक झालें आहे. या असंख्य मातांचें हें दुःख कसें आणि केव्हां दूर होणार ? केवळ भावना-वश होऊन अश्रु गाळण्यानें या दुःखांचा परिहार होणार नाहीं. एखाद-

दुसऱ्या माणसानें कितीहि परिश्रम केले तरी आपल्या मातेचें दुःख दूर करणें त्याला अशक्य आहे. कुटुंबजीवनाची ही नासाडी दूर करण्यासाठी आपणांला केवळ कौटुंबिक विचारांच्यांवर चढलें पाहिजे. आपल्या घरातील ही दुःखें दूर करण्यासाठी आपल्याला सामाजिक विचार केला पाहिजे. आणि भारतमातेचें दुःख दूर करण्यानेंच आपल्या माता सुखी होऊं शकतील हें जाणलें पाहिजे. खऱ्या पुत्रांचें कार्य भारतसेवा हे आहे. भारतमातेच्या सेवेंतच मातृसेवा सांठविली आहे. ही भारत-सेवा संकुचित अशा देशाभिमानाने केल्याने आपण कृतकार्य होणार नाहीं. यासाठीं आपणाला अखिल मानवतेशीं प्रेमभावाने सहकार्याने वागण्यास शिकले पाहिजे. म्हणजेच देशाभिमान हा धर्मवृत्तीनें शुद्ध करून घ्यावयास हवा. अहिंसा वृत्तीनें श्रमजीवि बनून साध्या राहण्यांतील काव्य जाणून विषमतेशीं अखंड शांतिसंग्राम चालविल्यानेच आपले जननी, जन्मभूमि आणि जगदंबा याचे ऋण फिटेल हा साने यांचा या ग्रंथाच्या द्वारें निश्चित संदेश आहे.

## सर्वांगसुंदर ग्रंथ

भाषा साधी पण मोहक आहे. वर्णने अलंकाररहित पण वेधक आहेत. रूपशील आहे, पण पाल्हाळ नाहीं. उपदेश आहे, पण कंटाळवाणेपणा नाहीं. गोष्टी, आख्यायिका, अवतरणें मधून मधून सहज आल्यानें रुचिरता वाढली आहे. जागोजाग थोडी फार समाजदोषावर टीका आहे. नवीन समाजघटनेचीं तत्त्वें सूचित केली आहेत. कथानकाचा ओघ सर्वत्र अखंड आहे. वाक्यरचना बहुतेक ठिकाणी सुटसुटीत सुभाषितमय झाली आहे. देशसेवेच्या आश्रमजीवनाची पार्श्वभूमि घेऊन मातृमहिमा वर्णिला आहे. ईशसेवेचें अनुसंधान राखून देशसेवा प्रकट केली आहे. अशा सर्वांगसुंदर पुस्तकाची २५० पृष्ठांना एक रुपया ही अगदींच अल्प किंमत आहे. या पुस्तकाचा प्रसार साऱ्या महाराष्ट्रांत झाला पाहिजे. विद्यार्थ्यांचें हा आवडतें पुस्तक झालें पाहिजे इतकी त्याची योग्यता आहे. मातृभक्त महाराष्ट्र त्याचें चीज करो.

---

# 'रंजन' रहस्य

शिक्षणाच्या द्वारा ज्यांनीं जीवनांत दूरवर प्रवेश केला आहे असे महाराष्ट्राचे दोन गुरुजी विद्यार्थि-वर्गांत विशेष प्रसिद्ध झाले आहेत. एक अमळनेरचे साने गुरुजी व दुसरे येवल्याचे आपटे गुरुजी. या दोघाही गुरुजींनी शिक्षणाच्या साहाय्याने अनेक तरुणांच्या जीवनांत पुरुषार्थाची प्रेरणा निर्माण केली आहे. इतकेंच नव्हे तर साहित्याचे द्वाराहि तेंच कार्य त्यांनी अखिल महाराष्ट्रांत चालू केलें आहे. साने गुरुजींचें साहित्य अद्यापि पुष्कळच अंधारांत पडून राहिले असलें तरी जो कांहीं थोडा भाग प्रकाशित झाला आहे त्यावरून त्यांच्या साहित्याचें जिवंत स्वरूप लोकांच्या नजरेला येऊन चुकलें आहे. आपटे गुरुजींचें साहित्य आतां कोठें प्रकाशांत येऊं पाहात आहे. त्यांच्या 'जवाहरलाल' ने पहिल्या भेटीतच महाराष्ट्रांतील विद्यार्थ्यांचें आणि सामान्य जनतेचें चित्त वेधून टाकलें आहे. मला अशी आशा आहे की, आपटे गुरुजीचे सारें वाङ्मय यापुढें क्रमाक्रमाने वाचकांचे हातीं पडेल आणि साने गुरुजींच्या वाङ्मयाप्रमाणेंच आपटे गुरुजींच्या वाङ्मयानें महाराष्ट्रातील सामान्य जनतेला जीवनाचे उच्च संस्कार मिळत राहतील.

आपटे गुरुजींच्या लेखणींत विविध रंग भरलेले आहेत, हें 'कुटुंब-रंजना' वरून सहज दिसून येण्यासारखें आहे. चरित्र, काव्य, कथा कादंबरी, निबंध इत्यादि विविध रूपाचें साहित्य त्यांनी निर्मिलें आहे. हें सारें साहित्य केवळ मनःकल्पित नसून जीवनाच्या अनेकविध अनु-भवांवर आधारलेलें आणि उभारलेलें आहे. अशा प्रकारच्या साहित्यालाच जीवन-साहित्य असें नांव देतां येईल. जीवनांत वर्षानुवर्षें ध्येय दर्शना-साठीं साधक वृत्तीनें जी तपस्या चालते, ती जेव्हा साहित्याचे स्वरूप धारण करते त्या वेळी साहित्यांत जीवनाला मार्गदर्शन करण्याचें सामर्थ्य निर्माण होतें. साहित्य ही जीवनाची हुंडी होय. साहित्यकाराच्या जीवनांत अत्यंत परिश्रमपूर्वक जें अनुभव-धन निर्माण होतें तें समाजाला

अनायासें उपलब्ध व्हावें म्हणून साहित्याची हुंडी काढली जाते. ही हुंडी जीवनाच्या सराफ–कट्टयावर समाजाला वटवितां आली पाहिजे. आणि तिच्यांतील अनुभव–धनाचा आपल्या जीवनसिद्धीसाठी विनियोग करितां आला पाहिजे. हीच साहित्याची खरी रंजकता होय. जीवन–रसानें रंगलेलें साहित्यच रंगवूं आणि रंजवूं शकेल.

कथा–साहित्यांत कल्पित घटना वर्णिलेल्या असल्या तरी त्या जीवनांतील सत्याचा आविष्कार करण्यासाठीच असतात. कल्पित म्हणजे असत्य नव्हे. असत्यानें आत्म्याची कोणतीच भूक शमत नाहीं, उलट त्याची फसवणूक झाल्यानें अशांति निर्माण होते. आणि ज्यानें अशांति निर्माण होईल त्यानें रंजन कसें होऊं शकेल ? म्हणून कोणत्याहि उच्च साहित्यांत जेव्हा मन रमतें त्यावेळीं जीवनाच्या साऱ्या क्षुधा तृप्त झालेल्या आढळून येतात. बोध, नीति आणि आनंद यांचें कधी जीवनांत वैर आढळत नाहीं. त्याचप्रमाणें जीवनाचें संपूर्ण दर्शन करविणाऱ्या साहित्यांतहि त्यांचा विरोध कधीं आढळत नाहीं. बोध–हीन नीति ही केवळ जड यान्त्रिक क्रिया होय. बोध आणि नीति या विरहित आनंद निराळा आढळतच नाही. या तिघांचें सुंदर मीलन जेथें होतें तेथेंच जीवनाला गाढ शांति प्राप्त होते.

'कुटुंब–रंजन' मधील कथा एकामागून एक वाचीत गेल्यास वाचकाला विविध प्रकारचा बोध होईल. जीवनाच्या नीतीचें दर्शन घडेल आणि सात्विक आनंदाची प्राप्ति होईल. यातील भाषा सुबोध आहे, वर्णनें अर्थपूर्ण आहेत. उपरोध, विक्रोक्ति, विनोद इत्यादि साधनांनीं जीवनाचा बोध वाचकांचे गळी उतरविण्याचा प्रयत्न करण्यात आला असल्यानें बोध–वाङमयाचा रुक्षपणा यांत नाहीं.

सर्वत्र रसाळपणा भरून राहिला आहे. यांतून ज्या उदार भावना व्यक्त करण्यात आल्या आहेत, त्यांचा समाजांत जर सर्वत्र प्रसार होईल तर समाज–जीवन झपाटयानें समृद्ध होईल. नवराष्ट्र–निर्मितीसाठी ज्या सामाजिक सद्गुणांची सध्या विशेष आवश्यकता उत्पन्न झाली आहे त्या सद्गुणांची वाचकाचे मनांत आवड उत्पन्न होईल अशी दृष्टि या कथांत प्रामुख्यानें आढळून येईल. स्वावलंबन, शिस्त, ध्येयनिष्ठा, अन्यायाचा

प्रतिकार इत्यादि तत्त्वांचें महत्व खुबीदारपणानें वर्णिलें गेलें आहे' 'मुक्ताफळांचा–लाभ' ही कथा शुद्ध साहित्याच दृष्टीनेंहि वाचनीय झाली आहे. 'पतींची–सभा' या मधील वैवाहिक जीवनावरील टीका कोणालाहि समर्पकच वाटेल 'संशोधक–कोंबड्यां' तील 'शिवरामपंती' उपरोध छन्नी पण हृद्य झाला आहे 'मेधाव्रताचा शोध' आजहि आपणाला स्फूर्तिकारक होईल.

---

# स्वतंत्रप्रज्ञ टॉलस्टॉय

टॉलस्टॉयमध्यें एकाहून अधिक पुरुष आहेत. पहिला म्हणजे मोठा कलावान, दुसरा मोठा साधु पुरुष आणि तिसरा उद्दाम वासना आणि लालसा यांचा पुरुष. परंतु जसजसें त्याचें वय वाढूं लागलें आणि त्याच्या जीवनराज्याचा विस्तार होऊं लागला त्याबरोबर त्याच्यात आणखी एक शास्ता आहे असें अधिक स्पष्ट होऊं लागलें. हा शास्ता म्हणजे त्याची स्वतंत्र बुद्धि. या स्वतंत्र बुद्धीला मी येथें अभिवादन करणार आहें. कारण आपणाला आज तिचीच गरज आहे.

शौर्य, सौंदर्य, साधुत्व या सर्वांपेक्षां मुक्त आत्मा ही दुर्लभ वस्तु आहे. नियमनापासून, पूर्वग्रहापासून, प्रत्येक जडमूर्तीपासून मुक्त; वर्ग, वर्ण, राष्ट्र, इत्यादि प्रत्येक साम्प्रदायिक कल्पनेपासून मुक्त; प्रत्येक धर्माचारापासून मुक्त; आपल्या डोळ्यानें पाहाण्याचें, आपल्या हृदयानें भजण्याचें, आपल्या बुद्धीनें जाणण्याचें धैर्य आणि ऋजुत्व असलेला आत्मा; छाया नव्हे पण प्रत्यक्ष पुरुष.

टॉलस्टॉयनें अतिशय मोठ्या प्रमाणांत असलें उदाहरण घालून दिलें. तो स्वतंत्र होता. तो नेहमी पुरुष आणि प्रसंग याकडे डोळे–मिचकावणी न करतां रोखून पाहात असे. त्याच्या स्वतंत्र बुद्धीचा निर्णय भावनांमुळें देखील चलित होत नसे. ख्रिस्ताबद्दल अलोट निष्ठा असूनही त्याची स्वतंत्र वृत्ति कायम होती. बायबलचा अभ्यास, विवरण आणि प्रचार करण्यांत जरी त्यानें पुष्कळ काळ घालविला तथापि बायबलांत सांगितलें आहे म्हणून हें खरें आहे असें तो कधीं म्हणत नसे. त्यांत अमुक अमुक

म्हटलें आहे म्हणून बायबल सत्य आहे. अशी त्याची दृष्टि होती. सत्याचा निर्णय तुम्हीच केला पाहिजे. तुमच्या स्वतंत्र बुद्धीनेंच तो झाला पाहिजे. लढाईवर जाणाऱ्या दोघां तरुणांशी बोलतांना तो म्हणतो—

"मोझेस अथवा ख्रिस्त याने शेजाऱ्याचें अथवा स्वतःचें नुकसान आपण करूं नये असा निषेध सांगितला आहे म्हणून आपण वाईट करूं नये असें नाही. आपलें अथवा आपल्या शेजाऱ्याचें नुकसान करणें हें मनुष्यत्वाशीं विसंगत आहे म्हणून त्यापासून परावृत्त होणें आपलें कर्तव्य आहे. मनुष्यत्वाशी विसंगत आहे असें मी म्हणतो हें नीट लक्षांत आणा. मी पशूंबद्दल बोलत नाही.

"पाप कोणतें आणि पुण्य कोणतें; साध्य कोणते आणि असाध्य कोणतें हें दाखवून देणारा ईश्वर तुम्ही आपणातच शोधला पाहिजे. परंतु जोंपर्यंत आपण बाहेरच्या प्रमाणांनीं चालत आहो—एकजण मोझेस आणि ख्रिस्त याला, दुसरा महंमदाला व तिसरा समाजवादी मार्क्स याला प्रमाण मानीत आहे तोंपर्यंत आपलें परस्परामधले वैर थांबणार नाही."

हे सामर्थ्याचे शब्द सर्वांच्या कानावर जावेत अशी माझी इच्छा आहे. मी अनेक वेळा म्हटल्याप्रमाणे दुष्टांच्या सामर्थ्यापेक्षां सज्जनांचें दौर्बल्य हाच जगाला जडलेला मोठा रोग आहे. संकल्पाची जडता, स्वतंत्र विचाराचे भय, नैतिक भ्याडपणा, यांमुळें हा दोष उत्पन्न होतो. मोठे धैर्यवान लोकहि आपल्या शृंखलाचा त्याग केल्यावर नवीन पाशाचा आनंदानें स्वीकार करितात एका सामाजिक रूढीतून मुक्त झाले नहीत तोच नव्या रूढीच्या रथाला बुध्याच जुंपलेले आढळतात. स्वतः विचार करण्यापेक्षां दुसऱ्याच्या विचारानें वागणें हें अतिशय सोपें असतें. यातच सर्व दोषांचें सर्वस्व आहे. आपलें हित कशांत आहे याचा निर्णय मोठ्या, विश्वासपात्र, पूज्य अशा पुरुषांवरहि न सोपविणें हें आपलें प्रत्येकाचे कर्तव्य आहे. त्याचें उत्तर आपणच शोधून काढले पाहिजे. धिम्मेपणाने आपला सर्व जन्म त्याच्या शोधात गेला तरी चालेल. आपण स्वतः मिळविलेलें अर्धसत्य इतरांपासून पोपटाप्रमाणें शिकलेल्या संपूर्ण सत्यापेक्षां अधिक मोलाचें आहे. डोळे मिटून विनयभावनेनें, दास्यवृत्तीनें अंगीकारिलेलें सत्य हें सत्य नव्हे, तें असत्य आहे.

[ रोमाँ रोलॉंच्या एका लेखाचा अनुवाद ]

# साहित्याचें जीवनांतील स्थान

प्रख्यात फ्रेंच साहित्यकार मोपासाँ याच्या वाङ्मयाची काउंट टॉल्स्टॉय यांनी एका सुदीर्घ लेखांत मूल्य–चिकित्सा केली आहे. ती इतकी मूलगामी आणि उद्‌बोधक आहे कीं जीवनांतील साहित्याचें स्थान समजून घेण्यासाठी सदैव मार्गदर्शक होईल. म्हणून टॉल्स्टॉय यांच्या त्या लेखांतील महत्त्वाचे विचार येथें देण्यांत येत आहेत.

**साहित्याच्या तीन कसोट्या**

टॉल्स्टॉय यांनी साहित्याच्या तीन कसोट्या प्रथम सांगितल्या आहेत. कोणत्याहि श्रेष्ठ कलाकृतीत या अवश्य आढळून येतातः—(१) नीतीची–जीवनांतील मांगल्याची यथार्थ जाणीव (२) प्रासादिकता किंवा रचनासौष्ठव; आणि ( ३ ) कळकळ अथवा भावनांचे उत्कटत्व. या तीनही गोष्टी जेथें एकवटतात तेथेच अलौकिक प्रतिभा प्रत्ययास येते. वर्ण्य विषयाशीं लेखक जितका तद्रूप झालेला असेल त्या मानानें त्याच्या भावनांना उत्कटता प्राप्त होते व त्या उत्कटतेमुळें त्याला वाचकांच्या वृत्तीना जागृत करितां येते. जेथें वर्ण्य विषयाची लेखकाला आस्था नसेल तेथे तो वाचकालाहि गोडी लावूं शकत नाही. या दृष्टीनें पाहिलें तर कळकळीची भावना हा साहित्याचा प्रधान गुण मानला पाहिजे. या गुणांतूनच प्रासादिकतेचा प्रादुर्भाव होतो. कृत्रिमतेनें क्लिष्टता वाढत जाते आणि दुर्बोधतेमुळे रसनिष्पत्ति होऊं शकत नाहीं. उलट कळकळीमुळें भाषेमध्यें सरळपणा आणि स्वाभाविकता हे गुण निर्माण होतात व त्यामुळेंच रचनासौष्ठव साधतें; पण कळकळ आणि प्रसाद या दोन गुणांनी साहित्याची पूर्णता होत नाहीं. जीवनांतल्या नानाविध विकारांतून जात असतां सत्य आणि मंगल कशांत आहे याची तळमळ सुरू होते आणि त्याचें दर्शन होईपर्यंत मनुष्याला शांतीचा किंवा सुखाचा लाभ घडूं शकत नाहीं. रोजच्या व्यवहारांतील बऱ्यावाईट घटना आणि माणसाच्या मनांतील बरेवाईट विकार यांची छाननी करून जीवनाचें आदर्श स्वरूप

अवलोकिल्याखेरीज जीवनाला अर्थ लाभत नाहीं. हा जीवनाचा अर्थ जाणण्याची पात्रता ज्यानें मिळविली असेल तोच श्रेष्ठ अथवा अक्षर साहित्य निर्माण करूं शकेल. परंतु जीवनाचा अर्थ जाणण्याची तळमळ देखील उत्कटतेमुळेंच उत्पन्न होत असल्यामुळें कळकळीचा साहित्यकार हा क्रमाक्रमानें विकास पावत गेल्याशिवाय राहत नाही.

## पहिली निराशा

मोपासाँच्या गोष्टींचे एक पुस्तक टर्जिनेव्हच्या शिफारशीवरून टॉल्स्टॉयनीं प्रथम वाचलें त्या वेळी मोपासॉच्या लिखाणांत प्रसाद व कळकळ हे दोन गुण त्यांना आढळले, पण पहिल्या गुणाची–जीवनाच्या मांगल्य-बोधाची त्याच्यांत उणीव आहे असें त्यांना वाटलें. आणि आपल्या काळच्या लेखकांमध्यें लेखन-सामर्थ्याचा उपयोग कोणत्या कामी करावा हे न जाणणारे, अथवा अयोग्य आणि अनुपयुक्त विषयावर आपले सामर्थ्य वेचणारे लेखकच अधिक वाढत आहेत हें पाहून त्यांना फार विषाद वाटला. मोपासॉच्या अंगीं विशेष प्रकारचें सामर्थ्य असल्याचा त्यांना प्रत्यय आला; पण जीवनाच्या तत्त्वज्ञानाचे अभावी हें सामर्थ्य निष्फळ होणार अशी त्यांची कल्पना झाली. स्त्री-पुरुष एकमेकांना मोह पाडून कसें शीलभ्रष्ट करितात याचें मोठें चटकदार आणि तपशीलवार वर्णन मोपासॉनें त्या पुस्तकातल्या बहुतेक गोष्टीत केलेलें होतें. कामगारजीवनांतल्या गोष्टींतहि मोपासॉनें अगदीं अनुदारपणानें कामगार स्त्रियाचें वर्णन केलेले होतें. कामगार स्त्रिया या केवळ पशुसदृश आहेत व त्यांना लैंगिक विकार आणि अपत्यवात्सल्य या दोनच भावना समजतात असें त्यानें दाखविलें होतें. भौतिकशास्त्रें, कला, नागरिकत्व व मानवी समाजाची नतिक प्रगति इत्यादि विषयांत विख्यातीस आलेले महान् फ्रेंच पुरुष ज्या राष्ट्रांत जन्माला आले, त्या राष्ट्राला पोषण पुरविणारा कामगारवर्ग केवळ पाशवी हीन वृत्तींनींच भरलेला असणें शक्य नाही. त्याच्यांतहि आध्यात्मिक सद्गुण अवश्य असलेच पाहिजेत असें टॉल्स्टॉय यांनीं प्रतिपादिलें आहे. व कामगारजीवनाशीं सहानुभूतीनें समरस झाल्याशिवाय ते गुण प्रतीत होणें शक्य नाहीं असें त्यांनीं म्हटलें आहे. यामुळें केवळ पाशवी विकारांचेंच वर्णन करणारा लेखक जीवनाचें संपूर्ण सत्य न

जाणणारा आणि म्हणूनच श्रेष्ठ साहित्याचे दृष्टीनें उपेक्षणीय लेखकच म्हणावा लागेल. मोपासाँविषयीं टॉल्स्टॉयना प्रथमदर्शनीं तरी संपूर्ण निराशाच अनुभवास आली.

## मोपासाँची श्रेष्ठ कृति

यानंतर मोपासॉची Une Vie ही कादंबरी टॉल्स्टॉय यांच्या हातीं आली. या कादंबरीच्या वाचनानें मात्र टॉल्स्टॉय यांचें मोपासॉविषयींचें मत बदललें. ही कादंबरी उत्कृष्ट आहे. मोपासॉच्या सर्व कादंबऱ्यामध्यें ही श्रेष्ठ आहे; इतकेंच काय पण व्हिक्टर ह्यूगोच्या Les Miserables या श्रेष्ठ कृतीनंतर हिच्याएवढी मोठी कृति निर्माण झाली नाही असें टॉल्स्टॉय यांनी म्हटलें आहे. या कादंबरीत सत्साहित्याला आवश्यक असणारे तीनहि घटक—( १ ) मागल्यबोध, ( २ ) प्रसाद आणि ( ३ ) कळकळ पूर्णत्वानें आढळून येतात. इंद्रियलेलुपतेला बळी पडल्यामुळें एका सुस्वभावी निरागस स्त्रीचा जीवनध्वंस कसा झाला याचें या कादंबरीत हृदयद्रावक वर्णन आहे. ही कादंबरी वाचल्यावर वाचकाचे मनात जीवनाविषयीं गंभीर विचार उसळूं लाग तात. इतक्या सुंदर जीवनाचा असा भयानक अंत काय म्हणून व्हावा ? जीवनाचा अर्थ काय आहे ? या प्रश्नानी वाचकाचे चित्त व्यग्र होऊन जातें व जीवनाचा खोल अर्थ शोधण्याची त्याची प्रवृत्ति बळावते. मोपासॉच्या शैलीची परिपूर्णता या कादंबरीत पाहावयास सापडते आणि कादंबरीत-ल्या पात्राशी त्याचें अगदी तादात्म्य झालेलें दिसून येतें. सद्गुणा-विषयीं प्रेम आणि दुर्गुणाविषयी तिरस्कार इतक्या उत्कटतेनें या कादंबरीत व्यक्त झाले आहेत कीं वाचकाच्या मनांतहि तशाच वृत्ति उत्कटत्वानें निर्माण होऊं लागतात.

## वास्तववादी साहित्य

मोपासॉची ही कादंबरी म्हणजे एक श्रेष्ठ वास्तववादी साहित्याचा नमुना आहे. आदर्शवादी साहित्यांत जीवनाचे ध्येयादर्शच वर्णिलेले आढळतात. पण वास्तववादी साहित्यात प्रत्यक्ष जीवनांतील अपुरेपणा, अन्याय, क्षुद्रता आणि असंतोष यांचें तीव्रतेनें वर्णन केलेलें असतें. साहित्य कसेंहि असो, त्यांत जीवनाच्या परमसत्यांचा आविष्कार झाला

पाहिजे. आदर्शवादी साहित्यात तो भावरूपानें (positive) मांडलेला आढळेल, तर वास्तववादी साहित्यात तो अभाव रूपानें (Negative) मांडलेला दिसेल. पण साहित्यकाराचे प्रतिभादृष्टीला जीवनाच्या संपूर्ण सत्याचें दर्शन घडले असलें तरच तो कोणत्याहि प्रकारें त्याचें चित्र प्रकटवूं शकेल.

**दुःख जाणलें कीं तें कृतार्थ होतें**

वास्तविक जीवनांत अनेक प्रकारचे विरोध असल्यामुळें मनुष्याला अनेक प्रकारचीं दुःखें अनुभवावीं लागतात. या दुःखांची जाणीव झाली कीं मनुष्याचे मनातील समत्वाची वृत्ति जागृत होते व तो दुःखाच्या निराकरणाचा मार्ग शोधूं लागतो, यामुळें दुःख जाणणें ही दुःखनिवृत्तीची प्रथम पायरी आहे. भौतिक अथवा मानसिक दुःखांची जसजशी जाणीव होत जाते, तसतशी जीवनातील त्या दुःखांना कारण असलेली परिस्थिति बदलण्याची साधना सुरू होते. या दृष्टीनें वास्तववादी साहित्याने जीवनातील दुःख उघडीं करून दाखविल्यानें जीवनाची सेवा घडते.

**वास्तवांतून आदर्शाकडे**

प्रत्यक्ष जीवनाचा अपुरेपणा उत्कटत्वाने भासल्याखेरीज ध्येयवादाकडे जीवाची प्रगति होत नाही. यासाठी वास्तव-जीवनांतील मोहाचे पडदे फाडून टाकण्याचें काम वास्तववादी साहित्य करीत असते. ध्येयवादाचें दर्शन करून आलेल्या साहिन्यकारालाच वास्तव जीवनाचा हिणकसपणा प्रकट करितां येतो. यामुळें वास्तववादाचा आदर्शवादाशीं विरोध नाही. वास्तव-जीवनातून आदर्श-जीवनाकडे जाण्यासाठीं वास्तववादी साहित्याचा जन्म होत असतो. हाच खरा वास्तववाद आहे. आणि फार प्राचीन काळापासून साहित्यात या दोनहि प्रकारचे लेखक झालेले आढळून येतात.

**आणखी एक कृति**

Bel-Ami या कादंबरींतहि मोपासॉची जीवनविषयक श्रेष्ठ दृष्टि आढळते. सज्जनाना दुःख कां होते? हा पहिल्या कादंबरींत प्रश्न होता. या कादंबरींत अपात्र माणसांना संपत्ति व कीर्ति कां प्राप्त होते? हा प्रश्न आढळून येतो.

**मोपासाँचा अधःपात**

पण मोपासॉला ही भूमिका आपल्या कादंबऱ्यांत उत्तरोत्तर टिकवितां आली नाहीं. आणि केवळ विलासाची व दुर्गुणाचीं वर्णनें करण्यांतच त्याच्या लेखणीला आनंद वाटूं लागला. त्याची जीवनाच्या मांगल्याची जाणीव पुसट होत चालली.

मोपासॉच्या या अधःपाताचें कारण काय ? स्तुति आणि संपत्ति.

त्याच्या पहिल्या पहिल्या कादंबऱ्यांना अपरंपार यश लाभलें, वर्तमानपत्रांनीं त्याची अफाट प्रशंसा केली, समाजानें स्तुतिपाठ केला, विशेषतः स्त्रियांनी त्याची भाटगिरी चालविली, त्याच्या लेखनाला मिळणारा मोबदला एकसारखा वाढत गेला आणि त्याबरोबरच त्याच्या गरजाहि वाढल्या. एवढा पैसा मिळाला पण तो त्याला कधींच खर्चाला पुरा पडला नाहीं. आणि शेवटची गोष्ट म्हणजे संपादक व प्रकाशक यांनीं केवळ मोपासॉच्या नांवावर जो येईल तो मजकूर हव्या त्या किंमतीला छापून प्रसिद्ध करण्याची अहमहमिका चालविली, त्यामुळें त्याच्या लेखनाच्या बरेंवाईटपणाकडे कोणाचेंहि लक्ष उरलें नाहीं. स्तुति आणि संपत्ति याच्यामुळें तो विलासाच्या पाशांत कायमचा अडकला. तेथून त्याची सुटका होणें अशक्य झालें. तारुण्य व सौंदर्य यांच्या भरीला संपत्ति व स्तुति यांची जोडगोळी आली म्हणजे अनावर मोह निर्माण होणारच. जिवनाचे ध्येयदर्शन झालें असेल तरच या मोहाशी झगडण्याची शक्यता असते. मोपासाँच्या भोंवती, पॅरिसमधील शिष्ठ व रसिक मंडळीत 'कलेचा नीतिविषयक विचाराशीं मुळींच संबध नाहीं' हें सिध्दान्तसूत्रच बनलें होतें. यामुळें स्त्रीसौंदर्य व लैंगिक आकर्षण एवढाच कलेचा एकमेव विषय बनून राहिलेला होता. कलेचा जीवनाच्या मांगल्याशीं असलेला संबंध तोडून टाकल्यावर केवळ विलासप्रियता एवढाच एक विषय उरणार ! फ्रेंच कादंबऱ्यांतून नवराबायको आणि तिचा प्रियकर अशा त्रिकोणांच्याच कथा वर्णिलेल्या असतात. त्याच आदर्शानुसार मोपासाँनें आपल्याहि कादंबऱ्यांतून प्रेमाची —लैंगिक प्रेमाची—व्यभिचारी लैंगिक प्रेमाचीच—नाना सुरांनी आळवणी केली आहे.

## नीतिदृष्टि हेंच कलेचें वैशिष्ट्य

कादंबरी आणि लघुकथा यांत मुख्य फरक असा आहे कीं, कादंबरींत एक अथवा अनेक माणसांच्या संपूर्ण आयुष्याचें चित्रण करावयाचें असतें. लघुकथेंत एकादी विशिष्ट घटनाच वर्णन करितात. यामुळे कादंबरी लेखकाजवळ तरी जीवनाचें समग्र दर्शन असावें लागते. त्याला चागले काय व वाईट काय याची निश्चित कल्पना असावी लागतें. पण मोपासॉच्या कादंबऱ्यांतून ही नीतिविषयक दृष्टि नष्ट झाली. इतकेच नव्हे तर अशी दृष्टि कलेला घातकच आहे असा संप्रदाय त्यानें स्वीकारला. यामुळें त्याच्या कादंबऱ्या उत्तरोत्तर उथळ, नीरस आणि कंटाळवाण्या व उद्वेगकारक होत गेल्या.

कलाकृतीचें वैशिष्ट्य हे जीवनाच्या सत्यदर्शनावर अवलंबून असते. कलेचें साकल्य ( unity ) केवळ कथानकात असत नाही अथवा तंत्रातहि तें असत नाहीं. लेखकानें जीवनातील एखाद्या खोल सत्याचें, वा तत्त्वाचे आकलन केल्यामुळे त्याला एक निराळेंच सौंदर्यदर्शन होत असतें. तें तो वाचकाला प्रतीत करून देण्यासाठी कथानकाचा व तंत्राचा स्वीकार करीत असतो. हें आतरसाकल्यच त्या कलाकृतीला नावीन्य आणि रसमयत्व देत असतें. कोणाहि कलावंताची कृति आपल्यासमोर आली कीं, आपण त्याला असा प्रश्न करतों की, “ तुझें अलौकिकत्व कशात आहे ? इतरापेक्षां तुझ्याकडून मला जीवनाचें कोणतें निराळें दर्शन घडणार आहे ? जीवनाकडे पाहण्याची कोणती नवी दृष्टि तू मला देणार आहेस ? ” कलावंताच्या साऱ्या–बऱ्यावाईट भूमिकांत आपण कलावंताचा आत्मा शोधीत व पाहत असतों. तो जर आपणांला आधीच परिचित असेल, तर आपण त्याच्या नवीन कृतीविषयीं असा प्रश्न करतों कीं, ‘ या कृतीत तूं मला आणखी कोणतें नवें दर्शन घडविणार आहेस ? ’ यामुळें ज्या लेखकाला जीवनांतील सत्यअसत्य, साधु-असाधु यांच्या बाबतींत निश्चित निर्णय झालेला नसेल त्याला उच्च साहित्य कधीच निर्माण करता येणार नाहीं. तो विपुल रचना करील आणि लेखनांत चमत्कारहि दाखवूं शकेल. पण खरी कला त्याचे हातून निर्माण होणार नाहीं. जीवनांतील मांगल्य कशांत आहे याची लेखकाला यथार्थ जाणीव झालेली नसेल तर त्याला अमर

कलाकृति निर्मितां येणार नाही. टॉल्स्टॉय यांनीं हा मुद्दा मोपासाँच्या कादंबऱ्यांच्या सविस्तर चर्चेत स्पष्ट करून दाखविला आहे.

### मोपासाँच्या लघुकथा

मोपासॉंच्या कादंबऱ्यांत उत्तरोत्तर हीनता शिरली आणि केवळ कादंबऱ्यांवरूनच त्याची योग्यता ठरवण्याचा प्रसंग आला असता तर मोपासॉला साहित्यांत अमर स्थान मुळींच मिळाले नसतें. पण सुदैवानें मोपासॉनें लघुकथा लिहिल्या आणि त्यांत मात्र कादंबऱ्यांमध्यें अवलंबिलेले शिष्टानुरंजनाचें ध्येय सोडून त्याला नैतिक दृष्टीने जें हृदयस्पर्शी वा हृदयविदारक वाटलें तेच चित्रित केलें आणि यामुळें त्याच्या लघुकथांमध्यें जीवनाची नैतिक भावना पुन्हां वाढीस लागली.

### सत्यनिष्ठा व कलावंत

टॉल्स्टॉय म्हणतात की, कलावंत जर कोणत्याही बाह्य प्रलोभनाच्या आहारीं जाणार नाही, व केवळ आपल्या हृदयाला जें आकर्षक वाटेल तेंच चित्रित करीत राहील, तर तो आपल्या कला दृष्टीच्या सामर्थ्यावर जीवनांतील अंतिम नैतिक मूल्ये आकलन करूं शकेल. मात्र त्यानें स्वतःच्या हृदयस्थ प्रेरणेशीं इमानी राहिलें पाहिजे. अशा कलावंताच्या हातून प्रारंभी जरी चुका झाल्या तरी हळूहळू त्याला सत्य काय व असत्य काय, शुभ काय व अशुभ काय, याची प्रतीति येत जाईलच. आपल्या अनुभवाशी सत्यनिष्ठ राहण्याचे कलावंतानें जर व्रत बनविलें तर त्याच्या विकासाला कोणताहि प्रतिबंध फार काळ अडवूं शकणार नाही.

मोपासॉंचे ब बतींत असेंच झाले. जीवनाचे सारसर्वस्व स्त्री-प्रेमांतच आहे अशा दृढ श्रद्धेनें मोपासॉनें मोठ्या चिकाटीने स्त्रीप्रेमाचे सारे प्रकार शोधिले, भोगिले आणि आपल्या कलेंतून चित्रिले. पण शेवटी स्त्रीविषयक–लैंगिक–प्रेम हे फसवें, जीवनाला आग लावून हताश करणारें, भ्रम-निरास करणारें आणि खऱ्या प्रेमवृत्तीला सर्वस्वी विकृत करणारें आहे असें त्याला आढळून आले व आपल्या कित्येक लघुकथांमधून त्यानें हा आपला अनुभव अतिशय परिणामकारक रीतीनें प्रकटविला आहे. प्रेमविकारांतच काय पण एकूण एक भौतिक जीवनांतच विलक्षण विरोध व फसवेपणा भरलेला आहे, याची जाणीव त्याचे हृदयांत उत्तरोत्तर वाढत गेली व

मानवी आत्म्याच्या नैतिक आकांक्षांच्या पूर्ततेसाठी हे दृश्य जग व इंद्रिय गम्य सुखोपभोग अगदींच अपुरे आणि कित्येक वेळां सर्वस्वी दिशाभूल करणारे आहेत असें त्याच्या प्रत्ययास आलें.

Solitude नांवाच्या त्याच्या सुंदर कथेत त्याने आत्म्याच्या एकाकी-पणाचें, आत्म्याच्या आर्त आक्रंदनाचें अत्यंत हृदयस्पर्शी चित्र रेखाटलें आहे. आपण आणि आपल्या भोंवतालचे मानवबंधु यांच्यामध्ये जड जगताचा एक अभेद्य कोट निर्माण झालेला आहे आणि शरीर जितकें जवळ येईल तितकें त्यांतील आत्म्याचें मीलन दुरावतच जातं, हा दारुण अनुभव त्यांत व्यक्त केला आहे.

आत्म्याला लागलेली ही मीलनाची तृष्णा कशानें शांत होईल? हा द्वैताचा कोट कोणत्या साधनाने पाडतां येईल? प्रेमानेंच हे मीलन होणार आहे. पण हें प्रेम म्हणजे स्त्रीविषयक प्रेम—शारीरिक आसक्तीचें भोग—प्रेम नव्हे! आत्मीय प्रेम! अखिल मानवजातीलाच नव्हे, पण चराचराला व्यापून राहणारें आध्यात्मिक प्रेम हेंच या आत्मीय मीलनाचें अंतिम आणि एकमेव साधन आहे.

मोपासॉच्या लघुकथांत या आध्यात्मिक प्रेमाचा स्पष्ट उल्लेख नाहीं. पण त्याची आत्म्याची आक्रोश-कथा याच प्रेमाकडे वाचकाला घेऊन जाते यात शंका नाहीं. बाह्य, भौतिक, इंद्रियगम्य विश्वाच्या पलीकडे आंतर, आध्यात्मिक व भावगम्य अशी आत्मसृष्टि आहे व तेंच जीवनाचें सत्य-स्वरूप आहे. तेथेंच सत्य, सौंदर्य व साधुत्व याची निरंतर वसति आहे. साऱ्या मानवी जीवनाचा प्रवाह तेथेंच चालला आहे व प्रत्यक्ष जीवनांतील सारे आंतरविरोध या परोक्ष पण आत्मानुभवगम्य अशा सत्तत्त्वांतच विलीन होणार आहेत. हाच जीवनाचा परम अर्थ त्याच्या आक्रोशांतून सूचित होत आहे. मृत्यूनें त्याच्या जीवनाचा मध्येंच भंग केला नसता, तर मोपासॉनें या अवस्थेच्याहि पलीकडे जाऊन पूर्णतेच्या कलाकृति आपणाला दिल्या असत्या. पण या समर्थ आणि तत्त्वनिष्ठ पुरुषाच्या शेवटच्या वाङ्मयांत आत्म्याचे आक्रोश स्पष्टपणें आढळत असल्यामुळें आपण त्याचें आभारी राहिलें पाहिजे असें टॉल्स्टॉय यांनीं शेवटीं म्हटलें आहे.

---

# अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?

जॉन रस्किन याच्या Unto this Last या ग्रंथाचा अनुवाद मराठी भाषेंत प्रसिद्ध करून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेनें महाराष्ट्र-वाङ्मयांत एका बहुमोल ग्रंथाची भर घातली आहे. या अनुवादाचें काम आचार्य जावडेकरांसारख्या अधिकारी पंडिताने केले असल्यामुळें तें अगदी प्रमाण-भूत झालें आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. रस्किनचे ग्रंथ विद्या-पीठातून नेहमीं लाविले जातात. यंदाच मुंबई विद्यापीठाच्या 'इंटरआर्ट्स' परीक्षेसाठी सदर ग्रंथ लाविलेला आहे. रस्किनची विचारसरणी तात्त्विक-दृष्ट्या गहन आणि भाषासरणी प्रौढ असल्यामुळें विद्यार्थ्यांना त्याचे ग्रंथ आकलन करण्याला बरेच अवघड वाटतात असा नेहमीचा अनुभव आहे. महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांची या अनुवादामुळे विशेष सोय झाली आहे व ते तिचा आवश्य उपयोग करून घेतील अशी आशा आहे. या अनुवादाला आचार्य जावडेकरांनीं जी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे ती या पुस्त-कांचें मूल्य वाढविणारी झाली आहे. या प्रस्तावनेंत रस्किनच्या तात्त्विक विचाराचा अतिशय सुबोध भाषेत ऊहापोह करण्यांत आला असून, जीवना-संबंधीं त्याचे जे महत्त्वाचे सिद्धान्त आहेत त्यांचा स्पष्ट उलगडा कर-ण्यात आला आहे. यामुळें रस्किनची योग्यता समजण्याला या प्रस्तावनेचा फार चांगला उपयोग होणार आहे.

### आध्यात्मिक दृष्टीनें जीवनाचा विचार

कार्लाईल आणि रस्किन हे दोन ग्रंथकार आध्यात्मिक दृष्टीनें जीवनाचा विचार करणारे असल्यामुळें भारतीय संस्कृतीच्या अभ्या-सकांना नेहमींच आदरणीय वाटतात. पाश्चात्य जीवनांत जडवादा-चा प्रादुर्भाव झाल्यामुळें तेथील सर्व सामाजिक शास्त्रांना जें केवळ भौतिक सुखवादी स्वरूप येऊं लागले त्याचा धिटाईनें निषेध करणारे जे थोडे तत्त्वज्ञ गेल्या शतकांत युरोपांत झाले त्यांत कार्लाईल व रस्किन यांची योग्यता फार मोठी समजली पाहिजे. यांच्याहून मोठा म्हणजे फक्त

टॉल्स्टॉयच झाला. यामुळें यांच्या ग्रंथांचा अभ्यास काळजीपूर्वक व्हावयास पाहिजे आहे. रस्किनच्या Unto this Last या ग्रंथाला एक असामान्य महत्त्व आहे. युरोपांत जे भौतिक शोध लागले त्यामुळें उत्पादनाची प्रथा बदलून गेली आणि नवीन आर्थिक व सामाजिक घडी निर्माण झाली. या नव्या घडीचा पाया ज्या अर्थशास्त्रीय सिद्धान्तांवर उभारला होता त्यांची कठोर चिकित्सा करून त्यांचें भ्रामकत्व आणि विनाशकारित्व रस्किननें या ग्रंथांत सप्रमाण सिद्ध केलें आहे. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास हा ग्रंथ प्रथम लिहिला गेला. पण त्यांत केलेली चिकित्सा आजहि अगदीं ताजी राहिली आहे, इतकें या ग्रंथाचें मौलिकत्व आहे. भौतिक सुखवर्धन आणि वैयक्तिक अनिर्बंध स्वातंत्र्य या तत्त्वांवर समाजाचा कधीहि उत्कर्ष होऊं शकणार नाही. स्पर्धा आणि सुखलालसा जीवनाला उपकारक नसून मारक आहेत. जीवनविकास व्हावयाचा असेल तर न्याय आणि संयम याचा व्यक्तिमात्रानें स्वीकार केला पाहिजे आणि स्पर्धेचा त्याग करून सहकार्याचा अंगीकार केला पाहिजे हे रस्किनचे मूलभूत सिद्धान्त आहेत. म्हणजेच आधिभौतिक पायावर समाजशास्त्राची उभारणी करणे हें घातक असून ती आध्यात्मिक पायावरच केली पाहिजे हा मूलभूत सिद्धान्त जोंपर्यंत सर्वमान्य होत नाही व ह्या सिद्धान्तावर सर्व सामाजिक व्यवहारांची उभारणी करण्याचे प्रयत्न केले जात नाहींत तोंपर्यंत रस्किनच्या या ग्रंथाचे नावीन्य नाहींसें होणार नाहीं.

## गांधीजींच्या जीवनावर रस्किनचा पगडा

आजच्या जागतिक कोलाहलांत रस्किनच्या या विचारांची जनतेला पुन्हा गरज लागणार आहे. रस्किन किंवा टॉलस्टॉय यांच्याप्रमाणेंच आध्यात्मिक विचारसरणीवर सामाजिक व्यवहारांची उभारणी झाली पाहिजे असें म्हणणारा व त्याप्रमाणें आपल्या देशांतील जनतेची संघटना करणारा एकच पुरुष सध्यांच्या जगांत आहे. तो महात्मा गांधी होय. महात्मा गांधीच्या जीवनावर रस्किनच्या या ग्रंथाचा किती मोठा परिणाम झाला आहे हें त्यांच्या आत्मकथेवरून दिसून येते. आत्मकथेच्या चवथ्या भागांतील अठराव्या प्रकरणांत ‘ एका पुस्तकाचा विलक्षण परिणाम ’ या शीर्षकाखालीं त्यासंबंधीं त्यांनीं लिहिलें आहे. मि.

पोलाक यांनीं रेल्वेच्या प्रवासात वाचण्यासाठीं म्हणून महात्मा गांधींना रस्किनचें हें पुस्तक दिलें. पण त्या पुस्तकांतील विचारांनीं गांधीजींच्या आयुष्यावर इतका विलक्षण प्रभाव गाजविला कीं, त्यांनीं आफ्रिकेंत लागलीच फिनिक्स आश्रम स्थापन केला व रस्किनच्या सांगण्यातील तत्त्वांचा आचार एकदम सुरू केला. तेव्हांपासून आतापर्यंतच्या तीन तपांच्या काळांत गांधीजींनी जीवनात जे विविध प्रयोग केले त्यामधून त्यांनीं आध्यात्मिक पायावर समाजरचना कशी करतां येईल या बाबतींत अनेक विधायक आदर्श निर्माण केले आहेत.

**सत्याग्रही समाज** निर्माण करण्याचा त्यांचा हा अपूर्व प्रयोग इतका आकाराला आला आहे की, हिंदुस्थानपुरतें तरी त्यांनी आपलें सर्वांगीण नेतृत्व सिद्ध केलें आहे. सत्याग्रही समाजाचें अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, शिक्षण-शास्त्र कसे असलें पाहिजे याविषयी गांधीजींनी राष्ट्राला निश्चित कल्पना दिल्या आहेत. सत्याग्रहाचें युद्धतंत्रहि त्यांनी पूर्ण विकसित करून दिलें आहे. ही **सत्याग्रही समाजशास्त्राची** उभारणी करताना गांधीजी रस्किनच्याहि पुढे गेले आहेत ही गोष्ट अवश्य लक्षांत घेण्यासारखी असली तरी तेवढ्यानें रस्किनच्या विचारांची महती कमी होत नाही. उलट रस्किनच्या या ग्रंथाच्या अभ्यासाने महात्मा गांधींच्या सत्याग्रही समाज-शास्त्राचें आकलन होण्यास चांगले साह्य होण्यासारखें आहे.

स्वतः महात्मा गांधीनी रस्किनच्या या पुस्तकाचे सार गुजराती भाषेत ‘सर्वोदय’ या नांवानें पूर्वीच प्रसिद्ध केलें आहे. या सर्वोदयाचे सिद्धान्त म्हणून गाधीजीनी तीन गोष्टी सांगितल्या आहेत—

( १ ) सर्वांच्या कल्याणांत आपलें कल्याण आहे.

( २ ) वकील काय किंवा हजाम काय, दोघांच्या कामाची किंमत सारखीच असली पाहिजे. कारण पोटापाण्याचा हक्क दोघांनाहि सार-खाच आहे.

( ३ ) साधें अंगमेहनतीचें शेतकऱ्याचें जीवन हेंच खरें जीवन होय.

रस्किनच्या ग्रथांत हे तीन सिद्धान्त आहेत असे महात्मा गांधींचें म्हणणें आहे. महात्मा गांधी हे संपूर्ण समतावादी असल्यामुळें रस्किनपेक्षां त्यांनीं दुसरा सिद्धान्त अधिक स्पष्ट शब्दांत मांडला आहे असें दिसून

येईल. समाजसेवा हेंच सर्व व्यवसायांचें उद्दिष्ट असलें पाहिजे व कोण त्याहि प्रकारची सेवा करणाऱ्या व्यक्तीला समाजानें अवश्य तें जीवनवेतन दिलें पाहिजे असें रस्किनने प्रतिपादिलेंच आहे. तथापि कामाकामांत भेद करून त्याप्रमाणें निरनिराळ्या प्रतीच्या कामांना निरनिराळें वेतन दिलें पाहिजे असें त्याचें म्हणणें आहे. प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीनें पाहतां असा भेद समाजांत कांही काल तरी अपरिहार्य आहे हें कोणीहि कबूल करील. पण सेवा हेंच व्यवसायाचे उद्दिष्ट धरलें म्हणजे मग सेवेंत प्रकार-भेद करणें हें न्याय्य होणार नाहीं. ज्यानें त्यानें आपल्या अधिकाराप्रमाणें समाजाची सेवा केली म्हणजे झालें. सर्वांची किंमत सेवेच्या दृष्टीनेंच मोजली पाहिजे असें म्हटले म्हणजे सेवा करणाऱ्या सर्व वर्गांना किंवा व्यक्तींना नैतिक दृष्ट्या समानतेनेंच वागविलें पाहिजे हें उघड आहे. म्हणून गांधीजीचा दुसरा सिद्धान्त अधिक तत्त्वशुद्ध आहे व गीतेंत म्हटल्याप्रमाणें सर्वच भक्त सारख्या योग्यतेचे आहेत असेंच म्हटलें पाहिजे असें मला वाटतें. हा तपशीलाचा मतभेद आहे असेंच मी मानतों. कारण समाजसेवेच्या दृष्टीनें सर्वांचा अधिकार व जगण्याचा हक्क सारखा आहे हें रस्किनचेंहि प्रतिपादन आहे.

## साध्या जीवनाचा पुरस्कार

साध्या जीवनाचा रस्किननें जो पुरस्कार केला आहे तो सर्व विचारी मंडळींनीं अगत्य ध्यानी आणण्यासारखा आहे. महात्मा गांधींना रस्किन-च्या ग्रंथापासून साध्या जीवनाची स्फूर्ति झाली ही गोष्ट जीवनाच्या इतिहासांत कायमची नमूद केली जाईल. आणि अशी स्फूर्ति देण्याचें सामर्थ्य ज्या रस्किनच्या शब्दांत आहे ते शब्द किती शाश्वत मोलाचे आहेत हें दिसून येईल.

## साहित्याहून जीवन श्रेष्ठ !

रस्किनच्या जीवनासंबंधीं आणखी एक महत्त्वाची गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. रस्किन हा स्वतः संपन्न कुटुंबांत जन्माला होता व त्याची संपत्ति लक्षावधि रुपयांची होती. त्याला ललितकलांची विलक्षण आवड होती. साहित्य, चित्र व शिल्पकला यासंबंधीं त्याचा व्यासंग फार मोठा होता व त्याविषयीं त्याचें लिखाणहि विपुल व विशेष योग्यतेचें

आहे; तथापि ज्या समाजांत जो नांदत होता त्या समाजाच्या उथळपणाकडे, दैन्याकडे व विपत्तीकडे त्याचें लक्ष गेलें. सौंदर्यनिर्मितीसाठीं समाजांत आर्थिक सुस्थिति असली पाहिजे व सभोंवार दैन्य आणि दुःस्थिति पसरली असतांना खरी सौंदर्योपासना होऊंच शकत नाहीं हें त्याला दिसून आलें. त्यानें आपली आरामशीर ललितकलांची उपासना टाकून दिली व समाजाच्या दैन्याच्या दूरीकरणासाठीं काय केलें पाहिजे याचा शोध केला. रस्किनच्या या कृत्यामुळें तो एक सुखासीन शब्दोपासक नव्हता तर जीवनाचा श्रेष्ठ उपासक होता हे दिसून येतें. समाजाच्या जीवनाशी एकरूप झाल्याशिवाय श्रेष्ठ साहित्य निर्माण करतां येत नाहीं हे त्याला आढळून आल्याबरोबर त्यानें साहित्य सोडून समाजजीवनाच्या प्रत्यक्ष सुधारणेच्या कार्यांत आपलें सर्वस्व वेचलें.

साहित्यापेक्षा जीवन श्रेष्ठ आहे हा सिद्धान्त रस्किनच्या जीवनावरून आपणाला शिकतां येईल. महाराष्ट्र—साहित्याला रस्किनपासून पुष्कळच शिकता येण्यासारखे आहे.

अशा प्रकारें निरनिराळ्या दृष्टींनीं रस्किनच्या या ग्रंथाची योग्यता असल्यामुळें मराठी वाङमयांत याच्यामुळें विचाराला चालना मिळेल अशी मला खात्री आहे. यासाठी या ग्रंथाचा अभ्यास महाराष्ट्रांत सर्व ठिकाणीं व्हावा अशी इच्छा मी प्रकट करितों.

---

# जीवन आणि रंगभूमि

जीवन आणि कला यांचा संबध रमणीय आणि विचारणीय आहे. जीवनाचे प्रत्यक्ष आणि परोक्ष असे दोन विभाग पडतात. त्यातील प्रत्यक्षापेक्षां परोक्षाचें महत्त्व अधिक आहे. परोक्षाचें प्रकटीकरण करण्यासाठी प्रत्यक्षाचा जन्म होत असतो. या परोक्षाच्या प्रांतांतच जीवनाची ध्येयसृष्टि—कलेचीं आदिरूपें—जन्म घेत असतात. या ध्येयांतून जीवनाच्या प्रेरणा प्रत्यक्षांत उतरण्यासाठीं धडपडू लागतात. ही ध्येयें म्हणजे अमर

आत्म्याच्या अनंत आकांक्षा होत. या आकांक्षांच्या प्रकटीकरणाच्या द्वारें आत्म्याला आपलें सत्यस्वरूप प्रतीत होतें. आपल्या सौंदर्याचा त्याला साक्षात्कार होतो; आणि आपल्या साधुतेची त्याला अनुभूति लाभते. त्यामुळें विचारवंतांनी आत्म्याच्या ह्या ध्येयजीवनाचा सर्वत्र महिमा गाइलेला आढळतो. आत्म्याच्या या ध्येयाकांक्षा प्रत्यक्ष जीवनांत विविध कलांच्या द्वारा व्यक्त होत असतात. निरनिराळ्या माध्यमांचा स्वीकार करून कला प्रत्यक्षामध्ये अवतरत असते. काव्य, चित्र, शिल्प, नृत्य, संगीत यांपैकीं एक एक कला घेतली तरी तिच्यांत मानवी मनाला मुग्ध करून टाकण्याचें अचाट सामर्थ्य असतें हें आपण पाहतों. नाटयकलेमध्यें या सर्वहि कलांचा समन्वय झालेला असल्यामुळें ती कलांची सम्राज्ञी झालेली आहे. 'रंगभूमि' या शब्दाने ही नाटयकलाच येथें विवक्षित आहे.

'रंगभूमि' या शब्दाने नाटककार, नट आणि प्रेक्षक या तिघांच्या परस्पर सहकार्यानें निर्माण होणाऱ्या एका विशाल कलानुभूतीचा स्वीकार करावयाचा आहे. कारण या अनुभूतीमध्यें या तिघांचें सहकार्यच काय पण संपूर्ण तादात्म्य आवश्यक असतें. इतकेंच नव्हे, तर नाटककार, नट आणि प्रेक्षक यांपैकी प्रत्येकांतही या तिघांचें अस्तित्व आढळून येतें. नाटककाराच्या मनोभूमीत खरोखरच एक मनोमय नाट्य चालत असतें आणि तो स्वतःच नट आणि प्रेक्षकही बनत असतो. त्याशिवाय नाट्यवस्तूची प्रतीति त्याला होणारच नाही. नटाचेंहि असेंच आहे. नाटककारानें आपल्या कल्पनासृष्टीत साक्षात्कारिलेली अनुभूति प्रथम नाटकाच्या शब्दांत जड स्वरूप धारण करिते. नंतर नट आपल्या कल्पनेच्या संजीवनीने त्या अनुभूतीला आपल्या अंतर्जीवनांत पुनः चैतन्यरूप बनवितो. त्या वेळीं तो स्वतः एका बाजूला नाटककार व एका बाजूला प्रेक्षक बनत असतो. नाटककाराची मानस अनुभूति नटाच्या शारीरिक अभिनयाचा आश्रय करून प्रेक्षकापुढे उभी राहते त्या वेळीं आपल्या रसिकतेच्या साह्याने प्रेक्षक त्या अनुभूतीचा आपल्या मानस जीवनांत पुनः साक्षात्कार संपादितो. याहि वेळीं प्रेक्षकाच्या जीवनांत नाटककार आणि नट यांच्या भूमिका चालू असतात. अशा रीतीने नाटककाराच्या जीवनांत प्रथम अवतीर्ण झालेली कलानुभूति नटांच्या

द्वारा विखुरली गेल्यानंतरहि प्रेक्षकाच्या जीवनांत पुनः अभंगरूप धारण करिते. यामुळे रंगभूमीचा महिमा अवर्णनीय झाला आहे.

नाट्याचें अथवा रंगभूमीचें आणखी एक वैशिष्ठ्य आहे. चित्र, शिल्प इत्यादि कला आपले अमर भाव व्यक्त करण्यासाठी जड साधनांचा आश्रय करतात. पण रंगकला आत्मभाव व्यक्त करण्यासाठी कोणत्याही जड साधनांचा आश्रय करीत नाहीं. नट प्रेक्षकांना जवळजवळ आत्म्याचें प्रत्यक्ष दर्शनच करवितो. यामुळे रंगकलेची मोहनी नेहमीच अनावर असते. रंगकलेचा हा विशेष इतर कोणत्याहि कलेला कधीहि हिरावून घेतां येणार नसल्यामुळे भौतिक साधनांचा कितीहि प्रकर्ष झाला आणि जड साधनांच्या द्वारें केवढीहि करामत करून दाखविण्याची शक्ति उपलब्ध झाली तरी रंगकलेचे स्थान अढळ राहील. नृत्य आणि संगीत ह्या कला रंगकलेशी स्पर्धा करूं शकल्या तरी नृत्याची मूकता आणि संगीताची निराकारता सदैव त्यांना उणेपणा आणणारच. या दृष्टीने पाहतां रंगकलेचें स्वरूप सार्वभौम आणि सर्वैश्वर्यसंपन्न असेंच राहील.

प्रत्यक्ष जीवनांत आत्म्याची विकसनासाठी अथवा प्रकाशनासाठी जी धडपड चालू असते तिचे स्वरूप स्पष्ट करून दाखविणें हा रंगकलेचा सनातन विषय आहे. अखिल जीवन हाच एक अखंड संग्राम असल्यामुळे तो सारा नाट्यमयच आहे. मानवजीवन विकासक्षम असल्यामुळे मानव-जीवनातील संग्राम नित्य नूतन रूप धारण करतो आणि त्यामुळे रंगकले-लाही नवीं नवी रूपे प्राप्त होतात.मनुष्याचा पहिला संग्राम पाचभौतिक जड सृष्टीशीं चालतो. निसर्गाच्या कठोर नियतीशी भावनामय कोमल आत्म्याचा होणारा करुण संघर्ष हें नाट्याचे प्रथम स्वरूप आहे. मनुष्यसमाजांतीलच एकाद्या व्यक्तीशीं वा व्यक्तिसमूहाशी दुसऱ्या व्यक्तीचा वा व्यक्तिसमूहा-चा हितविरोध येऊनहि संग्राम सुरू होतो. हे नाट्याचें दुसरें स्वरूप होय. एकाच व्यक्तीच्या जीवनांत सत् आणि असत् अशा दोन विरोधी भावनांचा अथवा विकारांचा जो संग्राम चालतो त्याचें चित्रण करणें हें नाट्याचें तृतीय स्वरूप होय. एकाच व्यक्तीच्या जीवनांत एखादे वेळीं दोन सद्भावनांचाच तीव्र विरोध जेव्हा उद्भवतो तेव्हा त्या तुमुल संग्रामाचें चित्र रेखाटणें हे नाट्याचें चवथें आणि सर्वश्रेष्ठ स्वरूप होय.

जगांतील आजपर्यंतचीं सव नाटकें अवलोकिली असतां तीं या चार प्रकारांत सामावतात असें आपणांला सहज दिसुन येईल.

या संग्रामामुळे मानवी आत्म्याची भावशुद्धि होऊन त्याची उन्नति आणि प्रगति होत असल्यामुळें या संग्रामाला आध्यात्मिक दृष्टीनें विशेष महत्त्व आलेलें आहे. जड सृष्टीच्या आणि संकुचित वृत्तींच्या कोंडीत सापडलेल्या आत्म्याला ती कोंडी फोडून आपलें चैतन्यरूप पुनः प्राप्त करून घेण्यासाठीं दीर्घ तपस्येतून जावें लागतें.अनेक दुःख परंपरा भोगाव्या लागतात. म्हणून जीवनाची सारी साधना करुणगंभीर झालेली आहे. भव-भूतीनें 'एको रसः करुण एव' असें म्हटले आहे तें याच अर्थानें. आणि ग्रीक Tragedy लाहि महत्व दिलें जातें तेंहि यामुळेच. पण कारुण्य म्हणजे हळवेपणा नव्हे, अथवा Tragedy म्हणजे वैफल्यपूर्ण हळहळ नव्हे. जीवनांतील दारुण प्रसंगांनी आत्म्यांची मोहनिद्रा नाहींशी होते आणि त्याला आपल्या निर्द्वंद्व स्थितीचे भान होऊन तो व्यावहारिक शोक मोहांच्या अतीत होतो. म्हणूनच Tragedy ने प्रेक्षकांची चित्तशुद्धि (Catharsis) होतें असें ॲरिस्टॉटलनें सांगितलें आहे Tragedy मुळें जीवनाचें सत्यस्वरूप स्पष्ट होतें; आणि त्यामुळें चित्ताला शांति लाभते. नाटयकला अशा रीतीनें जीवनाला आत्मबोध करून देणारी श्रेष्ठ अध्यात्म कला आहे.

आजपर्यंतच्या पौरस्त्य–पाश्चात्य 'अभिजात नाटया' (Classical Drama)कडे पाहिलें असतां वरील उपपादन सहज स्पष्ट होण्यासारखें आहे. आधुनिक नाटय(Modern Drama)म्हणून जी नवीन चळवळ युरोपमध्यें इब्सेनपासून निघाली आहे,तिचा कांही अभिजात नाटया (Classical-Drama) शी तात्त्विक विरोध नाहीं. मात्र एका गोष्टींत इब्सेनचें नाटय प्राचीन नाटयाहून पुढें जाऊं पाहात आहे. प्राचीन नाटयांत मनुष्यस्वभाव स्थिर व बहुतांशी अपरिवर्तनीय मानिलेला दिसतो.आधुनिक नाटयांत मानवी स्वभावघटनेची मीमांसा करण्याचा प्रयत्न चाललेला आहे. भौतिक शास्त्रांचा विकास झाल्यामुळें ही मीमांसा करणें अधिक सुलभ झालें आहे. मार्क्स आणि फ्रॉयड इत्यादींच्या समाजशास्त्रीय मीमांसांचा आश्रय करून मानवी जीवनांतील संग्राम उलगडून दाखविण्याची

आधुनिक नाटयाची आकांक्षा आहे. ही आकांक्षा ज्या मानाने सफल होत जाईल त्या मानानें नाटयकलेला समाजजीवनाला उद्‌बुद्ध आणि उन्मुक्त करण्याचे कार्य अधिक यशस्वितेनें करितां येणार आहे. या दृष्टीने आधुनिक नाटयाचें आपण स्वागत करावयास हरकत नाही.

---

# एक आदर्श जीवन

*" This is the true joy in life, the being used for a purpose recognised by yourself as a mighty one; the being thoroughly worn out before you are thrown on the scrap-heap; the being a force of nature, instead of a feverish selfish little clod of ailments and grievances, complaining that the world will not devote itself to making you happy."*

—G. B. SHAW.

१९२९ च्या उन्हाळ्यांतील गोष्ट. सासवन्याच्या 'वैश्य-विद्याश्रमा'चा वार्षिक उत्सव कर्नाटक-केसरी श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्ष-तेखालीं व्हावयाचा होता. आश्रमाची कीर्ति सर्वत्र पसरली होती, पण मला मात्र प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ झाला नव्हता. या प्रसंगानें मी गेलों. निसर्गसौंदर्याच्या विपुलतेत आश्रमीय कार्याचें चित्र मोठें मोहक मला वाटलें. तेथल्या विद्यार्थ्यांच्या वागण्यांतील मोकळेपणा, मुखावरील आनंदी वृत्ति आणि कामाची शिस्त, यांच्याबरोबरच जीवनांतील शुचिर्भूतता आणि तेजस्विता, या सर्व गोष्टी माझ्या मनाला भेदून गेल्या आणि या सर्व शक्तीचें केंद्र मी पाहूं लागलों. आश्रमांतील रहाणीचा साधेपणा, विद्या-लयांतील विविध विभागांचा रेखीवपणा, या सर्व गोष्टी पाहता पाहतां मला त्यांतील आत्मिक सौंदर्यानें भारून टाकिलें. या सर्व सौंदर्याची जीवनमूर्ति

मी शोधक नजरेनें तपासूं लागलों. आचार्य ढवण आणि शास्त्रीजी यांचा परिचय होता. ढवणांची कर्तृत्वशक्ति आणि शास्त्रीजींची भक्तिवृत्ति यांच्या जोडीला आणखी एक तेजस्वी व्यक्ति असली पाहिजे अशी मला शंका आली. कार्यक्रम सुरूं झाल्याबरोबर शास्त्रीजींच्याच वेषांत असलेली, चप॰ ळपणानें सर्व कामांना चालना देणारी, अंगानें सडसडीत, मुखावर हास्य आणि डोळ्यात बुद्धिमत्तेची चमक असणारी मूर्ति एकदम ठळकपणें नजरेंत भरली. थोडया चवकशी नंतर कळलें कीं, हे 'नाना काणे.'

नाना काणे यांचा माझा मुळींच परिचय नव्हता. पुण्याच्या 'लोक॰ शिक्षणां'त त्यांचे एकदोन लेख पाहिले होते. 'कुलाबासमाचरां'त त्यांच्या अलिबागेंतील व्याख्यानांचा एकदोनदां साराश पाहिला होता. पण तेवढ्यानें त्यांच्या स्वभावाची कल्पना कशी येणार? उत्सवाच्या गर्दींत नानाशीं बोलण्यासवरण्याची संधि मिळाली नाही. तथापि आश्रमाचा सूतविभाग मी पाहिला. त्या वेळीं तेथील निरनिराळे नकाशे, खादी॰ विषयक यथार्थ कल्पना येईल असे तक्ते आणि व्यवस्थितपणें लावून ठेवलेलें सूत, चरखे, माग इत्यादि साहित्य यांच्या अवलोकनानें माझ्या मनावर फारच खोल परिणाम केला. त्यांतील टापटीप आणि सौंदर्य याची मला कधींच विस्मृति होणार नाहीं. मला समजलें कीं नाना काणे यांचें तें कर्तृत्व. कार्याच्या सौंदर्यावरून कर्त्याच्या आत्मसौंदर्याची कल्पना जेवढी करितां येईल ती करीत मी परत गेलों.

लाहोरची राष्ट्रीय सभा झाली. महात्मा गांधी यांनीं मिठाचा कायदेभंग करावयाचा ठरवून दाडी–यात्रा सुरूं केली. वर्तमानपत्रावरून मला समजलें कीं कित्येक महाराष्ट्रीय व्यक्तीचा महात्माजींनीं आपल्या पहिल्या तुकडींत संग्रह केला. महाराष्ट्रांतील कॉंग्रेस कमिटींत मतभेद चाललेच होते. कायदेभंगाच्या कामासाठीं स्वतंत्रपणें कॉंग्रेस–पक्षाची निर्मिति झाली आणि श्री. शंकरराव देव यांच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रहाची तयारी जोरानें चालू झाली. कुलाब्याकडील भागांत कांहीं काम करतां आलें तर पहावें यासाठीं माझेकडे तें काम देण्यांत आलें. प्रत्यक्ष काम करण्याला प्रारंभ करण्यापूर्वीं दांडी–यात्रेवर जाऊन महात्माजींची कार्यपद्धति समजून घ्यावी, शक्य तर त्यांच्या पथकांतील महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांची महाराष्ट्रासाठीं

मागणी करावी, या हेतूनें मी सुरतला गेलों. मी एका बाजूला उभा राहून यात्रिकांचें अवलोकन करीत आहें तोंच मला ' नाना काणे ' यांनीं पाहिलें आणि अगदीं निगर्वीपणें मला त्यांनीं म्हटलें, ' मला ओळखतां काय ! मी काणे. ' मी तर त्यांच्याशी कसें बोलणें सुरू करावें या विचारांत होतों. थोडयाच वेळानें शास्त्रीजी भेटले. आमचें तिघांचें बराच वेळ बोलणें चाललें होतें. काणे आणि शास्त्रीजी यांच्यासारख्या तेजस्वी पुरुषांना गांधी-जीच्या पहिल्या तुकडीत जागा मिळाली यामुळें मला साहजिकच आनंद आणि अभिमान वाटला. तथापि महाराष्ट्रांत चाललेल्या सत्याग्रहाच्या तयारीसाठीं त्यांचा उपयोग व्हावा या इच्छेनें मला, त्यांनी महाराष्ट्रांत परत यावें, असें वाटत होतें. दाडीयात्रेच्या पूर्वी महाराष्ट्रांत कांहीं मंडळींनीं स्वातंत्र्याच्या ठरावाचा उपहास केला होता. परंतु महत्माजींच्या पुण्याईनें महाराष्ट्रात मतभेद मालवूं लागले आणि स्वातंत्र्याच्या ठरावाला विरोध करणारांनी सुद्धां महात्माजीच्या नेतृत्वाखालीं कायदेभंगाच्या चळवळींत सामील व्हावयाचें ठरविलें. कुलाबा जिल्ह्यांतील परिस्थितिहि अगदींच बदलून गेली होती. एकमताने सत्याग्रहाची चळवळ चालविण्याची शक्यता दिसूं लागली, आणि काणे–शास्त्रीजी याची कुलाब्याच्या कामाला मी गाधीजींकडे मागणी केली. तथापि दांडीला गेल्यानंतर तुकडीसह गांधी-जींना सरकारनें पकडलें नाही तर त्याच्या इच्छेनुसार त्यांना आपापल्या प्रातांत जाण्याची परवानगी मिळेल असें दिसून आलें. मी परत आलों.

महाराष्ट्राचें मुख्य केंद्र विलेपार्ले येथें झालें. दुसरें केंद्र कुलाब्यात पेण येथें करण्यात आले. श्री. रामभाऊ मंडलीक यांनी अत्यंत उत्साहानें कार्याची सुरवात केली. महाराष्ट्रीय कार्यकर्ते गांधीजीकडून परत मिळ-विण्याची खटपट श्री. देव इत्यादि महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं चालविलीच होती. तिला यश येऊन श्री. काणे, शास्त्रीजी, अंनतराव कटकोळ, इत्यादि मंडळी पेणला एके दिवशी अचानक येऊन दाखल झाली. श्री. काणे यांना शिबिराधिपति करण्यांत आलें. यावेळी मी त्यांचेबरोबर पेणचे शिबिरां-त काम करीत होतों. नानांचा खरा स्वभाव यावेळीं मला दिसून आला. महात्मा गांधींच्या सत्याग्रह तत्त्वज्ञानांतील अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे परमेश्वरावरील अलोट श्रद्धा. केवळ राजकीय वृत्तीनें सत्याग्रहांत सामील

झालेल्या लोकांत आणि खऱ्या सत्याग्रहींत हा भेद उत्कटतेनें दिसून आला. नाना खरेखुरे सत्याग्रही होते. त्यांची स्वातंत्र्याची तळमळ जितकी तीव्र होती तितकेंच अहिंसेवरचें त्याचें प्रेम गाढ होतें. त्यांच्या सान्निध्यांत मला अहिंसावृत्तीचा अनुभव आला. देश आणि देव हीच त्याची दोन दैवतें होती. देशासाठी स्वार्थत्याग करण्यांत त्यांना अत्यंत आनंद वाटत असे. अहिंसेच्या मार्गानें जात असतां आपण केवळ ईश्वरकृपेला पात्र होण्याचीच साधना करीत आहोंत, असें त्याना वाटत असे. वडाळ्याचे बाजूला खंडोगणती मिठाचे क्षेत्रावर निवडक मंडळींनी चाल करावयाची एक योजना श्री. शंकरराव देव यांचे मनांत घोळत होती. त्यासाठी ते पेणला आले. या बाबतीत तेथील शिबिरांतील मंडळीशीं बोलणें करण्याचा त्यांचा विचार होता. नानांजवळ गोष्ट निघल्याबरोबर शांतपणें नानांनी उत्तर दिलें, "शंकररावजी, आमचे प्राण आपल्या हातांत आहेत असें समजा. आपण ठरवाल त्या कार्यक्रमांत आम्हीं आहोंत असें धरून काय पाहिजे ती योजना करा. आम्ही आपल्या शब्दाबाहेर नाही."
श्री. देव यांना लगेच पकडण्यात आले. नानानी पेणच्या शिबिरासाठीं खूप प्रचार केला. पेणच्या प्रथम सत्याग्रहाचे मिरवणुकीत काणे अग्रभागी होते. शास्त्रीजी व काणे यांच्या 'रघुपति राघव राजाराम' या प्रेमळ भजनांत मी क्षणभर इतका विरून गेलों कीं, राजकीय क्षोभाची वृत्ति नाहींशी होऊन केवळ ईश्वरी निष्ठेनें देहार्पण करण्यासाठी आपण चाललों आहों याची मला अनुभूति आली. अहिंसा वृत्तीचा हा साक्षात्कार माझ्या आयुष्यावर कायमचा परिणाम करून गेला आहे. नाना काणे यानां याचें कांहीं श्रेय द्यावयास मी आनंदानें तयार आहें.

पेणला मला प्रथम शिक्षा झाली. मला रात्री 'लॉकअप'मध्ये ठेविल्यानंतर नाना जेवण घेऊन आले. त्यांची प्रेमवृत्ति इतकी उत्कट होती कीं सहज ते दुसऱ्याशीं एकरूप होऊं शकत. विश्वकुटुंबी वृत्ति दृढ झालेल्या माणसाचें वर्तन कसें असते याचा मी तो एक उत्तम नमुना म्हणून हृदयाशीं जतन करून ठेविला आहे. मला एक वर्षाची शिक्षा झाली. माझ्या मागोमाग कांहीं दिवसानी त्यांची तुरुंगाकडे रवानगी झाली.

ठाण्यांस तुरुंगांत कांही आठवडे आम्ही एकत्र रहात होतों. नानांच्या स्वभावांतील आणखी कित्येक दालनें या वेळी मला उघडीं झाली.

सौजन्य हा नानाचा मुख्य गुण होता. परांतराला ढका लागेल अशी वर्तणूक त्यांची कधीं झालेली मला दिसली नाहीं. हें सौजन्य त्यांच्या सर्व जीवनांत मुरलेलें होतें. त्यांची वाणी मृदु असे पण त्यांत मिथ्याचार नव्हता. त्यांचे विचारहि इतके मृदु असत कीं त्यांना कठोर रीतीनें लिहिलेले ग्रंथ रुचत नसत. तुरुंगांत शॉची नाटकें आलीं होतीं. मी शॉचा मोठा भक्त. नानाना मी त्याच्या तीव्र विचाराबद्दल शिफारस करीत असें. नानांनी शॉ वाचण्यास प्रारंभ केला. पण सामाजिक दंभांचा तीव्र उपहासाने केलेला विध्वंस त्यांच्या सौजन्यपूर्ण मनाला मानवला नाही. ' इतकी कठोर भाषा उद्वेगकारक आहे. यानें लोकांचीं मनें दुखविली नाही का जाणार ? हेंच सारें सौजन्याच्या भाषेनें नाही कां मांडतां येणार ? ' असे त्यांचें म्हणणें असे.

नाना अत्यंत विद्याप्रिय होते. विद्यार्थिदशेत त्यांनीं अनेक विषयांचा दीर्घ अभ्यास केला होता. तुरुंगातहि विविध विषयांवरील ग्रंथ त्यांचे हातात असत. इतिहासाची त्यांना फार आवड होती. त्याविषयी त्यांनी खूप वाचले होते आणि विचारहि चांगला केला होता.

तुरुंगांत निरलसपणानें त्यांची दिनचर्या चाललेली असे. नेमून दिलेलें काम आवडीनें, उत्साहानें ते पुरें करीत आणि इतरांची सेवा करण्याला नेहमीं हंसत मुखानें तयार असत. शास्त्रीजी आणि काणे यांचें भक्तिपूर्ण भजन ही गोष्ट त्यांच्या सांन्निध्यांत आलेला कोणीहि मनुष्य कधीं विसरणार नाहीं.

' सुनरी सखी मोहनकी वो बन्सरी पियारी ' या ब्रह्मानंदाच्या गोड गीताचे त्यांनीं म्हटलेले भक्तिपूर्ण सूर अद्यापि माझ्या कानांत घुमत आहेत.

त्यांना सेवेचा इतका ध्यास होता की, आपलें सर्वस्व त्यांनीं सेवेंतच खर्च केलें. सत्याग्रह तत्त्वज्ञान त्यांनीं आत्मसात केलें होतें. मला नेहमीं वाटतें कीं, ब्राह्मणाचा आदर्श सत्याग्रह–धर्मच आहे. असत्य आणि हिंसा यांचा एकांतिकतेनें त्याग करून विश्वाच्या सेवेंत आपला मोक्ष मिळविण्याची साधना सत्याग्रहाला आचरावयाची आहे. ब्राह्मणाचा धर्महि तोच

आहे. ब्राह्मणाचा देह भोगासाठीं, कीर्तीसाठी नाही; तो ज्ञानासाठी, तपस्येसाठीं आहे. नानांच्या वर्तनाकडे पाहिलें कीं, मला ते उच्च ब्राह्मण धर्म पाळीत आहेत असेच वाटे. परिग्रहाची त्यांना यत्किंचित्‌हि लालसा नव्हती. ते आजन्म विद्यार्थी होते. आमरण ब्रह्मचारी राहून आपल्या समाजाची त्यांनीं निष्काम सेवा केली.

महाराष्ट्रांत त्यांची फार थोड्यांना माहिती झाली असली तरी त्यांचें जीवन अतिशय मूल्यवान् होऊन गेलें. खुद्द कुलाब्यांत ७।८ वर्षे काम करीत असूनहि त्याची कोणाला कधीं माहिती झाली नाही. विद्वत्ता वक्तृत्व, त्याग, शुचिता इत्यादि बहुमोल गुण अंगीं असून प्रसिद्धीची हाव त्यांना कधीं देखील शिवली नाही. आपण अखंड सेवेंत झिजावें हीच त्याची इच्छा होती.

महात्मा गांधींनीं असहकारितेची चळवळ सुरू केल्यानंतर अनेकद त्या चळवळीला 'आत्मशुद्धीची चळवळ' म्हणून त्यानीं संबोधिलें आहे. आणि गेल्या पंधरा वर्षांच्या भारतीय इतिहासाकडे पाहिलें तर राष्ट्र अन्त मुंख बनून आपला धर्म शोधीत असल्याचें आणि आपल्या मोक्षासाठीं सर्वांगीण साधना करूं लागल्याचें आढळून येईल. गांधीजींनी राजकीय आदोलन तर केलेंच, पण त्याबरोबर राष्ट्रांतील विचारवंताच्या हृदयांतील अत्यंत उच्च मनोवृत्ति जागृत केल्या, जीवनधर्म शिकविला, याची साक्ष पटल्याशिवाय राहणार नाही. या सर्व-श्रेष्ठ कार्याबद्दल भारतीय जनता महात्माजींची सदैव ऋणी राहील. सत्याग्रह-दर्शनानें जो नवीन जीवनाचा आदर्श आपणांपुढें ठेविला आहे, त्याप्रमाणे आपल्या वर्तनाला वळण लावण्याच्या प्रयत्नात अखंड आशावादानें नाना निरत झालेले होते.

पुढें ते आजारी असतांना १९३२ च्या सत्याग्रह लढ्याचे वेळीं मी त्यांना पेणला भेटलों. सर्वांगावर सूज आलेली. उठण्या बसण्याची शक्ति नाहीं. अशा वेळीं त्यांना पाहिल्याबरोबर माझ्या डोळ्यांत अश्रू आले. नानांचे विचार किती शुद्ध, त्यागमय होते याचें त्यावेळी मला पुन्हा दर्शन झालें. नाना म्हणाले, "चळवळ निघाली आहे. मी तर आज उभा राहूं शकत नाहीं. तथापि गोळीबाराचा प्रसंग आला तर मला नेऊन समोर उभा करा. या देहाचें पतन तेथें होऊं दे असें मी येथल्या मित्रांना

सांगितले आहे." माझ्यानें हें ऐकवलें नाही. अशा शुद्ध हृदयाच्या रक्तसिंचनानेच सत्पुरुषांचे पीक राष्ट्रांत येत असतें. असा त्याग करण्याची पात्रता ज्या राष्ट्रांत आहे त्याचे भवितव्यतेविषयीं शंका देखील घेण्याचें कारण नाहीं. हा त्याग वाया जाणार नाहीं. सहस्रपटीनें त्याचें फल परमेश्वर दिल्याशिवाय रहात नाहीं अशी माझी खात्री आहे.

पुढे मला पुन्हां कारावासांत जावें लागलें. कांहीं महिन्यांनीं नानांचा काळ झाल्याचें मला समजलें. येरवड्यांत महात्माजींच्या भेटीस गेलों असतां नानांच्या मृत्यूची बातमी मी गांधीजीना सांगितली. त्यांनाहि त्याचे आधीं ती वार्ता कळली होती. मी सांगितल्यावर क्षणभर त्यांची मुद्रा गंभीर झालेली मला दिसली.

सुटून आल्यानंतर कित्येक दिवसांनी शास्त्रीजींची भेट झाली. शास्त्रीजी जवळून ब्रह्मानंदाचें तें भजन म्हणून घेतलें. सारा वेळ नानांची मूर्ति त्यांच्या शेजारीं बसून गात आहे असा मला भास होत होता.

---

# आकाशांतील फुलें व पृथ्वीवरील तारे

## ( आचार्य कृपालानी यांच्या लेखाचा अनुवाद )

माझे वडील हे आता नष्ट झालेल्या जुन्या युगांतील एक गृहस्थ होते. ब्रिटिश लोकांनी आमची वैराण भूमि जिंकून घेतली त्यापूर्वी त्यांचा जन्म झाला होता. त्यांना इंग्रजी येत नव्हतें आणि आपल्या शाळा-शिक्षकांच्या हातांखालून ते गेले नव्हते. ते भगवान् श्रीकृष्णाचे परम भक्त व कडक वैष्णव होते. सिंधमध्यें इतका कडक वैष्णव आढळणें कठीणच.

आमच्या घरांत एक लहानसें देवघर होतें. वडील सकाळीं लवकर उठून पूजा करण्यासाठीं तेथें बसत आणि त्यांतच दुपारीं बारावर एक होऊन जाई.

आमचें घर शहरांत आलेलें होतें, तरीपण देवपूजेसाठी प्रत्येक ऋतूंत

फुलांची आवश्यकता असल्यामुळें आम्ही फुलांचे वाफे लाविलेले होते. हीं फुलें तोडावयाची नाहीत, तीं देवासाठीच आहेत हें लहान मुलालाहि ठाऊक असे. त्यांना स्पर्श करण्याचें धाडस कोणी करावयाचें नाहीं अशी प्रथाच होती.मात्र कुटुंबात कोणी आजारी पडलें म्हणजे देवावर वाहिलेल्या फुलांपैकीं कांहीं फुलें त्याला देण्यांत येत.

कडक थंडीच्या दिवसांतहि वडील रात्री उघडया आकाशाखालचि प्रार्थना करीत. तासन् तास ते बसून राहत आणि ताऱ्यांकेड पाहत असत. आकाश पहाण्यासाठी मलाहि बोलावीत.मी भीत असें. काळ्याभोर रात्रीची मला भीति वाटे, आणि बुबुळे गळून पडलेल्या डोळ्यांसारखे तारे भयंकर वाटत–जणुं एखाद्या सापळ्याचेच डोळे मजकडे पहात आहेत! पण वडील कोठले मला जाऊं देणार! ते म्हणत, "भिऊं नको, बेटा! आपल्या येथें हीं फुलें आहेत तशीच तीं फुलें आहेत. हीं पृथ्वीवर आहेत आणि ती आकाशात आहेत इतकाच भेद. आपण जशी यांनी देवाची पूजा करितो तशीच त्या फुलांनीं आकाशांतहि त्याची नित्य पूजा होत असते. हीं पृथ्वीवरील फुलें खरोखर आकाशांतील तारेच आहेत. तारे पहिल्याने भाऊ भाऊ म्हणून आकाशांत राहत असत. पण त्यांच्यामध्यें भांडण उत्पन्न झाले आणि ते वेगळे पडले. फुलें इकडे पृथ्वीवर आले आणि तारे आकाशांतच राहिले. थोडया दिवसांनीं ताऱ्यांना समजलें की, आपले पृथ्वीवरील बांधव दुःखांत पडले आहेत. पृथ्वीवरील दयाहीन माणसें त्यांना तोडून घेतात. त्यांचें सर्व अंग कुस्करून टाकतात आणि त्याना चोहोंकडे विखरून देतात. आकाशांतील ताऱ्यांना याविषयीं सदैव फार दुःख होत असते आणि त्यांना फुलांची मोठी दया येते. हें दुःख पुनः पुनः पाहून तारे रडतात. सकाळीं लवकर उठून पाहिलेंस तर त्यांनीं ढाळलेलीं आसवें फुलांवर पडलेलीं तुला दिसतील. उद्या सकाळीं ते प्रेमा–शोकाचे अश्रू मी तुला दाखवीन.

पण मी म्हटलें, "आपल्या सांगण्यावरून मी एखादवेळीं पूजेसाठीं फुलें आणावयास जातों तेव्हां मी ते अश्रू पाहिले आहेत." वडील यावर प्रसन्न होऊन म्हणाले, "हं, तूं बरोबर पाहिलें आहेस. पण कित्येक धैर्य-शाली तारे केवळ अश्रू गाळूनच रहात नाहींत. त्यांचें प्रेम इतके निःसीम

आहे कीं, आकाशांतून तुटून फुलाच्या दुःखांत सहभागी होण्याची ते इच्छा करितात. परंतु ते इतके नाजूक आहेत की, पृथ्वीवर पाय ठेवितांक्षणींच ते मरून जातात. तेथील हवा त्यांना विषासारखी होत. तूं या गळून पडणाऱ्या ताऱ्यांना कधी पाहिलें नाहीस काय?"

होय, मी त्याना पाहिलें होतें. माझ्या वडिलांवर माझी श्रद्धा जडली. त्यांनी सांगितले त्याप्रमाणेच्च हें सारें घडत असलें पाहिजे अशी माझी खात्री झाली. ते म्हणाले, "या भावंडांना एकत्र आणण्याचा आता केवळ एकच मार्ग उरला आहे. पृथ्वीवरचीं फुलें तोडून ईश्वराच्या पायी अर्पण करावयाची. आपण असें केले म्हणजे मग तीं पुनः स्वर्गात अवतार घेतात आणि तारे बनतात."

ही गोड करुणकथा माझ्या हृदयात जाऊन राहिली.वाफ्यांतील फुलांना स्पर्श करण्यास मी धजत नसें तें रूढीमुळें आणि राग होईल या भीतीमुळें. पण या कथेचा संस्कार इतका दृढ झाला की, त्यानंतर इतर कोठेंहि माझ्याने फूल तोडवलें नाहीं.

मी मोठा झालों, शाळेंत जाऊं लागलो, आणि वरच्या वर्गात आलों. शिक्षकांनीं मला ज्योतिष,प्राकृतिक भूगोल व रसायनादि विषयांचे थोडें थोडें ज्ञान दिलें. तें चमत्कारपूर्ण होतें. त्यांनी मला शिकविलें की, आकाशांतील हीं लहानलहान फुलें म्हणजे पृथ्वीसारखे मोठेमोठे गोल आहेत आणि आपण राहतो त्या पृथ्वीपेक्षाहि ते मोठे आहेत. त्यांनी मला असे शिकविले कीं, आपल्या बगीचांतील लहान लहान तारे हे हैड्रोजन, ऑक्सिजन व इतर कांही पदार्थ यांचे बनलेले आहेत. माझे स्वप्न उडून गेले. वडिलांनीं सांगित लेली कथा इसापाच्या एखाद्या गोष्टीप्रमाणें मला भासूं लागली. त्याबरोबरच आतां मी असेंहि शिकलो होतों कीं, माझे वडील म्हणजे एक जुन्या युगांतील धर्मभोळे गृहस्थ. त्यांचें ज्ञान केवळ कोंबड्याच्या आणि बैलांच्या गोष्टी सांगण्यापुरतेंच.

या मोठ्या ग्रहांमध्यें मला कधी आनंद वाटला नाहीं. निरर्थक—ध्येयशून्य त्यांचे भ्रमण चाललें होतें. पूर्वी मला त्यांत सौंदर्य दिसे आणि आनंद वाटे, तें नाहीसें झालें. आता ते मजबरोबर हसत ना आणि नाचत ना. आणि पृथ्वीवरील या ताऱ्यांच्या संबंधांतहि तसेंच झालें. तेसुद्धां

सामान्य पदार्थांपासूनच बनलेले, तर मग माझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणे त्यांचा उपयोग होऊं शकेल. यामुळे कॉलेजमध्ये असतांना मी जवळजवळ रोज नियमितपणें फुलें तोडी आणि माझ्या परदेशी पेहेरावाला शोभा आणीं. माझ्या दृष्टीने ती आता निर्जीव होतीं. आपली 'टाय-पिन्' वापरावी त्याचप्रमाणे त्यांना पण वापरावयाचें. माझ्या बटनांत घालण्यासाठी फुलांचा एक झुपका मला पाहिजेच. आताहि तीं सुंदर भासत असतच; पण काय ती स्वतः सुंदर होतीं म्हणून? नाही, माझ्या सुंदर वस्त्रांना सुशोभित करण्याचे साधन म्हणून ती उपयोगी पडत एवढ्यामुळे. तीं तोडतांना आता मला संकोच वाटत नसे. कित्येक वेळां मी आपले मेज या फुलांनी सुशोभित करी. जुनीभोळी समजूत निघून गेली होती. तारे व फुलें आता भाऊभाऊ राहिले नव्हते. थोडी सुंदरता होती खरी. पण अंतीं ते जड पदार्थच.

मोठ्या सुटीत मी घरीं येत असें. तेव्हा मी ती जुनी प्रथा पाळीत नसें. बटनासाठी मी फुले तोडीं. वडील पहात तेव्हा ते रागें भरत. त्या वृद्ध पुरुषाला मी भोळसर समजत असें; परंतु असल्या क्षुल्लक गोष्टीसाठी त्यांना चिडविणें निरर्थक आहे असें मला वाटे. यासाठी मी बाजारांत जाऊन फुलें विकत घेई.

आणि घरांतील तें लहानसें देवघर—तीहि आता अशीच एक धर्मभोळेपणाची गोष्ट वाटत असे. तथापि त्यांत जें एक प्रकारचें माधुर्य भरलेलें होतें त्याची अवगणना माझें सुधारलेलें मनहि करूं शकत नसे. त्यांत गंभीर शांति व्यापून राहिलेली असे. शेणाने सुंदर रीतीने तें नित्य सारविलेलें असावयाचें. सुगंधी धूप जळत असावयाचा आणि धूप नसला तरीसुद्धा तेथे सुगंध असावयाचा. भिंतीवर देवादिकांचीं चित्रें चितारलेलीं होतीं; आणि त्यांच्या मध्यभागीं श्रीनाथजींची भयंकर मूर्ति असे ती मला आवडत नसे. तरी पण आसपासच्या रम्य चित्रांच्या पायीं मी ती सहन करीत असें. कॉलेजमध्ये चित्रांसंबंधी मला प्रेम वाटूं लागलें होतें. पाश्चात्त्यांचीं कित्येक अर्धनग्न चित्रें मीं विकत घेतलीं होतीं. देवदेवताची चित्रें इतकीं सुंदर कधी नव्हतींच. तथापि त्यांपैकी काही कांही मला आवडत. माझ्या सुटींत बाहेरील रेताड प्रदेश सूर्याच्या प्रकाशाने धगधगूं लागला

म्हणजे मंदिराच्या त्या लहानशा खोलींत मी आपला वेळ घालवीं. तेथे बसण्यांत मला शीतलता आणि आनंद यांचा लाभ होई. पण वृद्ध वडिलांना यांतलें कांही एक ठाऊक नसे. या प्रकारच्या उपभोगाला ते धर्मद्रोह समजत.

आतां वडील निघून गेले आहेत. मीं कॉलेज सोडल्यालाहि कित्येक वर्षे झाली आहेत. शिक्षक व ग्रंथ यांची सर्वाधिकारी सत्ता आता मला त्रास देऊं शकत नाही. माझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणे मला विचार करतां येतो. कॉलेजाने जुन्या भ्रमापासून मला मुक्त केले होते. जीवनांत आता मला दिसून येत आहे की, कॉलेजच्या या नव्या भ्रमापासूनहि मी हळूहळू मुक्ति मिळवीत आहें. विज्ञानाचे भ्रम आता नाहींसे होऊं लागले आहेत. पण वडिलांच्या भोळसर समजुती एकामागून एक माझ्यावर परत आपली सत्ता प्रस्थापित करीत आहेत. कित्येक वर्षांत महाविद्या. लयांतील देवपूजेच्या कामाशिवाय अथवा दुखणेकरी मित्राच्या शय्येजवळ ठेवण्यासाठी लागतील त्यांशिवाय मीं फुले क्वचितच तोडिलीं असतील- हारामधील फुलांचा स्वीकारहि शक्यतों मी करीत नाही.

माझ्यामध्ये हळूहळू एक श्रद्धा उदय पावत आहे की, फुलें हीं केवळ ईश्वराच्या पूजेसाठीच आहेत. खरें सांगावयाचें तर मला असेंच वाटूं लागलें आहे की, ईश्वराच्या चरणीं वाहिलीं तर तीं आकाशांत राहणाऱ्या आपल्या भावंडांना पुनः एकदा जाऊन मिळतील. एखादे वेळी प्रातःकाळीं मी उद्यानांत फिरतों तेव्हाहि माझी दृष्टि ते शोक व प्रेम यांचे गोड चिंतातुर अश्रू शोधीत फिरत असते. चंद्राने शोभणाऱ्या रात्रीपेक्षा ताऱ्यांनी चमकणाऱ्या रात्रीकडेच माझें प्रेम अधिक धावत जातें. आणि रात्री एखादे वेळीं दृष्टि सहज आकाशाकडे गेली असतां बालवयात होई त्याप्रमाणें पुन: एकवार ते तारे हसतात आणि नाचतात. आता हें खरें की, मला त्यांचें संगीत ऐकूं येत नाही; पण तो माझ्या कानांचा दोष. घरांतील त्या लहान देवघराविषयी माझा पूज्यभाव आता हळूहळू वाढूं लागला आहे आणि मी त्याचे अलंकार उतरविण्याला प्रतिबंध केला आहे. वृद्ध पिताजींसह त्याचा आत्मा उडून गेला असला तरी त्याचें शरीर अद्यापि जसेंच्या तसेंच तेथे उभें आहे. विशेष आश्चर्याची गोष्ट ही की

एके काळीं भयंकर वाटणाऱ्या त्या श्रीनाथजींच्या मूर्तींतहि माझ्या दृष्टीला आता सौंदर्य दिसूं लागलें आहे. आणि तुम्ही हंसणार नसाल तर सांगतों —मान्य करितों की, त्यांचेंच चित्र सांप्रत मी आपल्याबरोबर बाळगितों. हीं सारीं चित्रें भ्रमाचीं आहेत कीं बुद्धि परत आल्याचीं?

---

# जीवनाचें साफल्य

" But we men of thought must each of us fight against the temptation that befalls us in moments of fatigue and unsettledness, of repairing to a world beyond the battle, called either God or Art or Freedom of the Spirit or those distant regions of the mystic soul. For fight we must, as our duty lies on this side of the ocean—on the battle-ground of men. "

—*Romain Rolland.*

जीवनासंबंधीं विचार निघाला कीं, अगदीं परस्परविरोधी वृत्ती गोंधळ माजवितांना दिसूं लागतात. जीवनाच्या क्षेत्रांत प्रथमच पाऊल टाकणाऱ्या नवबालकाची उत्साहानें ओसंडणारी वृत्ति आपणांस आशावादी बनविते, तोंच अनुभवानें अनुत्साह झालेल्या जीर्णवृद्धाची क्षीण वृत्ति निराशावाद दाखविते. आशेच्या आसऱ्यानें सुखाची साधना चालविणाऱ्या प्रवृत्ती-बरोबरच नश्वरतेच्या निश्चयानें जीवनाची कामनाच खडून टाकणारी निवृत्ति वावरत असते. जीवन सुखमय आहे या कल्पनेइतकीच जीवन दुःखमय आहे ही कल्पनाहि रुळलेली आहे. सत्ता, संपत्ति, स्त्री हीं सुखाचीं साधनें आहेत, अशा विश्वासानें कीर्ति आणि प्रीति यांच्या उपासनेंत मग्न असणाऱ्या लोकांच्याबरोबरच अर्थ आणि काम हीं दुःखाचीं

मुळे आहेत अशा निष्ठेचा पुरस्कार करून धर्म आणि मोक्ष यांच्या निर्मितींतच साफल्य मानणारे लोकहि दृष्टीस पडतात. जीवनाच्या एकाच क्षेत्रांत वावरणाऱ्या या लोकांमधील हा विरोध पाहिला म्हणजे जीवन ही एक मोठीच भुलभुलाई असावी असा संशय येऊं लागतो. जीवनाचें प्रयोजन काय याचा शोध जीवनांत करावयाचा की कल्पनेंत करावयाचा याविषयीं जर बुद्धीचा निर्णय होऊं शकला, तर या कोड्यांतून सुटण्याची शक्यता आहे. जीवनाचें साफल्य जीवनालाच सिद्ध करितां येईल. मानवी जीवन हें विश्वजीवनाचें एक अंग आहे आणि मानवी जीवनाचें साफल्य विश्व-जीवनाच्या साफल्यांतच अन्तर्भूत आहे, ही गोष्ट आपण दृढ ध्यानीं धरिली पाहिजे. मानवी जीवनांतील साफल्य काय, या प्रश्नाच्या उत्तरावरच व्यक्तिजीवनातील साफल्य काय याचेंहि उत्तर अवलंबून आहे. विश्वांतील एकंदर रचनेंत आणि विकासांत व्यक्तीला महत्त्वाचें स्थान असलें तरी व्यक्तीच्या विकासाला स्वतंत्र सामर्थ्य नाही. विश्वविकासांतच व्यक्तीच विकास शक्य आहे. जीवनांतील हा महत्त्वाचा सिद्धांत डोळ्याआड झाल्यामुळेच भ्रमोत्पादक तत्त्वज्ञानें निर्माण होतात आणि जीवनसाफल्याचा प्रश्न बिकट होत जाऊन शेवटीं जीवनाचें वैफल्य भासूं लागतें. व्यक्तिजीवनांतील सर्व प्रेरणाचा समन्वय ज्या साधनेंत झाला नाहीं, ती साधन संपूर्ण सत्य प्रकट करूं शकत नाही. विश्वजीवनांतील संपूर्ण प्रवृत्तीं आकलन झाल्यानेच व्यक्तिजीवनांतील विरोधी वृत्तींचा समन्वय हो शकेल. विश्वजीवनांतील संपूर्ण प्रवृत्तींचें ज्ञान होण्याचें अत्यंत नजीक व खात्रीचें ठिकाण म्हणजे व्यक्तिजीवनच होय. या व्यक्तिजीवनांती संपूर्ण वृत्तींचें आकलन करण्याचा प्रयत्न हाच जीवनाचा खरा धर्म आ जितक्या अंशानें हा प्रयत्न सत्यपूर्ण असेल तितक्या अंशानें जीवन सफ होत जातें; व त्या प्रयत्नांत जेवढें असत्य लपून राहिलें असेल तेवढ्य पुरतें जीवनाचें वैफल्य प्रतीत झाल्याशिवाय राहात नाहीं. जीवनाचे प्र जन जीवनांतच शोधावयाचें याचा हाच अर्थ होय.

विश्वजीवनाचे प्रयोजन काय म्हणून विचारिलें असतां त्याला एक ठराविक सांच्याचें उत्तर देणें म्हणजे आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन करण सारखें आहे. जीवनाचा धर्म शोधिला जात आहे आणि जीवन

तत्त्वज्ञान बनत आहे. अशा वेळीं जीवनाच्या सर्व रहस्यांचें ज्ञान आम्हांला झालें आहे, जीवनाची पूर्णता आम्हीं अनुभविली आहे, आमच्या कमरेला जीवनाच्या तिजोरीच्या किल्ल्या लटकून राहिल्या आहेत. अशा आरोळ्या ठोकल्यानें कांहीं भाबड्या लोकांची फसगत झाली, तरी विवेकी पुरुष अशा सांप्रदायिक सत्यानें संतुष्ट होणार नाहीत. कारण, जीवनाचा प्रश्न हा कोटीबाजपणानें सुटत नाही. मोठमोठ्या तत्त्ववेत्यांच्या सिद्धान्तांचे पिरॅमिड आड आले तरी जीवनाचा प्रवाह रुद्ध करण्याचें सामर्थ्य त्यांत असणार नाहीं. वाळूच्या किल्ल्याप्रमाणें जीवनाच्या पहिल्या लाटेसरसे ते ढांसळून पडतील यात शंका नाहीं. जीवन वाढतें आहे आाणि जीवनाचें प्रयोजनहि त्याच्याच बरोबर वाढत आहे. आपल्या समाधानासाठी जरी आपण जीवनाचा प्रश्न सोडविला असें मानिलें,तरी जीवनाला सामाधान मिळे-पर्यंत तो सोडविण्याचे प्रयत्न चालूच राहतील.मानवी समाजाच्या इतिहासांत अनेक संघानीं अनेक प्रकारची ज्ञाने मिळविली आणि अनेक प्रकारचे धर्म व अनेक प्रकारचीं तत्त्वज्ञानें तयार केलीं. प्रत्येक शोधकाची दृष्टि आपल्या दर्शनालाच पूर्णदर्शनाचें स्वरूप देण्याची असली, तरी जीवनानें हा त्याचा अहंकार मानिला नाही. जीवनाबरोबर दर्शनाला बदलण्याची तयारी दाखवावी लागली आहे. उद्दामपणानें आपल्या स्थैर्याची घमेंड बाळगणाऱ्या दर्शनाला जीवनानें कठोरपणानें आपल्या मार्गांतून दूर फेकून दिलें आहे. मागच्या अनुभवानें शहाणपणा शिकून आपण जड शास्त्रांना चिकटून न राहतां जीवनालाच शरण गेलें पाहिजे; म्हणजे जीवनाचें प्रयोजन आपणाला समजेल. प्रगतीची अथवा संस्कृतीची व्याख्या करणे कठीण असलें तरी कल्पना देणें शक्य आहे. अव्यवस्थित अशा घटनांची संगति लागून त्यांतील परस्पर विरोधांचा परिहार होणें आणि ज्ञानाच्या कक्षांत येऊन सर्वांच्या अविरोधानें त्यांची विकासांत पूर्णता होणें याला प्रगति म्हणतां येईल. मानवी जीवनांतील संस्कृतीची कल्पना अशी. मनुष्याच्या जीवनांतील सर्व प्रवृत्तींचें स्वरूप शुद्ध होऊन त्यांतील विरोध नष्ट होणें आणि त्याच्या स्वत्वाचा विकास होत राहणें. जीवनाची प्रगति आणि संस्कृति यांचें हें स्वरूप नित्य नवें रूप धारण करणारें, वर्धिष्णु-जयिष्णु असणार हें उघडच आहे. यासाठीं अखंड शोध

आणि अखंड साधना चालविली पाहिजे. विश्व-जीवनाची किल्ली व्यक्ति-जीवनांतच असल्यामुळें जीवनाचा प्रयोग निराशाजनक होण्याचें कारण दिसत नाहीं. व्यक्तीच्या जीवनांत ध्येयकल्पना सारख्या उत्पन्न होत असतात. मनुष्य हा सृष्टीचें बालक आहे आणि बालकाच्या आशावादानें व उत्साहानें तो आपल्या जीवनाच्या कल्पना बांधीत असतो. मनुष्याच्या अनेक व्याख्या रूढ असल्या तरी '**द्रष्टा**' हीच खरी कल्पना देणारी व्याख्या मानण्यास हरकत नाहीं. प्रत्यक्षांत वावरत असतांहि तो परोक्षाच्या कल्पना बांधीत असतो. निसर्गाचें ज्ञानहि तो आपल्या कल्पनाशक्तीनें वाढवून शुद्ध करून घेतो. जड बंधनांनी जखडलेल्या परिस्थितींतहि तो आपल्या कल्पनाशक्तीनें स्वातंत्र्याला स्थान निर्मितो कालचें चिंतन. आजचें वर्तन आणि उद्याचें कल्पन या सर्वांचें एका सूत्रांत ग्रथन करण्याची त्याची आकांक्षा मोठी उदात्त आहे. व्यक्तीची पूर्णता या त्याच्या द्रष्टेपणातच सिद्ध होणार आहे. मनुष्य हा जीवनाचा द्रष्टा आहे याचा अर्थ मात्र स्पष्ट केला पाहिजे. जीवन–दर्शन हें पूर्ण होण्यासाठीं मनुष्यानें आपल्या सर्व शक्तींचा योग्य विनियोग केला पाहिजे. दर्शन हें केवळ बौद्धिक नाही. तो अत्यंत महत्त्वाचा एक अनुभव आहे. हा अनुभव जीवनासारखाच चैतन्यमय आणि प्रवाही असला पाहिजे. मानवी जीवनाची मोठी शक्ति या दर्शनांत–जीवनकल्पनेंत आहे. या कल्पना जितक्या सत्य होत जातील तितक्या त्या यशस्वी होत जातील यांत शंका नाही. परंतु कल्पनांचें सत्यत्व पारखण्याची सोय जर जीवनांत ठेविली नाही, तर कल्पना ही केवळ भ्रमात्मक होत जाण्याचा संभव आहे. जीवनकल्पना ही कांही अंशी सत्य आणि भ्रम यांच्या मिश्रणानें झालेली असते. अग्नि धुमसत असला म्हणजे तो धूममिश्रित राहतो. तो जितका प्रखर होत जाईल तितका रंगरहित, धूमरहित होत जातो. जीवनकल्पनेचें असेंच आहे. जीवनाची कल्पना जीवनांतच पारखून घेतली पाहिजे. जीवनाच्या प्रत्यक्ष भूमीवर या कल्पना जितक्या मूर्तिमंत होऊं शकतील तितकें त्यांचें सत्यत्व सिद्ध होत जातें. यासाठीं जीवनाचें द्रष्टेपण केवळ बौद्धिक अथवा भावनात्मक कल्पनांत–सिद्धान्तांत नाहीं. तें परिमाणत्रयात्मक प्रत्यक्ष विश्वांतील कर्तृत्वांत सिद्ध झालें पाहिजे. जीवनांत

यशस्वी होणारी कल्पना शोधून काढणें आणि जीवन सर्वथैव यशस्वी करून दाखविणें हेंच द्रष्टेपण होय. मनुष्यप्राण्याचा जीवनातील मोठा अधिकार या द्रष्टेपणानेंच सिद्ध होत आला आहे.

जीवनसाफल्याच्या शोधांत असणाऱ्या साधकाला या दोन महत्त्वाच्या सिद्धान्तांचा स्वीकार अवश्य केला पाहिजे. जीवनाच्या आरंभी आपल्या हृदयाशी असलेल्या सर्व कल्पना घेऊन त्यानें या ध्येययात्रेवर निघाले पाहिजे. श्रद्धा ही जीवनातील एक मोठी वृत्ती आहे. जीवन सफल झालें पाहिजे, जीवन निरर्थक असणार नाही, अशी श्रद्धा वाढत जाणें हेंच जीवनांतील यश आहे. अनुभवांती कल्पनांतील असत्य अंश जळून गेला तरी जीवनाच्या मागल्यावरील, जीवनाच्या अर्थपूर्णतेवरील श्रद्धा वाढत गेली पाहिजे. जीवनाच्या यात्रेनंतर जर आपली ही श्रद्धा डळमळूं लागली तर आपला प्रयत्न चुकला असें समजण्यास हरकत नाहीं. आपल्या जीवनांतील कोणत्याहि वृत्तीशी प्रतारणा न करता अत्यंत सत्यनिष्ठेनें आणि स्वार्थत्यागपूर्वक जर प्रयत्न करीत राहिलें, तर जीवनाच्या अंती ही श्रद्धा अधिक दृढमूल झाल्याचे आढळून येईल. खऱ्या कल्पनेमध्यें कर्तृत्वाला जन्म देण्याचें मोठे सामर्थ्य असतें. कल्पनेंतील अपूर्णता कर्तृत्वानेंच निघून जाते. यासाठी आपल्या सर्व कल्पनांचा संपूर्ण स्वीकार करून कर्तृत्वाच्या कसोटीवर त्या सारख्या घासून पाहणें हा जीवनाचा मुख्य साधन-मार्ग आहे. मानवी अंतःकरणांतील सर्व प्रवृत्तीचा स्वीकार करण्याचे धैर्य असलें तर आरंभी वृत्तींचा विरोध दिसून येईल; आणि त्यांच्या परिहाराचा मार्ग केवळ कल्पनेने मिळणार नाहीं, हेंहि आढळून येईल. परंतु आपल्या सर्व वृत्तींचा जास्तींत जास्त समन्वय ज्यांत घडेल त्यांचे आग्रहपूर्वक आचरण करण्याचें ठरविलें, तर ज्या कल्पना प्रत्यक्षविरोधी आणि सत्यरहित असतील त्यांचा आपोआपच विलय झालेला आढळेल. त्यामुळें आपली जीवनश्रद्धा वाढून अधिक योग्य समन्वय उचलण्याची लायकी आपणात येईल. परिस्थिति ही जड नसून अनेक भूतकालीन घटनांचें कल्पनासामर्थ्य आणि कर्तृत्व तिच्यांत सामावलेलें असतें. आपल्या कल्पनासामर्थ्यानें आणि कर्तृत्वानें आपण तिला धक्का दिल्यानें तिच्यांत अनेक बनाव उत्पन्न होण्याची लायकी दिसुं लागते. आपली कल्पना जितकी शुद्ध आणि

तीव्र होत जाईल तितक्या अंशानें आपलें कर्तृत्व प्रभावी होतें व त्यामुळें परिस्थितींत बदल घडत जातो. मानवी मनःशक्ति आणि नैसर्गिक परिस्थिति यांच्या या परस्परसंघर्षामध्यें जीवनांतील ध्येयकल्पना मूर्तस्वरूप धारण करूं लागतात; व जीवनाच्या दर्शनाचा प्रत्यक्ष लाभ होत गेल्यानें जीवनसाफल्याची प्रतीति होत जाते. अध्यात्मवादी संत, ध्येयवादी समाजसुधारक आणि प्रतिभावान् कलोपासक या सर्वांच्या आयुष्यांत जीवनसाफल्याच्या अनुभूतीचा दाखला सांपडतो. कल्पनाहीन कर्मठाला, कर्महीन कल्पनावाद्याला, जीवनहीन कलावंताला जीवनाचें वैफल्य भासत असतें; आणि आपल्या आयुष्याचा भेसुरपणा प्रामाणिकपणें उघड करण्यास धजत नसल्यामुळें तो खोट्या कल्पनांची अफू खाऊन आपल्या जीवनवैफल्याचे तीव्र दुःख क्षणभर विसरतो. प्रत्यक्ष जीवनांत अपेशी झाल्याकारणाने जीवनाच्या ध्येयावरील त्याची श्रद्धाच नाहींशी झालेली असते. यामुळे जीवनाच्या प्रत्यक्ष प्रश्नांना डावलून तो केवळ कल्पनेच्या अथवा बाह्य कसरतीच्या आहारी जातो. जीवनवैफल्याचा अनुभव आल्यानंतर मर्दपणानें जीवनाचा त्याग करण्याचें सामर्थ्य त्याला असत नाही; आणि प्रत्यक्ष कर्तृत्वाच्या भूमीवर आपल्या कल्पनाचे मनोरे उभारण्याची त्याला शक्ति नसल्यानें तो केवळ अंतराळातच आपले स्वर्ग वसवूं लागतो. पण ही वंचना आहे. पुरुषार्थी साधकानें या वंचनेपासून सावध राहिले पाहिजे.

मानवी मोठेपणा द्रष्टेपणांत आहे हें जर खरें असेल, तर आपल्या मानसिक सृष्टींत उत्पन्न होऊन धुडगूस करणाऱ्या अनेक भ्रामक वृत्तींना आपण प्रखर बुद्धिकिरणांखाली भाजून काढलें पाहिजे. कर्तृत्वांतून उत्पन्न झालेल्या कल्पनेनें ज्याप्रमाणें मानवी जीवन सबल होतें, त्याचप्रमाणें कर्तृत्वशून्य कल्पनेनें मानवी जीवन विफल होते, हेंहि ध्यानांत धरिलें पाहिजे. सत्यनिष्ठा प्रखर असेल तर असल्या भ्रामक कल्पनांचा निरास झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु मनुष्याचा स्वभावच कल्पना निर्माण करण्याचा असल्यामुळे खऱ्या कल्पनांप्रमाणें खोटया कल्पनाहि त्याच्या मनांत उत्पन्न होत राहतात. खऱ्याखोटयाचा निर्णय करण्याचें मुख्य साधन जें प्रत्यक्ष आचरण तें एकदां वैफल्यवादानें शिथिल झालें म्हणजे

कल्पनांचा काल होतो; आणि मनुष्याचा श्रेयोमार्ग पूर्णपणें रुद्ध होऊन तो आपल्याच असत्य कल्पनांत मरून जातो.

इतिहास आपणांला अशी साक्ष देत आहे कीं जीवनाच्या प्रत्यक्ष क्षेत्रांत श्रद्धेनें प्रयोग करणाऱ्या अनेक साधकांना साफल्य मिळालेलें आहे. शुद्ध बुद्धीनें सुचविलेल्या जीवनध्येयाचा पाठलाग करणाऱ्या पुरुषाला अश्रद्धेची बाधा कधी झाली नाही. अशा प्रयत्नांच्या मालिकांनीं जीवनाचा इतिहास नटलेला आहे. याच्या उलट, सत्य पाहण्याचें सामर्थ्य कमी झाल्यामुळें जीवनाचा त्याग करून, कल्पनेच्या आहारी गेल्यानें जड बनून गेलेल्या संप्रदायांनी जीवनाचा ग्रंथ जागोजाग डागळलेलाहि आहे.

जीवनाचा असा एक सिद्धान्त समजण्यास हरकत नाही की, अत्यंत सत्यनिष्ठेनें आपण आपल्या अंतरींची स्फुरणें जर तपस्यापूर्वक श्रवण केलीं आणि श्रद्धेनें त्यांच्या सिद्धतेसाठी आपण साधना करूं लागलों, तर या साधनेंतच आपल्या स्फुरणांची अशुद्ध रूपें नाहीशी होऊन त्याचें शुद्ध स्वरूप प्रकट होऊं लागतें. अंतरीची हाक न लाजतां, न भितां ऐकणाऱ्या हृदयदेवाच्या पूजनांत आपलें सर्वस्व अर्पणाऱ्या भक्ताला जीवनानें दगा दिल्याचा दाखला अद्यापि उपलब्ध नाही. जीवनाशी जर आपण प्रतारणा करणार नाहीं तर जीवन आपणाशी कधीच प्रतारणा करणार नाहीं. केवळ बुद्धीनें, केवळ भावनेनें अथवा केवळ शरीरानें नव्हे, तर कायावाचामनेंकरून जर आपण जीवनाचा शोध चालविला तर तो सफल होईलच होईल.

जीवनांत जी सत्याची, सौंदर्याचीं, साधुत्वाची मंगल दर्शने प्रतिभेच्या दृष्टीपुढे चमकतात, त्यांच्या सिद्धीची साधना मनुष्यानें अविरत चालविली पाहिजे. प्रतिभेच्या दृष्टीला दिसणारी ही मांगल्याचीं स्वप्ने प्रत्यक्ष सृष्टींत मूर्तिमंत करण्याची मनाला उमेद वाटावी, बुद्धीनें त्यांच्या साधनांची सिद्धता करावी आणि शरीरानें त्याच्या निर्मितीसाठीं झिजावें असा जर जीवनयोग अखंड चालेल, तर वैफल्याचा विषारी वायु जीवनाला कधींच बाधणार नाहीं. धर्म, अध्यात्म, कला, यांचीं ध्येयें मानवी जीवनाची सफलता कशांत आहे हें सुचवीत आहेत. तथापि जीवनाच्या जिवंत स्पर्शाला पारखीं झालीं असतां हींच ध्येयें मनाला मूढ बनविण्यास आणि पुरुषार्थापासून पराङ्मुख

करण्यास कारण होतात, हें विसरून चालणार नाही. जिवंत असतां जितकीं तारक, तितकींच जड झाल्यानें तीं जीवनाला मारक होतात. मग मोठा अट्टाहास करून त्यांच्या जोखडांखालून मानवी मनाची मुक्तता करण्याचें कार्य करावें लागतें.

जीवनाच्या उदात्त ध्येयांचा प्रत्यक्ष आविर्भाव करण्यासाठीं मानवांचा चाललेला प्रयत्न मधूनमधून विफल झाल्यासारखा वाटतो आणि वैफल्याच्या जाणिवेनें त्याला ग्रासल्यामुळें अश्रद्ध आणि अनुत्साह होतो. इतकेंच नव्हे, तर आपल्या दौर्बल्याच्या जाणिवेनें लज्जित न होतां जीवनाविषयींची तर्कटी, उपहासी आणि श्रद्धेची वा प्रयत्नवादाची टवाळी करण्यांत भूषण मानणारी वृत्ति प्रतिष्ठितपणा मिळवूं लागते. असत्यापेक्षांहि या टवाळखोर अश्रद्धेने जीवनाचा विकास अधिक रुद्ध होत असल्यामुळें तिचा प्रतिकार अतिशय नेटानें करणें अवश्य आहे.

सृष्टींतच सत्ययुग निर्माण करण्याची हिंमत देणाऱ्या कवीच्या स्वर्गकल्पनेबद्दल समाज त्याचा नेहमी ऋणी राहील. परंतु सत्ययुगाच्या निर्मितीचे प्रयत्न सोडून केवळ काल्पनिक स्वर्गातील सुखोपभोगांविषयीं लोलुपतेनें लाळ घोटणारा जीव हा उपहासास्पद मानिला पाहिजे. चातुर्वर्ण्य, आश्रमव्यवस्था इत्यादि साधनांचा जीवनाच्या प्रत्यक्ष क्षेत्रात जेव्हां विचार व आचार चालू होता, अर्थ–कामांची प्रत्यक्ष योजना करीत असतां ज्या धर्म–मोक्षांच्या कल्पना वापरल्या जात होत्या त्यांनी जीवनाला समृद्ध केलें, सुसंस्कृत केलें, यांत शंका नाहीं. परतु प्रत्यक्ष स्थितीशीं स्पर्श न ठेवितां केवळ शब्दविलास चालू झाल्यानें त्या सर्व ध्येयकल्पनांतील सत्यत्व नाहींसें झालें; आणि पृथ्वीचा आधार सुटल्यानें स्वर्गाची प्रतिष्ठाच नष्ट झाली. स्वर्गाचें स्वप्न प्रत्यक्ष जीवनांत पाहावयास मिळालें पाहिजे. निराश जीवनाच्या भकास हृदयांत पसरलेली स्वर्गाची कल्पना म्हणजे एक भेसूर थट्टा आहे. परमेश्वराचें आस्तित्व जर पृथ्वीवर प्रकट होऊं शकले नाहीं, त्याची दया वा त्याचें प्रेम हें जर जीवनांतील नैर्घृण्य आणि वैषम्य दूर करण्यास समर्थ झालें नाहीं तर अशा केवल परमेश्वराचा, पृथ्वीशी संसर्ग टाळणाऱ्या परमेश्वराचा, जीवनाला काय उपयोग ? जीवनाच्या बाजारांत जी वटवितां येणार नाहीं अशी श्रद्धेची नऊ लाखांची

हुंडी झाली तरी ती कवडीकिंमतीचीच नव्हे काय ? आज असा अनुभव येत आहे कीं, जीवनाचे प्रश्न सोडविण्याची धमक जर धर्मांत नसेल तर जीवन अशा धर्माची प्रतिष्ठा चालविण्यास तयार नाही. केवळ कल्पना-विलासांत आपल्या दुःखांचे परिमार्जन करा असाच धर्माचा अर्थ असेल, तर धर्म हें एक भोळ्या लोकांना भक्षण करण्याकरितां भामट्यांनीं उभारलेलें मोठें थोतांड आहे. धर्मानें जीवनाचे दुःख दूर करण्यास आपल्या मानीव श्रेष्ठपणांतून खालीं उतरलें पाहिजे; नाहीं तर जीवनाला आपला स्वतःचा धर्म निर्माण करावा लागेल. ध्येयवादी लोकांनी आपलीं ध्येयें जीवनांत यशस्वी करून तरी दाखविली पाहिजेत, नाही तर आपल्या पोकळ पांडित्यानें विटलेल्या जीवनापुढें माघार घेतली पाहिजे. धर्माने कर्माला वळण तरी लाविले पाहिजे, नाही तर आपण स्वतःच जीवनांतून निघून गेलें पाहिजे.

आजपर्यंत जीवनध्येयें जीवनांत सिद्ध करण्याचे अनेक प्रयत्न झाले. जीवन आहे तोंपर्यंत प्रयत्न चालविलाच पाहिजे. पण या जीवनानंदाला पारखे झालेले प्रयत्नाला कंटाळून केवळ ध्येयांत रमण्याचेच तत्त्वज्ञान सांगूं लागले आहेत ! संसार मिथ्या आहे, प्रयत्न विफल आहे, कर्म हे केवळ दुःखमूल आहे, अशा वृत्तीने आपल्याच कल्पनाब्रह्मात रममाण होण्यांत कृतार्थता मानणारे प्रामाणिक नाहींत आणि पुरुषार्थीहि नाहीत. मिथ्यावाद ज्यांला पटला त्याच्या आयुष्यांतील उत्साह नष्ट होतो खरा, परंतु जीवनाशा नष्ट न झाल्यामुळें तो आपल्या जीवनाचा धर्म सोडून केवळ अधर्मानें पिंडपोषण करितो. देहाची आसक्ति न सुटल्यामुळें त्याचें देहकार्यें होतच राहतात; तथापि देहविषयक जबाबदाऱ्या न मानण्याचे तत्त्वज्ञान त्यानें बनविले असल्यामुळे त्याचीं जीवनविषयक कर्तव्ये मात्र नष्ट होतात. कल्पना–ब्रह्माच्या नादीं लागून सामाजिक सत्कर्माचा त्याग करणारे हे दांभिक वेदान्ती आपल्या पोटासाठी वाटेल त्या अधर्मकर्माचा अंगीकार करूं शकतात; व आपल्या कर्मांची नैतिक जबाबदारी घेण्याची त्यांना गरज वाटत नाही. आपल्या बऱ्यावाईट कर्माचा आपल्या कल्पना-ब्रह्माला लेप लागत नाहीं, त्यामुळें आपल्या मोक्षस्थितीला बाध येत नाहीं, असें मानून जीवनकर्माबद्दल ते निःशंक होतात. या भ्रम ब्रह्मवादी

दान्त्यांना मोक्ष मिळतो कीं नाही याचें आपणापाशीं गमक नसलें, तरी लोक जीवनांतील सुखें अपेक्षूनहि जीवनाचें देणें देत नसल्यामुळें जीवनाशीं ामाणिक राहत नाहींत एवढें निश्चित म्हणतां येईल. प्रमाणिकपणा न ाळणारा कोणताहि मनुष्य पुरुषार्थी म्हणविण्याला लायक नाहीं. शंकराचार्यांचा अद्वैतसिद्धान्त हा जीवनांत अनुभविण्यासाठीं होता. प्रदीर्घ ाधनेनें कर्मातच मुक्ति मिळविण्याचा त्यांचा दिव्य संदेश कालान्तरानें लोपून त्यांच्या उज्ज्वल संन्यासधर्माचें हसें झालें. ज्ञानेशादि संतांचा भागवतधर्माचा प्रेमसंदेश जगाला आनंदाचें आवार बनविण्याच्या महनीय आकांक्षेने प्रवृत्त झाला; पण त्याच्या अनुयायांत जीवनाचे प्रश्न वीरवृत्तीनें सोडविण्याची धमक न येतां टाळकुटेपणानें त्या प्रश्नांपासून, पळण्याची वृत्ति शिल्लक राहिली. रामकथा ब्रह्मांड भेदून पैलाड नेण्याच्या आशावादानें प्रवृत्त झालेल्या समर्थांच्या अनुयायांनीं झोळी घालून पोट भरण्याचा लाजिरवाणा संप्रदाय निर्माण केला. हीं आपल्या नजीकचीं दृश्यें, आपल्याच इतिहासांतील हीं चित्रें पाहिली म्हणजे जीवनाचा स्पर्श सुटलेल्या कल्पनेची कशी राख होऊन जाते तें दिसून येईल.

हा धार्मिक ध्येयवाद जीवनाचे प्रश्न सोडविण्यास असमर्थ झाला असें पाहून एकोणिसाव्या शतकांत सामाजिक आणि राजकीय ध्येयवाद निर्माण झाला.पाश्चात्याच्या ध्येयवादांतील कल्पनेनें मोहित होऊन कांहींशा स्वतंत्रपणें, तर कांहीं अंशीं आपल्या परंपरेशीं जुळेल अशा रीतीनें, कित्येक सुधारक आणि देशभक्त यांनीं आपल्या समाजांत नवीन ध्येयें पेरिलीं. समता आणि स्वातंत्र्य, बुद्धिवाद आणि कर्मयोग यांच्या जोपासनेसाठीं नव्या उत्साहानें आणि श्रद्धेनें समाजातील पुरुषार्थी लोक साधना करूं लागले. मोठी आशा वाटली कीं, हा सामाजिक व राजकीय ध्येयवाद तरी यशस्वी होईल. पण आज पन्नास वर्षांच्या प्रयत्नानंतर असें आढळून येत आहे की, महाराष्ट्रांत या सामाजिक ध्येयवादांतील लोकहि नामस्मरणी टाळकुटे आणि संन्यासी यांच्याच मालिकेंत येऊन बसत आहेत; आणि भारतीय स्वातंत्र्याच्या ध्येयवादानें प्रेरित झालेल्या कित्येक पुरुषांची यात्रा संशयवादाच्या कर्दमभूमींत खचत चालली आहे. केवळ [illegible] जपानें ध्येयवाद सिद्ध होत नाहीं. जीवनाच्या क्षेत्रांत तो [illegible] प्रमाणिक

प्रयत्न चालला पाहिजे. हा प्रयत्न क्लेशाचा असल्यामुळे ध्येयसिद्धीपर्यंत दम धरण्याची पात्रता ज्यांच्यांत नाही त्यांनीं प्रामाणिकपणें आपले दौर्बल्य जाहीर करावें, म्हणजे जीवनाचा प्रवाह निष्कारण अडविला जाणार नाही. ज्यांना स्वातंत्र्य अव्यवहार्य वाटते, त्यांनीं तसें उघड सांगावे; परंतु आपल्या हृदयांतील ज्योत मालविल्यानंतरहि त्यांनी समाजाला खोट्या मार्गावर नेण्याचे अप्रामाणिक प्रयत्न करूं नयेत. शिक्षण,समता,बुध्दिवाद हे प्रयत्न अशा सीमेवर आले आहेत कीं, सामाजिक जीवनाचा आमूलाग्र विचार करून अत्यंत स्वार्थत्यागानें मूलग्राही फरक करावे लागतील. राजकीय स्वातंत्र्याशिवाय भारतीय जीवन अर्थपूर्ण, उद्योगमग्न, उत्साह-युक्त होणार नाहीं. स्वातंत्र्य हाच धर्म, स्वातंत्र्य हाच उद्योग आणि स्वातंत्र्य हेंच सुख, असे सांगणाऱ्यांनी स्वातंत्र्यापूर्वी धर्माची कास धरा, स्वातंत्र्यासाठीं श्रीमंत होण्याचा उद्योग करा, स्वातंत्र्यासाठीं आपलें भारतीयत्व सोडून जातीयत्व स्वीकारा, राष्ट्राभिमान टाकून प्रांताभिमान बाळगा असल्या प्रगतिविरोधी खुळचट कल्पनांचा पुरस्कार करण्यानें या ध्येयवादी संप्रदायाचा नाश होत आहे. स्वातंत्र्य-ध्येय सत्य असून त्याचा पुरस्कार जर होत नसेल तर आपलें नैराश्य उघड कबूल करणें चांगलें. आपल्या अंगांतील पराक्रमाची रग कमी झाल्यानंतर जीवनांतील प्रयोगा-ला आपल्या जीर्णत्वाने अडवून ठेवण्याचे पातक तरी माणसानें करूं नये. आपल्या हृदयांतील सत्यदेवाला स्मरून आपण आपला पराभव कबूल करावा. जर ध्येयें बरोबर असतील तर नवीन सामर्थ्यवान् प्रयोग-कर्ते पुढें येतील. निदान आपली जीवनावरील श्रद्धा तरी मलिन होऊं देतां कामा नये. पराभवापेक्षां वंचना वाईट आहे. आत्मवंचना ही मनुष्यबुद्धीला इतकी सहज आहे की, तीव्र सत्यनिष्ठ पुरुषच ती टाळूं शकेल. महाराष्ट्रांतील धर्मध्येयवाद तर बहुतेक मृतच झाला आहे; परंतु हा समाजध्येयवादहि वंचनेच्या भोंवऱ्यांत सांपडून विनाशाच्या मार्गाकडे चालला आहे.

जीवनसाफल्याच्या मार्गावर क्लेशांचे डोंगर पाहून हताश होत चाललेलें महाराष्ट्रीय सुशिक्षितांचें दुबळें मन कलेच्या विलासांत जीवनवैफल्य विसरण्याचा प्रयत्न करीत आहे. जीवनाचे प्रश्न

सोडविण्याची बुद्धीची तयारी नाहीं आणि हें सरळपणानें कबूल करण्याचें मनोधैर्य नाहीं अशा मंडळींनीं काल्पनिक सृष्टीच्या निर्मितींत आनंद मानावा, हे विषादकारक आहे. यामुळें कलेची झपाट्यानें अवनति होत आहे. जीवनाच्या गूढ आकांक्षांचें दर्शन करून देण्यासाठीं कलेचा जन्म आहे. कलेनें जीवन कृतार्थ झालें पाहिजे. परंतु जीवनाचा स्पर्श सुटल्यामुळें कलेमध्ये ताजेपणा दिसेनासा झाला असून केवळ कृत्रिम तंत्राचा विलास माजत आहे. जीवनाचीं दुःखें विसरण्याची प्रतिष्ठितपणाला शोभणारी एक वारुणी, असें कलेचें स्वरूप झाल्यामुळें महाराष्ट्रातील हताश हृदयें तिचा आश्रय करून अधिकच हताश होत आहेत! धर्माचा स्वर्ग, समाजवादाचे स्वातंत्र्य आणि कलेचा आनंद हीं काल्पनिक असतां कामा नयेत. तीं प्रत्यक्षांत अनुभविण्यास मिळालीं पाहिजेत. जीवनातूनच जेव्हां या गोष्टी उत्पन्न होतील तेव्हां या सर्वांचें स्वरूप निराळे होईल. कलाकार जर पैशासाठीं कलेचा व्यभिचार करणार नाहीं, आपल्या हृदयाची तळमळ, आपल्या आत्म्याची आर्तता कलेंतून प्रकट करण्याइतका तो सत्यनिष्ठ बनेल, तर आजच्या आपल्या वाङ्मयाचें स्वरूप एकदम बदलून जाईल. जीवनाच्या दुःखांना वाङ्मयांत वाचा फुटेल, जीवनाच्या आशांना वाङ्मयांत वाव मिळेल, आणि सत्यनिष्ठेनें वर्णिलेली स्थिति जीवनाचा भेद करून प्रयत्नाला उन्मुख केल्याखेरीज राहणार नाहीं. आज कलावंत कलेशीं निष्ठा बाळगीत नाहीत. यामुळें कलेचें–शारदेचें दिव्य स्वरूप नष्ट होऊन ती विलासी लोकांची केवळ नर्तकी बनली आहे. कला ही देवता आहे, याची स्मृति कलाकाराना न राहिल्यामुळेंच तिने केव्हांच या फसवेगिरींतून आपले अंग काढून घेतलें आहे. तिच्या भ्रमात्मक मोहिनीवरच रसिक (?) डोलत आहेत. जीवनाशीं सत्यनिष्ठ राहणारे तपस्वी कलावंत उत्पन्न होईपर्यंत तिचें खरें स्वरूप पुनः प्रकट होणार नाहीं.

जीवनाच्या अशा भेसूर परिस्थितींत सांपडलेल्या आमच्या तरुण यात्रिकाचें चित्त भांबावून गेलें आहे. धर्म आळशी झालेला, कला विलासी बनलेली आणि सामाजिक ध्येयवादी केवळ वंचक व मार्ग रोधून बसलेले, अशी ही स्थिति पाहून तरुणाचा विवेक सुटत चालला आहे; आणि तो दिङ्मूढ होऊन क्रांतीची–सर्वांगीण क्रांतीची–त्वेषानें आरोळी ठोकून

आपल्या जीवाचें वैफल्य जाहीर करीत आहे! धर्मकल्पना, नीतिकल्पना, समाजकल्पना यांनीं केवळ जखडून गेल्यामुळे या अनेक शास्त्रीय बंधनांची त्याला चीड येत आहे; आणि आपल्या जीवनाला अडविणाऱ्या या सगळ्या परिस्थितीपुढें तो आपल्या सर्व कोमल भावनाना बळी देऊन समाजाचा पायाच उखडून टाकण्याच्या उद्योगास लागला आहे! 'कम्यूनिझम्' 'टॅरॉरिझम्' 'नवनीतिवाद' ही त्याचीं आजचीं स्वरूपें असून जीवनाशी असत्यनिष्ठ ठरलेल्या सर्व पूर्वजांच्या विरुद्ध त्याचा हा आक्रोश आहे.

याने तरी आपणांला जीवनांतील प्रयोग महत्त्वाचे आहेत याची स्मृति होऊं शकेल काय? यानें तरी आपल्या शाब्दिक व काल्पनिक स्वर्गातून खाली पार्थिव भूमीवर उभे राहण्याची आमच्या धर्माला इच्छा होईल काय? जीवनाचे प्रश्न ज्या ध्येयवादानें सुटत नाहीत तो ध्येयवाद एरव्ही कितीहि चांगला भासला तरी जीवनात त्याला तडाखा बसल्याशिवाय राहील काय? कर्मठपणाच्या पोटीं पाखंडाचा जन्म होतो, याची जाणीव बाळगून शब्द-शूर ध्येयवादी आपलें अंग झाडून स्वार्थत्यागाला सिद्ध होतील काय? कोणी सिद्ध होवो वा न होवो, निदान जीवनावर श्रद्धा बाळगणारा सत्याग्रही तरी स्वतःपुरती जीवनाची हांक ऐकिल्याशिवाय राहणार नाही. त्याच्या-पुरतें तरी जीवन सफल होईल!

---

# उद्यांची संस्कृति

भूतकालाच्या चिंतनाबरोबर भविष्याची कल्पना करावयाची आणि दोघांच्या अनुरोधानें आजचें वर्तन ठरवावयाचें हें माणसाचें वैशिष्ट्य आहे. या दृष्टीनें नजिकच्या भविष्यांत आपल्या संस्कृतीला कोणतें स्वरूप येण्याजोगें आहे याचा अदाज बांधून आजच्या हालचाली नियमित करा-वयास हव्यात. आज आपल्या समाजांत अनेक प्रकारचे आर्थिक, सामाजिक, राजकीय, वैचारिक विरोध उत्पन्न झाले आहेत. या विरोधाच्या सम-न्वयांतच उद्यांची संस्कृति सिद्ध होणार आहे. हा समन्वय केवळ तार्किक

असून चालणार नाहीं. तर जीवनाच्या सर्व अंगांचा त्यांत योग्य मिलाफ झाला पाहिजे. शेतकीचा शोध लागून मानवकुलें रानटी अवस्थेंतील भटके-पणां सोडून स्थिर झाल्याला ८-१० हजार वर्षे लोटली. या अवधींत बाह्य विश्वाच्या घडामोडीचें ज्ञान फारच स्थूल असल्यामुळे सर्व चितकांचा भर आंतर सृष्टीवरच होता. यामुळें धर्म अथवा अध्यात्म या एका शब्दांतच या कालाचें कर्तृत्व सांगतां येईल. याच्या उलट आधुनिक काली विज्ञानाच्या प्रगतीबरोबर सृष्टीच्या घडामोडीचें ज्ञान वाढत चाललें असून मनुष्याला आपल्या जीवनांतील अनेक अतृप्त आकांक्षा तृप्त करण्याची मोठी संधि उत्पन्न झाली आहे. अध्यात्म आणि विज्ञान यांचा परस्परविरोध दिसत असला तरी नजिकच्या भविष्यांत या दोघांचा यथायोग्य समन्वयच होणार आहे. या समन्वयासाठी आपण उत्साहानें, जागिवेनें उद्युक्त होणें हें आजचे कर्तव्य आहे.

**तत्वज्ञानाचें सांगणें**

मनुष्याला शरीर, मन, बुद्धि, आत्मा अशाप्रकारे एकाहून एक उच्च अवस्थाकडे जाण्याची सोय असल्यामुळें कोणतीहि संस्कृति केवळ सुखा-त्मक अथवा जडस्वरूप झाल्यानें मनुष्याचें पूर्ण समाधान होणार नाहीं. तथापि शरीर व मन यांचें समाधान करीत गेल्यानें बुद्धीची वाढ होते. आणि बुद्धीच्या वाढीबरोबर केवळ बुद्धिवादाचा अपुरेपणाहि प्रतीत होऊं लागतो. मानवी जीवनांत सत्य, न्याय, प्रेम, ज्ञान, विश्वाशी एकरूप होण्याची वृत्ति या गोष्टी आत्यंतिक स्वरूपांत केवळ प्रेरणास्वरूपानेंच स्फुरत असल्याचा अनुभव आहे. यामुळें विश्वाचें अंतिम स्वरूप अथवा मानवाचें आत्मरूप हें सत्यमय, प्रेममय, ज्ञानमय आहे; द्वैताचा आणि दुःखाचा त्यांत अभाव आहे; दिक्कालांच्या विकृतीपासून तें तत्त्वतः अलिप्त आहे असें तत्वज्ञानाचें सांगणें असून मानवी उच्च अनुभूतीचा त्याला पूर्णपणे पाठिंबा आहे. अध्यात्माचा हा संदेश इतका भव्य आहे कीं यापुढें बाकी सर्व भौतिक सुखें फोल आहेत असें वाटतें. तथापि आजपर्यंतचा इतिहास पाहिला तर असेंच दिसतें कीं, क्वचित एखाद्या योग्याला अथवा सत्पुरुषाला या अनुभूतीमुळें मुक्तीचा आनंद घेतां आलेला दिसला तरी सामान्य जनांना त्याचा लाभ झालेला नाहीं, अथवा

सर्वसामान्य लोकांना भौतिक सुखांचीच अधिक लालसा वाटलेली आहे. अध्यात्माच्या या उच्च संदेशाचा स्वीकार करण्याची पात्रता नसल्यामुळें लोकांनीं तो संदेश विकृत बनविला. शरीराची सुखें, मनाच्या भावना आणि बुद्धीची पांडित्याची हौस यांनीं अध्यात्म्याचा संदेश भ्रष्ट व नष्ट झाला आहे.

## जुन्या समाजाचें स्वरूप

अध्यात्माच्या या अनुभवासाठीं प्रखर वैराग्य आणि दीर्घ तपस्या यांचे मार्ग सामान्यांना कधीच पेलले नाहीत आणि त्यांनीं आपल्या विकारांना व्यवहाराच्या नांवाखालीं खुशाल वाव दिला. यामुळें तोंडानें उच्च भाषा व हातानें विपरीत कृति असा जीवनांत दंभ माजला आहे. सुखाची इच्छा तर सुटत नाही आणि सुखे मिळण्याची साधने तर मर्यादित. यामुळें आपल्या पूर्वीच्या जीवनांत असत्याची भरपूर भेसळ झालेली आढळते. आपल्या धंद्यामध्यें प्रत्येकाने अप्रामाणिकपणा करावयाचाच हा शिरस्ता फार प्राचीन कालापासून आढळतो. गवळ्यानें दुधांत पाणी घालावयाचें, शिंप्यानें कापड चोरावयाचे, सोनाराने सोनें लुटावयाचें, वाण्यानें वजना-मापांत व दरदामांत ठकवावयाचें, तेल्याने भेसळ करावयाची, मजुरानें चुकारपणा करावयाचा, मुनीमानें डल्ला मारावयाचा, कुलकर्ण्यानें आपलें कसब दाखवावयाचें, पुजाऱ्यानें अडवावयाचें, गयावळाने लुंगवावयाचे, भटजीनें नानाव्रतां-उद्यापनांची सोंगें उभारावयाची, हरदासांनीं कोरडा वेदान्त सांगून मजा मारावयाची व सत्पुरुषांच्या पीठावर चढून भोळया लोकाना बुवांनी व गुरूंनीं नादीं लावीत राहावयाचें हें आमच्या पूर्वीच्या समाजस्थितीचें महत्त्वाचे अंग होतें. राजांनी सैन्य उभारावयाचे, दिग्विजया-च्या अहंकारानें प्रजांची लुटालूट करावयाची, संपत्तीच्या उपभोगात गर्क व्हावयाचें, 'मृगया-द्यूतं-स्त्रियः पानं' या व्यसनांत रममाण असावया-चें ही सार्वत्रिक प्रथा होती. या सर्व परिस्थितीचा परिहार करण्यासाठीं त्यावेळीं फक्त उदाहरण, उपदेश यांचे योगानें साधेपणा, संयम, ईश्वर-निष्ठा, शास्त्राबद्दल आदरभाव इत्यादि शिकविण्याचा अखंड प्रयत्न चालत असे. निरनिराळ्या जातींचे आचारधर्म सांगितले जात आणि अत्यंत भगीरथ प्रयत्न करणाऱ्या खऱ्या संतांच्या प्रयत्नामुळें व मनुष्याच्या

हृदयात ज्या उच्च, स्थिर प्रेरणा आहेत त्यांच्या योगानें वरील असत्याचा थोडाफार उपशम होत असे. तथापि धर्माची ध्येयें संपूर्णतेनें आचरलीं जात होतीं असा खोटा समज करून घेण्यांत अर्थ नाहीं. तथापि ज्यावेळीं भौतिक परिस्थितींत बदल करणें अशक्य होतें, त्यावेळी केवळ मानसिक स्थितीतच बदल घडवून आणणें हा एकच मार्ग मोकळा होता व त्या मार्गाचा अवलंब केल्याबद्दल पूर्वसंस्कृतीच्या पुण्यपुरुषांना दोष लावणें गैर आहे.

## विज्ञानाचें नवें जग

विज्ञानाच्या प्राप्तीनें आज ही सगळीं परिस्थिति बदलून गेली आहे. आजपर्यंत अज्ञात असलेलीं अनेक गूढें समजल्याबरोबर सृष्टीवर ताबा मिळूं लागला असून यापुढें मनुष्याला आपल्या जीवनासाठी सृष्टीचा गुलाम होऊन रहाण्याची गरज उरली नाहीं. यामुळें विज्ञानवादी लोकांच्या जीवनात अमर्याद आशावाद व सुखभोगाची आवड उसळत आहे. या विज्ञानाच्या योगानें सर्व मानवजात सुखी करितां येईल असे दिसूं लागल्यामुळें अपरिहार्य म्हणून मान्य केलेली संयमाचीं बंधनें तटातट तुटत आहेत. आणि जुन्या विचारांविरुद्ध बंड उभें झालें आहे. विज्ञानाबरोबर बुद्धीला महत्त्वाचें स्थान मिळाले आहे.सुख हें त्याज्य नाही अशी विचारसरणी होत आहे. विषमता दूर करणें शक्य दिसत असल्यामुळें सर्व क्षेत्रांत श्रेष्ठांना पदच्युत करण्याचा मार्ग चोखाळला जात आहे. ही विचारसरणी इतक्या वेगाने, आवेशानें आणि उन्मादानें येते आहे कीं अध्यात्माचा अधिक्षेप,जडवादाचा पुरस्कार, भौतिक सुखांची समान वांटणी करण्याची हाकाटी हाच तिचा मुख्य संदेश आहे असें सांगण्यांत येत आहे.

## विरोधांत नवसंस्कृतीचा जन्म

उद्यांची संस्कृति या विरोधांतून निर्माण व्हावयाची आहे. अध्यात्मानें दाखवून दिलेलीं ध्येयें विज्ञानाचा योग्य रीतीनें उपयोग केल्यानेंच सिद्ध होतील असा मला विश्वास वाटतो. माणसाला सुखांची इच्छा असली तरी शरीराच्याच सुखानें तो तृप्त होत नाहीं; मानसिक, बौद्धिक सुखांच्या सेवनानेंहि तो शांत होत नाहीं; त्याला आत्म्याच्या उच्च प्रेरणांची पूर्ति घडवून आणण्याची धडपड लागते आणि त्यामुळें तो ज्ञान, सेवा, प्रेम

यांच्या द्वाराच कृतार्थ होतो हा अनुभव असल्यामुळे अध्यात्माची चिंता करण्याचे कारण नाहीं. सत्य, प्रीति, वात्सल्य, कुटुंबभाव, ज्ञानाची तळमळ या गोष्टी इतक्या मूलभूत आहेत कीं जडवादाला त्यांचें उन्मलून करितां येणें अशक्य आहे. उलट शारीरिक सुखांची थोडीफार प्राप्ति झाल्याशिवाय सामान्य माणसाला उच्च-सुखांची कल्पनाच करवत नसल्यामुळे समाजां-तील प्रत्येक घटकाला त्याच्या अधिकाराप्रमाणें आपली नीति ठरविण्याचें स्वातंत्र्य मिळावयास हवें. असें प्रत्येकाला स्वातंत्र्य मिळावयाचें म्हणजे समाजांतील आजची आर्थिक, सामाजिक, राजकीय सर्व क्षेत्रांतील विषमता पूर्णतेनें नष्ट झाली पाहिजे. आजच्या समाजांत जे वर्ग वा ज्या व्यक्ति श्रेष्ठता पावल्या आहेत त्यांनीं कालाचा प्रवाह आणि न्यायाचें महत्त्व ओळखून आपला अहंकार सोडून दिला पाहिजे. असे न करतां केवळ सत्तेच्या जोरावर समतेची चळवळ दडपण्याचा प्रयत्न चालेल तर समाजांत भयंकर उत्पात माजल्याशिवाय राहणार नाहीत मानवी जीवनांत सुखाची इच्छा इतकी तीव्र असते की, संधि सांपडताच तिच्या पूर्ततेसाठीं प्रचंड खळबळ सुरू हाते. या इच्छेला विवेकाने वाट काढून देणें हाच समाज-स्वास्थ्याच्या दृष्टीनें इष्ट आणि न्याय्य मार्ग आहे. पूर्वीच्या समाजांत अपरिहार्य म्हणून ज्या विषमतेच्या रूढि चालू शकल्या त्या या पुढच्या काळांत कदापि टिकणार नाहींत. स्त्री, शूद्र, अंत्यज, इत्यादि दलित वर्गांमध्यें स्वातंत्र्याची भावना जोरानें उसळत आहे. या भावनेंची मुस्कटदाबी करण्यानें समाजाचें हित होणार नाही. या स्वातंत्र्याच्या इच्छे-लाच योग्य वळण लावणें अगत्याचें आहे.

## धनवंतांवरील जबाबदारी

व्यक्तीच्या आयुष्यांत जशी उन्नति होत जाईल, त्या मानानें त्याची बाह्य राहाणी साधेपणाची होत जाते. हृदय पवित्र व प्रेमळ होत जातें. बुद्धि विकाररहित आणि शुद्ध ज्ञानानुसारिणी बनते आणि आत्म्याच्या उच्च प्रेरणा मानण्यांत सर्व इंद्रियांना समाधान मिळतें. सुखामध्यें मानसिक तृप्ति आणि आत्मिक शांति यांचा पूर्ण समावेश होतो. ही अवस्था समाजांतील प्रत्येक व्यक्तीला मिळेल, अशा प्रकारें समाजांतील अर्थ, काम या पुरुषार्थांची व्यवस्था करून देणारा व

समाजांतील सुखभावनांचा विरोध न करतां सर्वांनाच आत्मिक समाधाना-च्या उच्च भूमीवर नेणारा समाजधर्म बनविण्याचा आज काळ आला आहे.

आज समाजांत सुखसाधनें आणि सत्ता यांच्यावर ताबा असलेल्या वर्गांतील लोक आपल्या संकुचितपणानें न्याय्य अशा समतेच्या भावनेचें निर्मूलन करण्यासाठीं प्रचंड हिंसा चालवीत आहेत. या हिंसेचा प्रतिकार करण्यासाठी सर्व विचारवंतांनी अहिंसेचा श्रेष्ठ मंत्र स्वीकारला पाहिजे. नाहीं तर हिंसा-प्रतिहिंसा यांच्या वणव्यांत सर्वमानव कुलाचा संहार होईल.

अहिंसेच्या वृत्तीनें, विज्ञानाच्या साहाय्यानें समतेची आकांक्षा पूर्ण करून समाजाला आध्यात्मिक अनुभवाकडे जाण्याची पात्रता आणून देणें हें उद्यांच्या संस्कृतींत शक्य होईल असें आज आपण करावयास लागूं या.

# ध्येयवादी जीवन

परंपरागत अध्यात्मवादी विचारपद्धतीविरुद्ध हल्ली बुद्धिवादाचें बंड उभारण्यांत येत आहे. तात्त्विक, सामाजिक, राजकीय, वाङ्मयीन इ. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत या द्वंद्वाचा धुमाकूळ चालला आहे. वस्तुतः हा विरोध असण्याचें कारण नाहीं. मनुष्य आपल्या जीवनांत अंतरींच्या प्रेरणे-मुळें विविध ध्येयें निर्मीत असतो आणि सर्व बाह्य सृष्टीचा विनियोग ह्या ध्येयांच्या सफलतेसाठीं करीत असतो. या प्रेरणा बुद्धिनिर्मित म्हणतां येणार नाहीत. त्यांचें स्वरूप—केवळ भौतिक आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. या अंतिम प्रेरणा अतिभौतिक, अतिबौद्धिक असल्यामुळें बुद्धीला त्याचेवर कुरघोडी करतां येत नाही. त्या प्रेरणाचें स्वरूप समजून घेऊन त्यांच्या सिद्धीसाठीं साधनांचीं निर्मिति करणें इतकेंच बुद्धीचें क्षेत्र आहे. या प्रेरणा हेंच मानवी आत्म्याचें स्थान असल्यामुळें त्यांचा त्याग करण्याचें सामर्थ्य मनुष्यांत असणें शक्य नाहीं. खरोखर पाहतां आजचें बुद्धिवादाचें बंड आतां सांगितलेल्या शुद्ध आत्मवादाविरुद्ध नाही. आपल्या परंपरेंत

विचार-दोष, मृत रूढी, भ्रामक कल्पना यांची अडगळ माजल्यानें समाज-जीवन रुग्ण आणि क्षीण होऊन त्याचा विकास थांबला आहे. त्यांच्या-विरुद्ध नवविचारांचें युद्ध चालू झालें आहे. या युद्धामुळें समाजाची हानि न होतां त्याचा मोठा फायदाच होणार आहे.

केवळ तार्किक ध्येयवाद आणि ध्येयवादी जीवन यांत मी महत्त्वाचा भेद मानतों. अर्धसत्याच्या पायावर उभारलेला तर्कवाद कितीही जोराची गर्जना करीत राहिला तरी त्याला जीवनाच्या प्रवाहांत कोलमडून पडावें लागतें. जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील सर्व न्याय्य अकांक्षांचा संग्रह करून निर्माण होणारा ध्येयवाद कधी विफल होत नाहीं. प्रत्यक्ष प्रयोगानें त्यांतील लपून राहिलेले दोष उघडे होतात. यामुळें प्रयोगाच्या प्रगतीबरोबर ध्येय-वादाची निर्दोषता वाढत जाते. यामुळें केवळ तर्कवादाला जीवनांत स्थान नाहीं. त्याची भीतिहि बाळगण्याचें कारण नाहीं.

अध्यात्म, नीति, कला, शास्त्र, आणि भूतसेवा हीं मानव्याचीं महान् ध्येयें आहेत. या ध्येयांची साधना जीवनाचे दृष्टीनेंच चालू राहिली पाहिजे. यांतील कोणतेंहि ध्येय जेवढ्या अंशानें जीवनाचा स्पर्श अस्पृश्य मानील तेवढ्या अंशानें तें एकांगी, असत्य व जड होत जाईल. एका तत्त्ववेत्त्यानें म्हटल्याप्रमाणें ‘ Man is the meeting point of all the aspects of reality ’—मानवामध्यें सद्वस्तूचे सारे अंश एकत्रित झाले आहेत. शरीर, मन, बुद्धि, आत्मा या सर्व अंशांना सामावून घेण्याचें काम ध्येयानें करावयाचें असतें, यालाच ‘ सत्य ’ असें म्हणतात.

सत्याच्या सर्व अंगांची जोपासना करणारा ‘पूर्णयोग’ हाच जीवनाचा खरा ध्येयवाद होय. या पूर्णयोगाच्या आचरणासाठीं समाजांतील सर्व व्यक्तींना लायक बनविणें हा सर्व सामाजिक संस्थांचा उद्देश असला पाहिजे. ही दृष्टि सुटली म्हणजे जड संप्रदाय, खोटीं ध्येयें, दांभिक आचरण इ. सर्व घाणेरड्या गोष्टी पसरतात. या सर्वांचा प्रतिकार कर-ण्यासाठीं ध्येयवादी पुरुषाची समाजाला नेहमीं गरज असते. बदलत्या परिस्थितीमुळें गतार्थ झालेली विचारपद्धति, निरुपयोगी ठरलेल्या सामाजिक संस्था आणि अपुरीं झालेलीं नीतिबंधनें या सर्वांत कालानुरूप योग्य ते बदल घडवून आणण्याचें कार्य या पुरुषांना करावयाचें असतें.

आज समाजांतील उत्पादन पद्धति आमूलाग्र बदलत चालल्यामुळें परंपरागत सर्व सामाजिक संस्था कोसळून पडत आहेत. कित्येक कल्पनांचे कपळे उडत आहेत. समाजांतील व्यक्तींच्या न्याय्य आकांक्षांना वाव मिळेनासा झाला आहे. विषमतेचीं बंधनें असह्य वाटूं लागली आहेत. अशावेळीं या सर्व जीवनाच्या हांकांकडे दुर्लक्ष करून केवळ मूढपणानें जुन्याचीं गाणी गाइल्यानें या मरणाऱ्या गोष्टी वांचणार नाहीत. आपल्या जीवनांतील हीं सारीं मढीं आपण जाळून टाकण्यास सिद्ध झालें पाहिजे. धर्मानें केवळ पारमार्थिक मोक्षाचा जप न करितां ऐहिक साधना सिद्ध करण्यास साह्य दिलें पाहिजे. कलेनें केवळ रसविलासात बुडून न जातां जीवनाच्या प्रश्नांची यथास्थित चर्चा करून समाजमन बोधयुक्त आणि प्रयत्नप्रवण केलें पाहिजे. नीतीनें केवळ आदर्श आचरणाचा उच्चार करीत न बसतां व्यक्तीमध्यें साधुजीवनाची भक्ति उत्पन्न होईल अशी समाजरचना करण्यांत पुढाकार घेतला पाहिजे. शास्त्रानें केवळ भौतिक संशोधनांत न गुरफटतां आपल्या ज्ञानाच्या जोरावर समाजांतील घाणीचा संहार करण्याकडे लक्ष पोहोंचविलें पाहिजे. भूतसेवा ही एक भावनामय वस्तु न बनवितां शास्त्रीय रीतीनें समाजधारणा घडवून आणण्याची तिनें इच्छा बाळगिली पाहिजे. असे होईल तर ध्येयवादाविरुद्ध येणारे सर्व आक्षेप आपोआप बंद होतील.

ध्येयवादाने मनुष्यजीवन केवळ यंत्रमय बनतें असा एक आधुनिक मानसशास्त्रज्ञांचा आक्षेप ऐकूं येतो. कृत्रिम ध्येयवादाविरुद्ध हा आक्षेप अवश्य घेतां येईल. तथापि जीवनाशी समरस झालेल्या अखंड प्रयत्नशील पुरुषानें आपल्या अंतरांतील ध्वनि आपल्या बुद्धिवादानें पारखून घेतल्यानंतर निर्माण होणाऱ्या ध्येयवादाविरुद्ध तो लागूं पडणार नाहीं.

ध्येयवादी पुरुष आपल्या उपदेशानें जीवनांत 'मूल्यें' निर्माण करतात; आणि त्यांना प्रतिष्ठा मिळाल्यामुळें अनेक व्यक्तींच्या आयुष्यांवर जाणत अजाणत त्या मूल्यांच्या बाबतींत जबरदस्ती होते. आणि त्यामुळे त्याचा विकास न होतां त्यांना जडता प्राप्त होते असाही एक महत्वाचा आक्षेप ऐकूं येतो प्रत्येक मनुष्यानें आपली मर्यादा पाहून आपलें जीवनध्येय ठरविलें म्हणजे वरील अडचण येणार नाहीं. या बाबतींत सत्यनिष्ठा

हीच श्रेष्ठ नीतिमत्ता मानली पाहिजे. आपल्याला ज्या ध्येयांची हांक ऐकूं येत नाही, ज्यासाठीं आपणांला तळमळ वाटत नाही, असल्या गोष्टींचा लौकिक प्रतिष्ठेसाठी स्वीकार करणें हे मोठें दंभ आहे. दंभानें जीवनाचा नाश होतो. आपल्या वृत्तीला रुचेल अशा ध्येयाचें स्वल्प आचरणहि आपल्या विकासाला कारण होतें. ही 'सत्यनिष्ठा' आपल्या समाजांत खूप प्रज्वलित केली पाहिजे. याबरोबरच ध्येयवादी पुरुषांनी समाजापुढें ध्येये ठेवीत असतां हेकाड आग्रह चालवू नये. प्रत्येक व्यक्तीला आपापल्या शक्तीप्रमाणे त्या ध्येयांचा स्वीकार करण्यास सांगावे. ही अहिंसावृत्ति सर्व ध्येयवाद्याच्या जीवनात भरून गेली पाहिजे. नाहीतर सामाजिक विकासाला मोठा अंतराय उत्पन्न होईल. शेवटचा आक्षेप व्यवहारवाद्याचा. ध्येयवादाच्या मागें हा ब्रह्मराक्षस सदाचा लागलाच आहे. ध्येयें कोठलीही असोत त्यांच्यामागे जाण्यात अर्थ नाहीं. आपला नित्याचा व्यवहार नीट चालला म्हणजे झालें. अव्यवहार्य ध्येयांच्या नादीं लागून आपला सुखाचा संसार का बिघडवावा? असली पामरवृत्ति पुष्कळच ठिकाणीं आढळते. परंतु आपण ध्येयवादामागे गेलों नाही तरी ध्येयवाद्यांना निंदूं नये ही वृत्ति तरी त्यांच्यात असते. मात्र कांही आक्षेपकांची मजल याच्याहि पुढें जाते. ध्येयवाद सामान्यतः कठीण; त्यासाठी त्याग करावा लागतो. तेव्हा त्याग टाळावयाचा तर ध्येयवादाचीच निंदा करावी अशी ह्यांची वृत्ति असते. असले लोक अत्यंत क्षुद्रबुद्धीचे आणि समाजाचे हितशत्रू मानले पाहिजेत. ध्येयवाद कितीहि कठीण असला तथापि त्याच्या साधनेतच ध्येयार्थी पुरुषांना मोठा उत्साह लाभतो. व्यावहारिक स्वार्थ आणि तात्पुरतें सुख यापेक्षां ध्येयदर्शनाने त्यांना अधिक आनंद होतो. आपल्या अंतःकरणातील श्रद्धेच्या जोरावर ते समाजांतील दोषांची धार बोथट करतात. तात्कालिकापेक्षां चिरकालिक म्हणून कांही आहे अशी प्रतीति समाजाला ते आणून देतात. द्वेषापेक्षा प्रेम, संशयापेक्षां विश्वास, हिंसेपेक्षा अहिंसा यांनीच मानवीजीवन अधिक सुखी आणि संपन्न होईल अशी आपल्या त्यागपूर्ण जीवनाने समाजाला शिकवण देतात. असल्या ध्येयार्थी महात्म्यांच्या तपस्येनेंच विश्वाचें धारण होतें. अव्यवहार्य वाटणाऱ्या अनेक गोष्टी त्यांनींच व्यवहार्य करून

दाखविल्या आहेत. नवीन प्रयत्नाला लागणारा उत्साह व उच्च जीवनाला आवश्यक असणारी श्रद्धा या गोष्टींचा पुरवठा याच तेजस्वी पुरुषांकडून होतो. समाजांतील मांगल्य वाढविण्याचें कार्य हेच करतात. आणि म्हणूनच सामान्यजनता याच्याकडे आशेच्या नजरेने पाहात असते.

---

# जीवन-शुद्धीचा प्रयोग

Blessed are the pure in heart, for they shall see God. —Sermon on the mount.

सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग् ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ।
मुण्डक उपनिषद्

महात्मा गांधी यांना काल ६५ वर्षे पूर्ण झालीं. हिंदुस्थानांतील कोना-कोपऱ्यांतून त्यांच्या जयंतीचा मंगल उत्सव साजरा झाला. महात्मा गांधी हे केवळ हिंदुस्थानच्याच लोकांना पूज्य आणि सेवनीय झाले आहेत असे नव्हे तर जगांतील सर्व देशाच्या लोकांना त्यांचे जीवन दिव्य आणि वंदनीय वाटत आहे. या विश्वविश्रुत महिम्याचें रहस्य काय याचा विचार आपल्या आयुष्याला सहजच उद्बोधक होईल.

## युगपुरुषांचें अखंड जीवन

विश्वजीवनाची महान् यात्रा अखंड चालली आहे. अज्ञात सागराच्या अस्फुट हाकेला ओ देऊन गिरिकपाटांतील निर्झर उसळी घेऊन बाहेर पडतो, त्याचप्रमाणें परोक्षाचीं पूर्णतेचीं स्वप्नें पाहून प्रत्यक्षाचा प्रवाह वेगानें धांवत चालला आहे. या यात्रेची सफलता कशांत आहे याचा शोध घेणारे, प्रवाहाची दिशा चुकत असेल तर ती दुरुस्त करणारे, वेगामध्ये शिथिलता येत असेल तर ती नाहीशी करणारे, पुरुषार्थी वीर विश्वाला नेहमींच वंद्य वाटत आले आहेत. आपल्या दीर्घ तपस्येनें हे जीवनाला

मार्ग काढून देतात. आपल्या स्वार्थत्यागानें हे विश्वाला सुखानें प्रगति करण्याची सोय करून देतात. भोळ्या जनांना वैफल्याच्या वैराण वाळवंटांतून साफल्याच्या सुखधामांत आणून सोडतात. काळाकाळाला उत्पन्न होऊन जीवनांतील अशुद्धता आणि अव्यवस्था दूर करून शुद्ध आणि व्यवस्थित समाजजीवन निर्माण करितात. काळालाहि आपल्या कर्तृत्वानें कलाटणी देण्याचें सामर्थ्य या महाभागांत असतें. हे धर्मस्थापनेचे पुरुष म्हणजे ईश्वराचें देणें होय. युगपुरुषांचें जीवन हें केवळ व्यक्तिगत नसतें. ते विश्वजीवनाशी पूर्ण समरस झालेलें असतें. केवळ व्यक्तींच्या जीविताचा विचार करतांना वापरली जाणारीं वजनें–मापें या युग–पुरुषांच्या जीविताला लावून चालत नाहीं. कारण त्यांचीं ध्येयें हीं जीवनाचीं ध्येयें असतात, त्याचीं साधनें हीं जीवनाचीं आयुधें असतात.

### विश्व–जीवनाशीं सात्म्य

त्याच्या विजयांत विश्वाचा विजय असतोच पण त्यांच्या आभासिक पराभवांतहि विश्वाचा पराभव कधींच होत नाहीं. त्यांच्या सुखानें विश्व सुखी होईल यांत नवल नाहीं; त्यांच्या दुःखानेंहि विश्वाचा सुखाचाच मार्ग मोकळा होतो. युगपुरुषांचें सर्वस्व हें विश्वजीवनांतच अनुस्यूत झालें असल्यानें त्यांच्या सकल जीवनानें विश्व-जीवन शुद्ध, पूत आणि उन्नत होत जातें. युगपुरुषांच्या चुका देखील विश्वाचें कल्याणच करीत असतात. कारण त्यांना स्वतःचें निराळें असें कांहींच साधावयाचें नसतें. विश्वजीवनांतच त्यांचा मोक्ष असतो. यामुळें त्यांच्या शुध्दीबरोबर विश्व शुध्द व्हावें, त्यांच्या उन्नतीबरोबर विश्व उन्नत व्हावें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. युग-पुरुषांना न जाणल्यामुळें आणि स्वतःच्याच रोजच्या जीविताच्या संकुचित दृश्यांत गुरफटून राहिल्यामुळें सामान्य व्यक्तींना युग–पुरुषांचें महनीय कार्य केव्हां केव्हां दुर्बोध होतें आणि अज्ञानानें त्यांच्या कार्याला त्यांचा विरोध दिसूं लागतो. केव्हां केव्हां अशा पुरुषांचा छळ होतो आणि त्यांच्या प्रत्यक्ष कार्याला थोडा वेळ विघ्न आल्यासारखें वाटतें. तथापि या युग-कल्पना प्रसविणाऱ्या युगपुरुषांचें जीवनाला वळण लावण्याचें कार्य खंडित होत नाहीं. आपल्या मृत्यूनें आणि मृत्यूनंतरहि ते अमररूपानें जीवनावर सत्ता गाजवीत राहतात. युगपुरुषांचें कार्य हें जीवनाचेंच कार्य असल्या-

मुळे तें कधींच विफल होत नाहीं. तें जीवनाला सफल करीत करीत स्वतः सफल होतें.

## नव्या शाक्त धर्माचें स्वरूप

महात्मा गांधी हे वर वर्णिलेल्या युगपुरुषांच्या मालिकेंतील आहेत. बुद्ध आणि ख्रिस्त, कृष्ण आणि महंमद, झरतुष्ट आणि कान्फूशिअस, मनू आणि मोझेस यांच्याप्रमाणेंच आपल्या काळांतील विविध प्रवृत्तींचा सूक्ष्म विचार करून त्यांनीं जीवनाचें दर्शन–धर्म आणि कर्म–निर्माण केलें आहे. आधुनिक युगांतील विपत्तींची चिकित्सा करून त्यांनी युग–धर्म शोधून काढला असून, त्याचें समाजानें ग्रहण करावें यासाठीं त्यांची तपस्या चालली आहे. आधुनिक युगाचें मुख्य स्वरूप भौतिक ज्ञान हें आहे. भौतिक ज्ञानाचा ठेवा एकाएकीं मनुष्याला सांपडल्यामुळें त्याच्या सर्वच जीवनामध्यें उलथापालथ आणि गोधळ माजला आहे. भौतिक ज्ञानामुळें माणसांच्या इतके वर्षे दडपून राहिलेल्या अभुक्त वासना खळबळून जाग्या झाल्या आहेत आणि त्यांच्यात एकदम बंडाळी माजली आहे. पूर्व युगांतील भौतिक साधनांच्या मर्यादित स्वरूपामुळें समाजांतील विविध समूहांना, वर्गांना जी विशिष्ट व्यवस्था मान्य करून राहावें लागत होतें त्या व्यवस्थेंतील अन्याय आणि विरोध एकदम उघड झाल्यामुळें सर्वच व्यवस्था कोसळून पडली आहे. बुद्धिवाद, व्यक्तिसुखवाद, व्यक्ति–स्वातंत्र्यवाद, यांचा उदय होऊन भौतिक ज्ञानाच्या साहाय्यानें वासनांचें तर्पण करण्यची वृत्ति बेलगाम झाली आहे. भौतिक ज्ञानाच्या प्राप्तीबरोबर भौतिक साधनें ज्या व्यक्तींच्या हाती आलीं त्यांनीं अनियंत्रितपणें त्या साधनांचा उपयोग केला. आपल्या वासनातर्पणांतच सर्वांचे सुख साधलें जाणार आहे या भ्रमानें सामाजिक एकतेच्या सर्व कल्पनांचा आपल्या तर्कवादानें उपहास करून समाजव्यवस्थेचें उच्चाटण करण्यांत त्यांनी पुरुषार्थ मानला. आपल्या लोभी वृत्तीलाच जीवनाची देवता कल्पून तिच्यापुढें समाजांतील सर्व व्यक्तींचा आणि आपल्या हृदयांतील कोमल भावनांचा बळी दिला. आज सर्वत्र जगांत या आधुनिक **शाक्तांचा** भेसूर नाच चालला आहे. दुर्बल आणि अज्ञानी अशा हजारों लोकांचें रक्तशोषण करून आपण मोठी संस्कृति निर्माण करीत आहों असा यांचा आक्रोश चालला आहे. या आपल्या

पराक्रमांत आपलें सर्वांनीं स्तुतिस्तोत्र गाऊन आपली साथ करावी अशी यांची अपेक्षा आहे. या पुंजीपतींच्या अनर्थावह आक्रमणामुळे विश्वाच्या साऱ्या मर्यादा मोडून गेल्या असून सर्व मानवी समाजावरच मोठें संकट आलें आहे. हा नवीन युगाचा शाक्त–धर्म केवळ लोभमूलक आणि हिंसारत आहे. याला माणुसकीची पर्वा नाही. कोमलतेची कदर नाहीं. केवळ उन्माद हें याचें स्वरूप आहे. याचा नाच असाच चालू दिला तर मानवी जीवन नष्ट झाल्याशिवाय राहणार नाहीं.

## समाजाला नैतिक निष्ठेची गरज

युरोपांत या नवीन शाक्त धर्मानें जन्म घेतल्याबरोबर भोळेपणानें अनेकांनी त्याचा जयजयकार केला. लोकशाहीचें, समाजसत्तेचें, बंधुभावाचें युग अवतरण्यास या शक्तीचा उपयोग होईल असेंहि पुष्कळांस वाटलें. पण वाढत्या वेगाबरोबर या शाक्त धर्मानें आपल्या मदतीला आलेलीं ही सर्व उदार ध्येये खाऊन गट्ट केली आहेत. या शाक्त संप्रदायाला तोंड कसें द्यावयाचे आणि अज्ञानी, निःशस्त्र, भोळ्याभाबड्या लोकांनीं आपले अस्तित्व कसें राखावयाचें हा या युगाचा मोठा प्रश्न आहे. भौतिकज्ञानानें मस्त होऊन मनुष्य आपलें श्रेष्ठत्व विसरला आहे. शक्ति ही शिवाची अनुसारिणी झाल्याशिवाय ती मंगलदायिनी होणार नाहीं. भौतिक साधनावर आत्मिक ध्येयांचें प्रभुत्व लादल्याशिवाय जीवन यशस्वी होणार नाही. हें प्रचंड कार्य यशस्वी करून दाखविणे हा या युगाचा धर्म आहे. भेदांच्या द्वारा अभेदाचें दर्शन घेणें ही सर्व समाजव्यवस्थेची परिणाति असावयास पाहिजे. मनुष्याच्या वृत्ती जर शुद्ध आणि संयत झाल्या नाहींत तर केवळ शक्ति वाढल्यामुळे त्यांचा अधःपातच होईल. भौतिक ज्ञान वाढल्याबरोबर नैतिक निष्ठा वाढली नाहीं तर केवळ परस्परसंहारच होईल. हा संहार थांबवून सर्वांची सर्वांगीण उन्नति आणि प्रगति कशी होईल अशी साधनें शोधून काढणें हें या युगाचें विशिष्ट कार्य आहे. यूरोपला शक्ति मिळाली, तथापि त्या शक्तीचा समाजहिताकडे उपयोग करण्याची वृत्ति त्याला अद्यापि न सांपडल्यामुळें युरोपांत राजकीय लोकशाही, सामाजिक समता आणि आत्मिक बंधुभाव यांचीं ध्येयें पराभूत होत आहेत. केवळ जडवादाचा

अंगीकार केल्यामुळें तेथील बहुजन समाजाला नैतिक निष्ठा निर्माण करण्यास लागणारी धर्मश्रद्धा दुर्लभ होत चालली आहे आणि भौतिक आघातांचा प्रतिकार केवळ भौतिक प्रत्याघातांनीं करण्याचेच कार्य तेथें चाललें आहे. द्वेष, लोभ, हिंसा यांनीं वातावरण भरून गेल्यामुळें आजच्या युगांत जीवन भयानक होऊं लागलें आहे.

## जीवनशुद्धीच्या प्रयोगास सुरवात

दक्षिण आफ्रिकेत असताना महात्मा गांधी यांना प्रथम या शाक्त धर्माचें स्वरूप आकलन झाले आणि त्याचा प्रतिकार करून जीवनांत नैतिक मूल्ये पुन्हां प्रस्थापित करण्याचें कार्य त्यांनी तेथेंच सुरू केलें. आपल्या जीवनांत मुख्य इच्छा आत्मदर्शनाची आहे असें त्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत लिहिलें आहे. तथापि हे आत्मदर्शन जीवनाशी बेफिकीर राहून, निष्क्रिय राहून, आत्म्याची केवळ शाब्दिक चर्चा करून, जपतपादि कर्मठ साधनांची आराधना करून होणार नाहीं, हें त्यांनीं लगेच जाणलें आणि जीवनांतील कोणत्याहि प्रश्नांचा त्याग न करतांच उलट त्या सर्व प्रश्नाचा स्वीकार करून वृत्तीला शुद्ध, उन्नत आणि आत्माभिमुख करण्याचा ' कर्मयोग ' त्यांनीं सुरू केला. तेव्हापासूनच महात्मा गांधीचा आयुष्यक्रम म्हणजे जीवनशुद्धीचा एक महान् प्रयोगच होऊन राहिला आहे. सत्याग्रह याचा अर्थ हा आहे की, केवळ आत्मशक्तीनें आजच्या युगांतील अव्यवस्था दूर करण्याचा, जडवाद नाहीसा करण्याचा प्रयत्न करणे. शुद्धतेच्या प्रत्यक्ष आचरणानें जीवनातील अशुध्दता नाहींशी करावयाची, त्यागाच्या सामर्थ्यानें दुर्बलांचें दुःख निवारण करावयाचें. सत्याग्रही नेहमीच सत्यासाठीं, शुध्दतेसाठीं, समाजहितासाठी आपलें सर्वस्व अर्पण्यास तयार राहील. सत्तेनें जेव्हा समाज गांजला जाईल तेव्हा त्याला केवळ द्वेष किंवा हिंसा या मार्गावर जाऊं न देता तपश्चर्येनें, संघटनेनें, आत्मक्लेशाच्या मार्गानें सत्तेशीं तोंड देण्यास सिध्द करावयाचें. दक्षिण आफ्रिकेंत या सत्याग्रहाच्या साधनेची सिध्दता करून तेथें कांहीं प्रश्न या मार्गाने सोडवून त्याची यशस्विता पारखल्यानंतर १९१५ मध्यें महात्माजी हिंदुस्थानांत आले व तेव्हापासून गेल्या वीस वर्षांत येथील जनतेला आपले प्रश्न कोणते आहेत

व ते सोडविण्याचा प्रयत्न कोणत्या दिशेनें चालविला पाहिजे याचें शिक्षण सप्रयोग देत आहेत.

### सार्वत्रिक पुनर्घटनेची जरूरी

सत्याग्रह हें सर्व काळीं व सर्व परिस्थितींत वापरतां येण्यासारखें साधन आहे. सर्व जीवनाची घडी बिघडून गेल्यामुळें व्यक्तीच्या सामान्य आयुष्यांतील सामान्य गोष्टीपासून विश्वातील अत्यंत गुंतागुंतीच्या घडामोडीपर्यंत त्याचा उपयोग केला पाहिजे. व्यक्तीला जाणीव झाल्याबरोबर आपल्या रोजच्या आयुष्यांतील मामुली गोष्टीतच सत्यनिष्ठेला अग्रस्थान देण्याचा प्रयत्न तिनें चालू करावयाचा. आणि आपल्याभोंवतीं उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक संबंधांत या नैतिक मूल्यांची प्रतिष्ठापना करण्यांतच पुरुषार्थ मानावयाचा हा याचा प्रारंभ आहे. आपल्या समाजांत सर्वत्र गोंधळ माजला असून सार्वत्रिक पुनर्घटना करण्याचा काळ आलेला आहे. गेल्या शंभर वर्षांत हिंदुस्थानांत अनेक महाभागांनी समाजोद्धाराची अनेक कार्यें चालविली. महात्मा गांधींच्या सत्याग्रहदर्शनांत या सर्व महाभागांच्या तत्त्वांचें पूर्ण संकलन करून त्याचा सुंदर समन्वय साधण्यांत आला आहे. सत्याग्रहदर्शनानें कोणाही महाभागाच्या महनीय कार्याचा अधिक्षेप केला नाहीं. उलट सर्वांचाच सत्कार केला आहे. या भिन्न भिन्न साधनांचे सर्व प्रवाह या सत्याग्रहसाधनेंत समाविष्ट झाले आहेत. आर्थिक, राजकीय, सामाजिक, धार्मिक सर्व विचारांना समान स्थान देऊन आपापल्या वृत्तीप्रमाणें कार्य करीत राहण्याची सोय आणि सवलत या सत्याग्रहदर्शनानें सर्वांना आणून दिली आहे.

### सर्व थोरांचा एकत्र समन्वय

दयानंदांची वैदिक निष्ठा, राममोहनांचा सर्वधर्मसमन्वय, रामकृष्णांची आध्यात्मिकता, विवेकानंद–रामतीर्थांची दरिद्री नारायणाची तळमळ, अरविंदांची साधनमग्नता, लोकमान्यांचें स्वातंत्र्यप्रेम आणि धैर्य, आणि रवीन्द्रांचें विश्वप्रेम यांचा महात्मा गांधींत समन्वय झालेला आढळून येतो. त्यांच्या आचरणांत संन्याश्याची विरक्ति, गृहस्थाची प्रेमवृत्ति, ब्रह्मचाऱ्याची तडफ एकत्र पाहावयास मिळते. वंशभेद, धर्मभेद अर्थभेद आणि राष्ट्रभेद यांची तीव्रता वाढल्यामुळें आज सामाजिक जीवन

क्षुब्ध झाले आहे. अस्पृश्यतानिवारण, हिंदुमुसलमानांचें ऐक्य, खादी-ग्रामोद्योग आणि आत्मबलावर करावयाचा सत्ताप्रतिकार या चार मुख्य साधनांनीं हिंदी जीवनांतील सर्व प्रश्न सोडविण्याची त्यांची साधना सारखी चालली आहे. प्रेमवृत्तीवर अधिष्ठित होऊन सर्वभूतहितासाठीं अखंड आत्मदान देत राहिल्यानें समाजांत उच्च प्रकारचें कर्तृत्व उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. गेल्या वीस वर्षांच्या अनुभवानंतर या सत्याग्रहदर्शनानें हिंदुस्थानांतील सुप्त शक्ति जागृत झाल्या आहेत. शक्ति जागृत करून तिला संयमपूर्वक कल्याणाच्या मार्गावर घेऊन जावयाचें हें कार्य गांधीजी अव्याहत करीत आहेत. पददलितांना अन्यायाची जाणीव होत आहे. त्यांना जागृत तर करावयाचें, परंतु त्याच्या शक्तीचा अपव्यय होणार नाहीं अशा रीतीनें त्यांना आपल्या अन्यायाचा प्रतिकार करण्यास शिकवावयाचें हा यांतील मुख्य अंश आहे.

### महाराष्ट्राचें उज्ज्वल भवितव्य

महात्माजींच्या जीवन-तपस्येनें जागृत होऊन हिंदी समाज आपले प्रश्न पारखूं लागला आहे. महाराष्ट्रांतहि या काळांत नवीन उत्साहाची लाट आली आहे. जुने विरोध लयाला जात आहेत, नवीन सामर्थ्य उत्पन्न होत आहे. अशा वेळीं आपल्या व्यक्तिजीवनांत आणि समाज-जीवनांत सर्वत्र बाबतीत शुद्धता आणण्याचा प्रयत्न जोरानें चालला पाहिजे. समाजहिताची दृष्टि प्रामुख्यानें पुढें ठेवून संयमनानें जर आपले जीवन संघटित करण्याचा प्रयत्न केला तर थोड्याच काळांत महाराष्ट्रांतील समाजांत दिव्य तेज खेळूं लागेल. महात्मा गांधीजींच्या या जन्म-दिनानिमित्त आपण ह्या जीवनशुद्धीचा प्रयोग श्रद्धेनें असाच पुढें चालविण्याचा संकल्प करूं आणि ईश्वरी कृपेनें महात्माजींचें नेतृत्व आपल्या समाजाला दीर्घकाल लाभावें अशी प्रार्थना करूं.

---

# गांधीजींचें पहिलें दर्शन

बापूजींना येऊन मिळालेल्या लोकांपैकी मी सर्वांत पहिला कदाचित नसेन. तरीपण मला वाटतें की, पहिल्या लोकांपैकी मी एक आहेच.

आज बापूजींविषयीं बोलण्यापूर्वी मीं स्वत:विषयी थोडें सांगितलें तर तुम्हांला माझें सांगणें अधिक समजूं शकेल. मी बाळपणापासून क्रांतिकारी होतों. घरांत क्रांति, शाळेंत क्रांति, सगळीकडेच क्रांति. शिक्षकांबरोबरहि माझा झगडा झाला आहे. दोन वेळां तर मला कॉलेजमधून काढून टाकण्यांत—'रस्टिकेट' करण्यांत आलें होतें. मला कॉलेजें बदलावीं लागलीं, नोकऱ्या बदलाव्या लागल्या, इतकेंच नाही तर प्रांतसुद्धा बदलावे लागले. मी आपल्या मित्रांनाहि ताप देतों—शत्रूला तर देतोंच देतों, यामुळे मला कोणी राखूं शकत नाही.

सद्धा क्रांतीची खूप भाषा चालत असते. जिकडे जाल तिकडे "इन्किलाब झिंदाबाद!" ("क्रांति चिरायु होवो!") चे आवाज कानांवर आदळतात. पण त्या काळीं "इन्किलाब" (क्रांति) पुकारणारे कोणी नव्हते. करणारे थोडे होते. त्या थोड्यांमध्ये मीहि एक होतों. आमचा अहिंसेवर विश्वास नव्हता. आम्हांला जेथें जेथे संधि मिळे तेथें तेथें आम्ही ब्रिटिश राज्य दूर करण्याची गोष्ट लोकांना शिकवीत असूं. अभ्यास पूर्ण होतांच मी शिक्षक बनलों. तो सुद्धां कशासाठीं? दुसऱ्यांना क्रांतीचा संसर्ग लावण्यासाठी. सरकारने मला पगार द्यावा आणि मी सरकारविरुद्ध उठावणी करावी. त्याप्रमाणें बापूजी आले त्या वेळी मी मुझफरपूर कॉलेजांत अध्यापक होतों—इतिहास शिकवीत होतों.

१९१४ मध्ये बापूजी आफ्रिकेहून स्वदेशीं आले आणि आपलीं मुलें—आपलीं म्हणजे आपल्या आश्रमांतील मुलें घेऊन कविवर रवींद्रनाथ यांच्या शांतिनिकेतनांत उतरले. त्यावेळीं ते 'महात्मा' झाले नव्हते, 'मिस्टर' गांधी होते. पण तेव्हांसुद्धा ते एक विचित्र प्राणी होतेच आणि विचित्र प्राणी पाहण्याची इच्छा कोणाला होणार नाही? मीहि कुतूहलाने त्यांना भेटण्यास गेलों.

त्यांचें शरीर इतकें लहान व बारीक आहे की, ते गर्दीत मिसळलेले असतील तर कोणालाहि असें वाटणार नाही की येथे कोणी महापुरुष बसलेला आहे. पण ज्या दोन वस्तु त्यांना इतरांहून भिन्न करून दाखवितात त्या म्हणजे त्यांचे डोळे व त्यांची वाणी. त्यांच्या डोळ्यांत कांहीं अलौकिक तेज आहे. त्यांच्या वाणींत अलौकिक शक्ति आहे. त्यांचा आवाज मोठा नाही; तथापि त्यांच्या वाणीत जणूं बारा मेघ गर्जत आहेत असें वाटतें. खूप विचार करून बोलावें अशा रीतीने ते शब्द उच्चारितात आणि ते शब्द अंतःकरणाच्या खोल गाभाऱ्यांतून येत आहेत असें भासतें. ते जे बोलत आहेत तें करणारच असा निश्चयाचा ध्वनि त्यांमधून ऐकूं येतो; आणि यामुळेच त्यांचा क्षीण व मंदगति शब्दप्रवाह सुद्धा प्रचल शक्तिशाली वाटतो.

बापूजींच्या पहिल्याच भेटीची मजवर जी छाप पडली तीच केवळ मला वर्णावयाची आहे. त्यानंतर आम्ही पुष्कळ एकत्र राहिलो आहों, पुष्कळ भेटलो आहो, पण त्याविषयीं मला आज बोलावयाचें नाही.

मी आधीच पत्र लिहून भेटीची परवानगी मिळविली होती. शांतिनिकेतनामध्ये त्यावेळी काकासाहेब ( कालेलकर ) राहत होते. काकासाहेब माझे परम मित्र आहेत. आम्ही पुष्कळ एकत्र राहिलों आहों, हसलों खेळलों आहों, आणि झगडेहि केले आहेत. मित्र म्हटला म्हणजे तो झगडत नाही असें तुम्हांला वाटतें काय? खरी गोष्ट अशी आहे की मित्र असेल तोच झगडतो. तुमचा ज्यांच्याशी संबंध असेल त्यांच्याशीच तुम्ही झगडतां, नाही का? इतरांशीं कशासाठीं तुम्ही झगडणार? तर मग आम्ही पण असेच मित्र आहों, फार जुने मित्र आहों. आम्ही पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये बरोबर शिकत होतों. तेव्हाची आमची मैत्री आहे. ते त्यावेळी तेथेच होते. मी कांहीं कविवरांचा पाहुणा नव्हतों. बापूजींना भेटण्यासाठी गेलों होतों.

त्यावेळचा बापूंचा पोषाक, आहार सगळाच निराळा होता. अगदी सामान्य लोक जसा पोषाक पेहरतात तसाच पोषाक ते पेहरीत असत. आज जी गांधीटोपी म्हणून घरोघर प्रख्यात झाली आहे आणि या लहान मुलांनाहि जी घालवयास आवडत नाही ती गांधीटोपी ते पेहरीत. पाय

उघडे. आज ते अनवाणी असत नाहीत; पण त्यावेळी ते अनवाणी असत. खाण्यांत मुइमुगाचे दाणे. फलाहार करण्याचा त्यांचा नियम होता. पण येथे आल्यावर त्यांनां दिसलें की, येथे फलाहार फार महाग पडतो. महाग आहार गरिबाला कसा परवडेल? म्हणून त्यांनी भुइमूग चालू केला. दक्षिण आफ्रिकेमध्ये कदाचित फळें स्वस्त असतील यामुळे ती परवडत. पण फळे महाग पडतात ही गोष्ट आज त्यांना माहीत नाहीशी दिसते!

हें त्यांचे बाह्य वर्णन झालें. पहिल्याच भेटीत मला समजून आलें की, हा माणूस जें काम हाती धरील तें पूर्ण केल्याशिवाय सोडणार नाही. कामाचा तरी अंत पाहील, नाहींतर स्वतःचा तरी अंत करून घेईल. त्याविना याला शांति मिळावयाची नाहीं, हें मला ताबडतोब समजून आले. आज त्यांच्याविषयी काही बोलणें ही पुष्कळ सोपी गोष्ट झाली आहे. पण त्यावेळी त्यांची परीक्षा करणें हे मोठया चकोर दृष्टीच्या पुरुषालाच शक्य होतें. त्यावेळीं कोणालाहि हे पारखतां आलें नव्हते. मी ही परीक्षा केली होती. हें मी अभिमानानें सांगत नाहीं, पण आपण घरचीं माणसें एकत्र आलों आहों म्हणून सांगतों. बाहेर असतो तर मी हें बोलला नसतों. शिवाय त्यांच्यामध्यें त्यावेळीं दुसरीहि एक शक्ति आढळून आली आणि ती म्हणजे माणसांना आकर्षण्याची. या आकर्षणाचे कारण हें होतें. हा माणूस अगदीं प्रामाणिक होता. त्यांच्यासारखी एकाग्रता, दृढता, प्रामाणिकता व विचारवत्ता असणारा मनुष्य मी पूर्वी पाहिला नव्हता. मोठे पुरुष मी पुष्कळ पाहिले होते, तथापि त्यांच्यासारखा मनुष्य, त्यांच्यासारखी शक्ति मला कोठेहि दिसून आली नव्हती. त्यावेळच्या कित्येक मोठमोठया पुढाऱ्यांनी हिंदुस्थानच्या दारिद्र्यावर मोठमोठी पुस्तके लिहिली होतीं, पण दारिद्र्य ही काय चीज आहे हें कधीं जाणिलें नव्हतें. त्या लोकांनी स्वदेशाविषयीं मोठमोठीं उत्तेजक भाषणें केलीं होतीं, पण स्वदेशी वस्त्र कसें असतें हें कधी पाहिलें नव्हतें; असलें दुटप्पी जीवन मला या माणसांत दिसलें नाही, असला दंभ मला त्यांच्यांत आढळला नाहीं.

या भेटीच्या वेळींच मी बापूजींना दोन गोष्टी सांगितल्या, त्या आजहि मला बरोबर आठवतात. त्यावेळीं आम्ही इंग्रजींत संभाषण करीत असूं. बापूजी हिंदी अलीकडे बोलूं लागले. त्यावेळी मला मोडक्या तोडक्या

हिंदीत कदाचित् बोलतां आलें असतें, पण 'मिस्टर' गांधींना हिंदी येत नव्हतें. म्हणून मी त्यांना इंग्रजीमध्येंच सांगितलें : "Whenever you think that you are going to do any real piece of work you can call me" (जेव्हा का एखादें चांगलें काम आपण हातीं घ्याल तेव्हां आपण मला अवश्य बोलवावें ). आणखी एक गोष्ट मी त्याना सांगितली होती आणि ती अशी : "तुमच्या आफ्रिकेतील कार्याविषयी ज्यांनी ज्यांनी तुमची प्रशंसा केली आहे त्यांच्यापैकी एकहि माणूस तुम्हांला येथील कामात साह्य करणार नाहीं. तुम्ही ज्यांना ओळखीतहि नाहीं अशींच सारी माणसें तुमच्यापाशीं गोळा होतील आणि तींच तुमच्या उपयोगी पडतील. आता उल्लेखिलेल्या लोकांपैकी एकहिजण येणार नाहीं."

या दोनहि गोष्टी किती खऱ्या ठरल्या हे तुम्हांला प्रत्यक्ष दिसतच आहे.

याप्रमाणें पहिल्याच भेटीत मीं स्वतःला त्याच्या हातीं सोंपविलें. पण यावरून मला बापूजी पसंत आहेत—मला त्यांच्या सर्व गोष्टी मान्य आहेत, असें तुम्ही मानण्याचें मुळींच कारण नाही. बापूजी आल्यावेळेपासून संयमाची भाषा बोलत असतात. माझ्यामध्यें संयम तिळमात्र नाही. मला तुम्ही चहा दिलात तर मी तो पिईन आणि दूध दिलेंत तर तेंहि पिईन. मला तुम्ही मोठ्या पलंगावर निजविलें तरी मीं निजेन—मग झोप येवो की न येवो. याप्रमाणे आमच्या दोघामध्यें कसलेंच साम्य नाही—माझ्यासारखा बंडखोर अनुयायी गांधींना दुसरा एकहि लाभला नसेल. असें असतांहि मीं त्यांचें नेतृत्व मान्य केलें याचें कारण तुम्हाला सागतों.

जगांत दोन प्रकारची-तीन प्रकारची वाटल्यास म्हणा—माणसें असतात. आपली शक्ति व आपला मोठेपणा समजूं शकणाऱ्या माणसांचा एक प्रकार होतो. त्याच्यामध्ये इतरांना मार्गदर्शन करण्याची शक्ति असते. दुसरा प्रकार अशा माणसांचा असतो की, जे आपल्यामध्यें मार्गदर्शक होण्याची शक्ति नाहीं, आपण अनुयायी होण्यासाठीच निर्माण झालों आहों असें समजतात. त्यामुळें हीं माणसें दुसऱ्याचे मोठेपण अथवा त्याची शक्ति समजूं आणि स्वीकारूं शकतात, आणि प्रत्यक्ष स्वीकारितात. तिसऱ्या प्रकारचे लोक असे असतात कीं ज्यांच्यामध्यें मोठेपणा किंवा शक्ति नसते

आणि ते दुसऱ्याचें मोठेपण अथवा त्याची शक्ति समजूं किंवा स्वीकारूं शकत नाहींत. हे लोक कांहींच करूं शकत नाहीत. यांची स्थिति त्रिशंकू-प्रमाणे विचित्र होते. आपल्यामध्यें गुरुविरहित असणाऱ्या मनुष्यांना ‘ नगुरा ’ म्हणतात. असले लोक देखील ‘ नगुरा ’ च असतात. हे लोक कधी कसलें कार्य करूं शकत नाहींत. पहिल्या प्रकारचीं माणसें स्वतःचे गुरु बनतात. दुसऱ्या प्रकारची दुसऱ्याला गुरु करितात. त्यामुळें त्यांना जगांत काम करतां येतें. मी माझ्या स्वतःविषयीं एवढें निश्चित केलें होतें की, देशाचा भार मला स्वतःला उचलतां येण्यासारखा नाहीं. माझ्यांत पुढारी होण्याची शक्ति नाही. यामुळे मला कोणी पुढारी शोधून काढिलाच पाहिजे. मला कोणाच्या तरी हाताखाली काम केलें पाहिजे. तरच माझी अल्प शक्तिसुद्धा उपयुक्त होईल. नाहीतर ती व्यर्थ उधळली जाईल. मी या माणसात पुढारी होण्याची शक्ति पाहिली. हा मनुष्य काम करील, जें काम हातीं घेईल तें पूर्ण केल्याशिवाय सोडणार नाहीं, अशी माझी खात्री होऊन गेली. याकरिता माझे मार्गदर्शक म्हणून मीं त्यांचा स्वीकार केला.

सध्या पुढारी पुष्कळ झाले आहेत आणि अनुयायी थोडे आहेत. शिवाय सध्या जो उठला तो अखिल देशाचा पुढारी होत आहे. जन्माला येतो तेव्हापासूनच देशाचा पुढारी बनतो. त्यावेळीं असें नव्हतें. १९२८ पर्यंत हिंदुस्थानांत वल्लभभाई पटेल यांना कोणी ओळखीतहि नव्हतें. ते गुजरातेंत होईल तितकें काम करीत होते. बार्डोलीच्या लढयाने त्यांना देशभर प्रसिद्ध केलें. १९२९ मध्ये कलकत्त्याला राष्ट्रीय सभेचे अधिवेशन झालें तेव्हा आम्ही दोघे राष्ट्रीय सभा पाहण्यासाठी गेलों होतों. एक दिवस आम्ही मंडपांत शिरण्यासाठी गेलों असतां स्वयंसेवकानें वल्लभभाईंना अडविलें. त्याच्याजवळ तिकीट नव्हतें. माझ्याजवळ होतें. पण मग आम्हीं दोघांनीहि आंत जाण्याचा बेत सोडून दिला. या अधिवेशनांत बार्डोलीच्या विजयाबद्दल तिच्या सरदाराचें अभिनंदन करणारा ठराव माझ्या सूचनेवरून मांडला गेला आणि मान्यहि झाला. पण त्यावेळींसुद्धा लोक वल्लभभाईंना ओळखीत नव्हते ! यामुळे “ ज्यांचें आम्ही अभिनंदन करीत आहोंत त्या गृहस्थांना आम्हांला पाहूं द्या तरी ” अशी त्यांनी

मागणी केली. शेवटी वल्लभभाईंना उभें करावे लागलें. असलें त्यावेळचे पुढारी! सांप्रत गुजरातचा पुढारीहि अखिल देशाचा पुढारी! आणि बंगालचा पुढारीहि अखिल देशाचा पुढारी. सर्वांनाच लेखांची व भेटींची हौस. मी राष्ट्रीय सभेचा मंत्री आहें, पण मी वर्तमानपत्रांना भेट देत नाही, पत्रकें प्रसिद्ध करीत नाही. पण कित्येक 'छोटे मंत्री' वाटेल तितक्या भेटी देतात आणि लेख लिहितात. याप्रमाणे अनुयायांपेक्षा पुढारी अधिक झाले आहेत.

कित्येक विद्यार्थी मला तेव्हा विचारीत की, "तुम्ही हिंसा मानणार आणि गांधी अहिंसा मानणारे; गांधी ब्रिटिश राज्यावर श्रद्धा ठेवणार आणि तुम्ही त्याचा उच्छेद करणारे; मग तुम्ही त्यांचें पुढारीपण कसें स्वीकारिलें?" मी त्यांना कोणतें उत्तर देत असें ते तुम्हांला सांगण्यासारखें आहे. मी म्हणें, "मला या माणसांत एक शक्ति दिसून आली आहे; आणि ती म्हणजे, एक तर कामाचा अंत अथवा स्वत:चा अंत करावयाचा—म्हणून मी त्यांचा स्वीकार केला. शिवाय त्यांच्यामध्ये प्रामाणिकपणा आहे. आज हे "अहिंसा, अहिंसा" करीत असले तरी ज्या क्षणी अहिंसेने काही वळण्यासारखें नाही असें याना समजून येईल त्या क्षणीं हे हिंसात्मक मार्गाने जितक्या उग्रतेने लढतील तितक्या उग्रतेने दुसरा कोणी लढूं शकणार नाही. आज ब्रिटिश राज्य कल्याणकारक आहे असें हे मानीत आहेत. पण ज्या घटकेला ब्रिटिश राज्य हिंदुस्थानाच्या हिताचे नाही अशी यांची खात्री होईल त्या घटकेला जितक्या उग्रतेने हे त्याच्याशी झगडा करतील तितक्या उग्रतेने दुसरा कोणी झगडूं शकणार नाही. या एकाच गोष्टीमुळे मीं यांच्याकडे आकर्षिला गेलो आहे आणि याचसाठी मी यांना येऊन मिळालों आहें." आणि ही गोष्ट खरी आहे. हिंसेच्या बाबतींत आता माझी खात्री होऊन गेली आहे की, त्यांना अहिंसेपासून चलित करणे ही अशक्य गोष्ट आहे. पण त्यांना ज्या वेळीं ब्रिटिश राज्य हिंदुस्थानाच्या हिताचें नाही असें दिसून आलें त्याच क्षणी त्यांनी टिळकांसुद्धा कोणा पुढाऱ्याने न वापरलेलीं तीव्र विशेषणें त्याच्याविषयी वापरली. त्यांनी त्याला "सैतानी राज्य" म्हटलें; आणि तें इतक्या जोरानें की सगळा देश त्याला "सैतानी" म्हणूं लागला!

आता लहान मुलेंसुद्धा 'सैतानी सरकार' असें म्हणतात. तरीहि त्यांना कोणी पकडून नेत नाही.

त्यांच्यासारखा काम देणारा आणि घेणारा अद्यापि मीं कोणी पाहिला नाही. एका समाजवादी मित्राने मला विचारिलें, "तुम्ही समाजवादी पक्षाला कां मिळत नाही?" मीं उत्तर दिलें, मी तर सिद्धच आहे. पण मला या माणसांत जेवढी शक्ति दिसत आहे तेवढी शक्ति तुमच्यांत दिसत नाहीं; आणि मला तर काम करावयाचें आहे! माझ्यामध्ये पुढारी होण्याची शक्ति नाही म्हणून मीं यांना पुढारी म्हणून स्वीकारिलें आहे. ज्या क्षणी मला तुमच्यात शक्ति आढळून येईल त्या क्षणी मी आलोंच समजा. अथवा समाजवादी पक्षांत मी गेल्यामुळे जर समाजवाद्यांमध्ये शक्ति येणार असेल तर माझी बुद्धि त्यांच्या सेवेला सिद्धच आहे. आम्ही वकील आहो. आम्हाला दोनहि पक्षांच्या वतीने युक्तिवाद करितां येतो. जेव्हा जी बाजू हातीं घेतली असेल तिच्या हिताचें बोलावयाचें, ती खरी करून दाखवावयाची; बुद्धि वाटेल तसले युक्तिवाद शोधून काढिते.

पण आज तरी यांच्यासारखा पुरुष मला कोणी ठाऊक नाहीं. हा पुरुष लहानसहान कामांतहि आपल्या प्राणांचा होम करण्यासाठी तयार होतो. यांच्यासारखा तळहातावर शीर घेऊन खेळणारा मीं कोणी पाहिला नाहीं. स्वतःचे प्राण जोखमींत घालतांना याला असें कधी वाटत नाहीं की, आपण मोठा त्याग करीत आहों अथवा आपण गेल्याने जगात मोठी कमतरता पडणार आहे. शिवाय ह्यांना लहान लहान कामांतहि मोठमोठी कामें सामावलेलीं आहेत असें पाहतां येतें. ते शौचकूप स्वच्छ करितात आणि मानितात की, मी देशाचा उद्धार करीत आहें. ते हरिजनकार्य करितात आणि मानितात की, मी देशाचा उद्धार करीत आहें; ज्याला कित्येक "ओल्ड डेम्स वर्क" म्हणजे आजीबाईचें काम म्हणतात, त्या हातरहाटांतहि त्यांना देशाचा उद्धार दिसतो. कोणतेंहि लहान काम त्यांना लहान वाटत नाही. त्यांत त्याना स्वराज्याचें दर्शन होतें. आपण आत्म्यामध्ये परमात्म्याचें दर्शन घेण्यास सांगतों तसेंच हें आहे. आणि यामुळे त्यांच्याबरोबर कोणी स्पर्धा करूं शकत नाही. मला तर वाटतें की, त्यांच्या तत्त्वज्ञानाचें एक महत्त्वाचें अंग हें आहे की, त्यांनी कोठेहि

स्पर्धेला अवकाशच ठेविला नाही. तुम्ही एक बंदूक उगारली तर समोरचा दोन उगारील. पण तुम्ही अहिंसकच बनलांत, बंदूकच धरिली नाही तर तो काय करील? गिरणीशीं तुम्ही स्पर्धा केली तर तुम्हांला वेग, किंमत इत्यादि सगळ्या गोष्टीचा विचार केला पाहिजे. पण हे तर म्हणतात की, मला गिरण्यांचें कापडच नको आहे! मग स्पर्धा कोठे राहिली?

जगांत आजपर्यंत जे महापुरुष होऊन गेले ते सगळे यांच्याप्रमाणेच लहान लहान कामांतच मोठीं कामें पाहणारे होते. ख्रिस्त कोण होता? सुतार होता. महमद पाहा. लोकांच्या लहान कामात मोठीं कामें सामावून जातात; मोठ्यांत लहान सामावत नाहीत. मोठीं कामें करणें सोपें आहे. लहान कामें करणे सोपें नाही.

आज तरी यांच्याशिवाय इतर कोठेहि मला शक्ति दिसून येत नाही. जेव्हा दिसून येईल त्यावेळची गोष्ट. त्यांची शक्ति अपूर्ण असली तरी चिंता नाही. तेवढ्यासाठी तिला सोडून द्यावें असें नाही. माझी झोपडी कशीहि असली तरी महालाच्या लोभाने मी कशी सोडूं शकेन? जोंपर्यंत महाल तयार झाला नाही तोंपर्यंत माझ्याने आपली झोपडी सोडवणारच नाही. जर मी सोडीन तर झोपडी तर जाईलच, पण महालहि मिळणार नाही. असला मूर्खपणा मला करावयाचा नाही.*

---

# 'अव्यवहार्य' तत्त्वांचा व्यावहारिक विजय

सतरा वर्षांपूर्वी म.गांधी यांनी आपल्या सत्याग्रह तत्वाचा हिंदुस्थानांतील सर्वतऱ्हेचे प्रश्न सोडविण्याचे कामी उपयोग होणार आहे अशी स्वतःची श्रध्दा जाहीर केली आणि राष्ट्रीय सभेच्या द्वारें अखिल भारताला या तत्त्वपध्दतीची साधना करण्यास आवाहिलें, तेव्हांपासून आतांपर्यंत जो काळ गेला त्याचें सिंहावलोकन केलें असतां महात्माजींच्या

* १९३६ च्या रेटियाबारस (चरखा-द्वादशी)-गांधीजयंती-दिवशीं आचार्य कृपालानी यानी गुजरात विद्यापीठांत दिलेलें व्याख्यान.

द्रष्टेपणाची कोणालाहि साक्ष पटली पाहिजे. आजवर अनेकांनी महात्मांजींच्या तत्त्वांना अव्यवहार्य मानिलें. व्यावहारिक प्रश्न असल्या अव्यवहार्य कल्पनांनी कधीं सुटणार नाहींत असा चतुरपणाचा आव आणून उपहासहि केला. खरें पाहतां महात्माजींचीं मूलतत्त्वे संपूर्णतया आचरणांत आणणें कठीणच आहे. कारण तीं जीवनाचीं अंतिम मूल्यें आहेत.

सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्य, अपरिग्रह इत्यादि पूर्ण जीवनाची पूर्ण स्वरूपें पार्थिव व्यवहारात पूर्णांशानें कधींच उतरणार नाहींत. या अंतिम मूल्याचा संगम जेथें होतो तेंच परमेश्वराचे ‘ परंधाम ’ होय. मानवी यात्रा या परंधामाकडे निघालेली आहे. मानवी जीवनाचा अखेरचा ओढा याच प्रांतव्याकडे आहे. जितक्या प्रमाणांत मानवी व्यवहारावर या मूल्याचें प्रभुत्व प्रस्थापित होत जाईल तितक्या प्रमाणात मानवी जीवन कृतार्थ होईल. याची जेव्हा जेव्हां विस्मृति होते तेव्हां तेव्हां संसारांत क्षोभ निर्माण होऊन सुख आणि शान्ति यांचा नाश होतो. समाजांतील निरनिराळ्या व्यवहारांची ध्येय-दिशा भ्रष्ट होते आणि जीवनांत भयंकर आवर्त आणि उत्पात उसळूं लागतात. अशा वेळीं समाजाला ध्येय-दर्शन करविणारा महापुरुष निर्माण होतो. साऱ्या व्यवहारात उभा राहून तो आत्म्याची आर्त आरोळी काढतो. त्याच्या तपस्येनें समाजाला आधार लाभतो आणि व्यावहारिक वैराची उपशान्ति होऊं लागते. यालाच तत्त्ववेत्ते धर्मसंस्थापना म्हणतात.

आजही जगाचा संसार लोभ आणि क्षोभ यांनी खवळून गेला आहे. विज्ञानाचीं दालनें खुली झाल्यामुळें असंख्य सुखसाधनें हातीं आलीं. कर्तृत्वाचा अभिमान वाढून कर्त्या पुरुषांची बुद्धि अंध झाली; आणि आपल्याच सुखाच्या नादांत भोंवतालच्या समाजाचा त्याना विसर पडला. यामुळें ज्ञान वाढलें असताहि शान्ति दुरावली आहे. वंश–भेद, धर्म–भेद, अर्थ–भेद आणि राष्ट्र–भेद यांनी मानवसमाजाच्या चिरफाळ्या केल्या असून परस्परांत द्वेष, मत्सर आणि हिंसा यांचें साम्राज्य सर्वत्र माजलें आहे. माणसें आपली माणुसकी विसरून राक्षसी वृत्तीचा आश्रय करीत आहेत. त्या वेळीं माणसाची माणुसकी जागृत करण्याचें काम म गांधी करीत आहेत. त्यांचें कार्य केवळ हिंदुस्थानात चाललें असलें तरी त्यांची दृष्टि मानवजातीवर खिळून राहिली आहे. मानवजातीला हिंसेच्या

तावडीतून सोडवून प्रेममार्गावर आणून सोडणें हे त्यांचें उद्दिष्ट आहे. यामुळें त्यांच्या हृदयांत मानवी जीवनांतील सत्य-अहिंसादि अंतिम तत्त्वांचें चिंतन चालू असते आणि आपल्या प्रत्येक व्यवहारांत शक्य तेवढा त्याच तत्त्वांचा मूर्त आविष्कार करण्याचा त्यांचा आग्रह असतो. कारण अंतिम ध्येयाचा ज्ञानपूर्वक स्वीकार केल्याशिवाय आपला व्यवहार ध्येयोन्मुख होणार कसा ? ध्येयाची विस्मृति म्हणजे व्यवहाराचा विनाश होय. महात्माजींना ही ध्येयप्रतिष्ठापना अत्यंत जिव्हाळ्याची वाटते.

ही ध्येयें एका अर्थाने अव्यवहार्य आहेत याची त्यांना जाणीव आहे इतकेंच काय, पण संपूर्णतया व्यवहारांत आणतां येईल अशा कोणत्याहि विचाराला ध्येय हा शब्द लावण्यास ते तयार नाहीत. ध्येय त्यालाच म्हणता येईल कीं, ज्याचें संपूर्ण दर्शन बुद्धीला एकदम कधीच होऊं शकणार नाहीं. तथापि त्याचें आकर्षण जीवनावर इतकें बलवत्तर असेल की, हृदयाला त्याचा त्याग सहन होणार नाही. मोडक्या रीतीनें कां होईना, पण आपल्या इंद्रियांनी त्याची पूजा बांधण्याची धडपड केल्याशिवाय तृप्ति मिळणार नाही. महात्माजींची ध्येयाची कल्पना ही अशी असल्याकारणानें अव्यवहार्यता हें ध्येयाचें दूषण न होतां भूषणच बनतें. कारण ध्येयाचें तेंच मुख्य लक्षण ते मानतात. अशा प्रकार निरतिशय ध्येयवस्तु ( Absolute ) ची प्रस्थापना केल्याशिवाय जीवनाला अर्थच लाभत नाहीं हें जगांतील आजपर्यंतच्या महान् विचारकांनीं मान्य केले आहे.

तत्त्वें जर अव्यवहार्यच असणार तर व्यवहारांत त्यांचा काय उपयोग ? हा प्रश्न स्वाभाविकच उत्पन्न होतो. ध्येय आणि व्यवहार यांचा परस्पर संबंध कोणता मानावयाचा यावरच आध्यात्मिक आणि भौतिक विचारपद्धतींतील अनंत पंथ उभारलेले आहेत. व्यवहाराला मायिक मानून ध्येयपूजेत रमणाऱ्यांच्या पंथातून सामाजिक विषमता, राजकीय जुलूम आणि वैचारिक दास्य यांची निर्मिति होते, आणि अन्याय्य समाजरूढींना मान्यता देणारा दांभिक धर्म अस्तित्वांत येतो; ह्याच्या उलट व्यवहारालाच परम सत्य मानून त्यापलीकडील ध्येयतत्त्व नाकारणाऱ्या पंथांमधून असहिष्णुता आणि हिंसक वृत्ति यांचा प्रादुर्भाव होतो. जडवाद आणि सुखवाद

यांचेंच समाजावर नियंत्रण सुरू होतें. हे दोनहि मार्ग अर्धवट सत्यावर उभारलेले आहेत आणि असत्यापेक्षां अर्धसत्यें अधिक भयानक असतात हें प्रसिद्धच आहे.

आजपर्यंतच्या कोणाहि विचारकापेक्षां म. गांधींनीं या कोडयाचें उत्तर अधिक समाधानकारक दिलेलें आहे असा माझा विश्वास आहे.

महात्माजींनी जीवनांतील कोणत्याहि अंशाचा जाणतपणें अथवा अजाणतपणें त्याग केलेला नाहीं.सत्याची त्यांची उपासना पूर्ण जीवनावर आधारलेली आहे. यामुळें व्यवहाराच्या अंगप्रत्यंगांत अव्यवहार्याचें दर्शन होईल अशाच विचाराला ते व्यावहारिक सत्य समजतात. या व्यावहारिक सत्याचें स्वरूप नेहमीं सामाजिकच असलें पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असतो. मात्र त्याची साधना व्यक्तीनें आपल्या स्वतःच्या जीवनांतच प्रथम सुरू करावयाची असते. अव्यवहार्य तत्त्व व्यवहारांत सर्वत्र लपून राहिलेलें असतें. त्यावरील आवरण दूर करून चिरंतन सत्याचें दर्शन घेणें हेंच जीवनाचें प्रयोजन आहे. यासाठीं प्रत्येक मनुष्यानें आपलें जीवन ध्येय-कल्पनांनीं प्रथम तुडुंब भरून टाकिलें पाहिजे आणि समाजांतील असत्य, अन्याय, कुरूपता यांना हुसकून लावण्यासाठी सतत झटलें पाहिजे.

साध्य आणि साधन यांत समतोलपणा निर्माण झाल्याशिवाय हें कधींच साधणार नाहीं. कारण साधनांत साध्याचा अंश उतरला नसेल तर साधनाच्या पूर्णतेंत कोणत्या साध्याची पूर्ति होईल ? वाटेल त्या साधनानें वाटेल तें साध्य कधींच सिद्ध होणार नाहीं. म्हणून साध्याची पूर्ण कल्पना हृदयांत भरून घेऊन साधनामध्यें तिचा सतत वर्षाव करीत राहिलें पाहिजे. यामुळें महात्माजींच्या दृष्टीनें शेवटीं साधनाच्या शुद्धतेलाच प्राधान्य मिळतें. कारण साधनांच्या बाहेर सिद्धि असतच नाहीं. साध्याचा मूर्त अवतार म्हणजेच साधन ! आणि साधनाची पूर्णता म्हणजेच साध्याची सिद्धि. महात्माजींनीं जगाच्या तत्त्वज्ञानांत या सिद्धांतानें अत्यंत महत्त्वाची भर घातली आहे. या सिद्धांताचा जितक्या प्रमाणांत मानव-समाज अवलंब करील तितक्या प्रमाणांत त्याला भौतिक सुख आणि आत्मिक शान्ति यांचा लाभ होत जाईल.

तूर्त हिंदुस्थानांतील विविध प्रश्न या सिद्धांताच्या बळावर सोडवून

दाखविण्याची महात्माजींनी हिंमत धरिली असून त्या दृष्टीनें संशोधन आणि संघटन चालविलें आहे. हिंदुस्थानांतील प्रश्न कांहीं जगावेगळे नाहींत इतकेंच काय पण जगाचे आणि हिंदुस्थानचे प्रश्न एकच आहेत. भारतीय प्रश्नांच्या उत्तरांचा सर्व जगाला उपयोग आहेच. भारताच्या सेवेच्या द्वारे महात्माजींच्या हातून विश्वाचीच सेवा घडत आहे. विनय-वृत्तीमुळें ते त्याचा फार बभ्रा करीत नाहींत इतकेंच.

जगांतील वर्णभेदाचा प्रश्न हिंदुस्थानांत अस्पृश्यतेच्या रूपानें सहस्रावधि वर्षे वावरत आला आहे. मनुष्यमात्राला समाजांत विकासाच्या समान संधि जोंपर्यंत उपलब्ध झाल्या नाहीत तोंपर्यंत समाजांत सहकार्य व शांति यांचा उदय होणार नाहीं. अस्पृश्यसमाज हा हिंदुस्थानांतील लोकांच्या अगदीं तळाशीं असलेला, पददलित वर्ग आहे. या वर्गाला मानव्याचे सर्व अधिकार खुल्लेपणानें मिळवून दिल्याने येथील सर्व लोकांचा उच्च संकृतींत प्रवेश होईल. यासाठी समाजांतील स्पृश्य वर्णाच्या लोकांत विचारजागृति घडविली पाहिजे. सवर्णांतील कर्त्या पुरुषांनी अस्पृश्यांवरील हा अन्याय दूर करण्याची प्रतिज्ञा करून आपल्या भोंवतालच्या लोकाना ह्या अन्याया-चें स्वरूप सतत उघड करून दाखविलें पाहिजे. अस्पृश्यता-निवारण याचा प्रथम उद्देश अस्पृश्यांचा सामाजिक दर्जा सुधारणें एवढाच असला तरी त्याचे परिणाम नैतिक दृष्ट्या फार दूरवर पोंचणारे आहेत. अस्पृश्यता हें तत्त्वच इतकें अनैतिक आहे कीं, समाजांत त्यामुळें श्रेष्ठ-कनिष्ठपणाचे क्षुद्र अहंकार सर्वत्र ग्रासून राहिले आहेत. सामाजिक बाबतीत स्वेच्छेनें एकदां अस्पृश्यता दूर करण्याचें ठरले म्हणजे समाज-मनाची आपोआप वाढत्या प्रमाणावर शुद्धि होत जाईल आणि समाजांत खऱ्या बंधुभावाचा उदय झाल्यानें व्यक्तिमात्राला आजच्यापेक्षां किती तरी मोठ्या प्रमाणावर प्रेमाचा साक्षात्कार होऊं लागेल.

हिंदु-मुसलमानांचा म्हणजे धर्म-भेदाचा हा हिंदुस्थानांतील दुसरा महत्त्वाचा प्रश्न होय. पाश्चात्य देशांत वाढत्या नास्तिक वादामुळें व आर्थिक आणि राजकीय प्रश्नांमुळें धर्मकलह मागें पडलेला दिसतो. वस्तुतः पाश्चात्य लोक वृत्तीनें कांही सहिष्णु झालेले नाहींत, आणि अमेरिकेसारख्या ठिकाणीं अद्यापिहि धर्मवेडेपणा आढळतो. जर्मनींत नाझी पक्षानें ज्यूंची

शिकार चालविली आहे त्यांतहि धर्मवेडेपणाचा कांहीं अंश आहेच. तथापि धार्मिक कलह हें हिंदुस्थानचें सध्यांचें वैशिष्टय म्हणतां येईल. धर्मकलहावर पाश्चात्यांनीं काढलेला तोडगा सर्वांशीं समाधान-कारक नाहीं; कारण सर्व धर्म बुडविले तरी मनुष्यमात्राबद्दल प्रेम आणि आदर वाटूं लागल्याशिवाय समाजांत शांति नांदणार नाही. युरोपांत धर्मयुद्धाचे जागी वर्गयुद्ध आलें असून पूर्वीच्याच रानटीपणाची सुधारलेली प्रदर्शनें अधिक विस्तृत प्रमाणावर सध्यां दिसत आहेत. महात्माजींनीं सत्य आणि अहिंसा हेंच सर्व धर्मोचें सार आहे असा निष्कर्ष काढला असून सर्व धर्मांच्या लोकांनीं त्याच कसोटीवर आपापल्या धर्म-समजुती आणि रूढी पारखून घेतल्या पाहिजेत आणि जरूर तेथें धर्मविचारांत आणि आचारात शुद्धि घडवून आणली पाहिजे असें सांगितलें आहे. जगांतील सर्व धर्म-संस्थापक हे आत्मिक प्रेमाचे आणि सामाजिक समतेचे पुरस्कर्ते होते. त्याच्या अनुयायांचीं भांडणें स्वार्थमूलक व अज्ञानमूलक आहेत. धर्मशील पुरुषानें सामाजिक अन्यायांचा प्रतिकार करण्यासाठीं शान्तिसंग्रामांत सामील झालें पाहिजे, आणि सर्वधर्मसम-भाव समाजांत वाढीस लागेल अशी आपली वर्तणूक ठेविली पाहिजे. जगाला हिंसेचा धर्म नको आहे. त्याला प्रेमाच्या आणि समतेच्या धर्माची भूक आहे. ही भूक महत्माजींचा सत्य-धर्मच भागवूं शकेल.

औद्योगिक क्रान्तीमुळें जे राक्षसी कारखाने निघाले त्यांनी समाजांत आर्थिक वर्गभेद निर्माण केले आहेत. जगांतील सर्वांत बलिष्ठ प्रश्न हाच होय. या प्रश्नापुढे सध्यां बाकी सर्व गोष्टी क्षुद्र भासूं लागल्या आहेत. सामान्य जगण्याचा प्रश्नच बिकट झाला असतां इतर सांस्कृतिक विचारांना वाव कोठला ? ह्यांतूनच साम्राज्यवादाचा शेवटला मोठा प्रश्न उत्पन्न झाला असून जगांतील सर्व राष्ट्र महान् आवर्तांत सांपडली आहेत.साम्राज्यवादी राष्ट्रांत वर्गयुद्धाचा प्रश्न उग्र स्वरूप धारण करीत आहे तर हिंदुस्थानसारख्या जित राष्ट्रांत वर्गकलह आणि राष्ट्रीय भावनेचा स्वातंत्र्याचा लढा यांचें मिश्रण झालें आहे.

हिंदुस्थानापुढें पहिला प्रश्न राष्ट्रीय स्वातंत्र्याचा आहे. कारण आपलें दारिद्य कितीही भेसूर असलें तरी राजकीय सत्ता हातीं आल्याखेरीज

ग्राचा प्रश्न तरी कसा सोडवितां येणार ? दारिद्र्यानें लाचारी, लाचारी-
ारतंत्र्य आणि पारतंत्र्यामुळें पुन्हां दारिद्र्य या चक्रकांतून हिंदुस्था-
सुटका करणें हा कॉंग्रेससमोरील यक्ष-प्रश्न आहे. म. गांधींनीं या
प्रश्नाचें उत्तर शोधिलें असून चरख्याच्या साधनेनें हिंदुस्थानचें स्वराज्य
ार आहे असा त्यांचा अढळ विश्वास आहे.

ना निःशस्त्र आणि जगांतील युद्धसाधनें अत्यंत सुधारलेलीं अशा
ात हिंदुस्थानांतील बुद्धिमान लोक हाताश होऊन गेले होते. कांहीं
ो अर्जविनंत्यांची लाचारी पत्करली तर दुसऱ्या काहीं जणांनीं दहशत-
स्वीकारिला. हे दोनहि मार्ग परिणामतः विफल आणि नैतिक दृष्टीनें
ाची अधोगति करणारे होते. म. गांधींचा असहकारितेचा मार्ग
ामानाचा आणि श्रेष्ठ नीतिमत्तेचा असल्या कारणानें राष्ट्रीय सभेनें
ा उत्साहानें स्वीकार केला. महात्माजींची स्वराज्याची साधना ही
राजकीय असंतोषाची चळवळ नव्हती. स्वावलंबनाच्या जोरावर
ांतील महत्त्वाच्या सर्व दोषांचा परिहार करून आदर्श समाज निर्माण
ाची ती साधना होती.

स्वराज्य म्हणजे समाजानें निर्माण केलेली स्वयंपूर्ण समाजघटना.
ऋतूमध्यें सारी पृथ्वी प्रफुल्लित होते त्याप्रमाणें स्वराज्यांत समाजाच्या
ाक्ति प्रफुल्लित व्हावयाच्या. यासाठीं महात्माजींनीं ज्या अनेकविध .
चालू केल्या त्यापैकीं कोणत्याही प्रवृत्तीची जेवढी जोपासना समाजात
तेवढें स्वराज्य हस्तगत झालें " असें त्यांचें म्हणणें.

ाट विचार करितां हें म्हणणें अत्यंत उचित आहे असेंच दिसतें.
अस्पृश्यता दूर केली, जितका धर्म-समभाव निर्माण झाला, चरखा-
ग्रोग इत्यादिकांच्या साहाय्यानें शेतकऱ्याच्या झोपडींत जितकी संपत्ति
र्ण झाली, तितकी राष्ट्राची स्वावलंबन शक्ति संघटित झाली. मद्या-
ो व्यसनें आणि आपसांतील भांडण-कज्जे यांच्यापासून जेवढी मुक्तता
तेवढा शक्ति-संचय झाला. अशा रीतीनें आपलें भवितव्य आपणांला
नत करितां येतें अशी प्रजेला प्रचीति आली म्हणजे नुसत्या शांतिमय
ारानें परकी सत्ता कोसळून पडली पाहिजे. कारण समाजावर होणारा
य समाजाच्या सहकार्यावरच जगत असतो. अन्यायाशीं असहकार

करण्याची निर्भय वृत्ति अंतःकरणांत उदित झाल्याबरोबर अन्याय लुला होते. हें या अहिंसा-क्रान्तीमागील तत्त्वज्ञान आहे.

याबरोबरच महात्माजींनी स्वराज्य म्हणजे खेड्यांतील शेतकऱ्यांचें राज्य ही कल्पना सर्वत्र पसरविली. स्वावलंबनाच्या सामुदायिक संघटनेनें शेतकऱ्यांच्या स्वराज्याची प्रस्थापना करणें हें आज राष्ट्रीय सभेचें कार्य बनलें आहे. या कार्यासाठीं बुद्धिवंतांनी आपली बुद्धि, धनवंतांनीं आपलें धन खर्चीं घालण्यांतच मोठेपणा आहे अशी सेवेला प्रतिष्ठा निर्माण झाली आहे. गेल्या सतरा वर्षांतील सामुदायिक तपस्येनें हिंदुस्थानांत म. गांधींच्या सिद्धांतांना आणि साधनपद्धतींना स्थैर्य आलें आहे.

आजचा तरुण-भारत ही महात्माजींची कृति आहे. टीका, कुशंका, इत्यादींच्या माऱ्यांतून बाहेर पडून राष्ट्रीय सभा आज हिंदुस्थानचें प्रतिनिधित्व करूं लागली आहे. त्रावणकोरांतील सरकारनें आपली देवळें अस्पृश्यांना एकजात खुलीं करून अस्पृश्यतेच्या हृदयालाच हात घातला आहे. अंदमानांतील शूर क्रान्तिकारकांनीं दहशतवादावरील आपली श्रद्धा नष्ट झाल्याचें जाहीर करून राष्ट्रीय सभेच्या अहिंसेच्या धोरणाला मान्यता दर्शविली आहे आणि सरहद्दीवरच्या आडदांड पठाणांच्या प्रांतांत खान अबदुल गफ्फारखान यांनीं महात्माजींच्या सर्व सिद्धान्ताचा कायमचा स्वीकार केला असून ते आपल्या लाखों अनुयायांना तीच शिकवण देत आहेत. सात प्रान्तांत राष्ट्रीय सभेचीं प्रधानमंडळें निरपवादपणें निर्माण झालीं असून तीं आपल्या हातांतील सर्व सत्तेचा राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमाची जोरानें अंमलबजावणी करण्याकडे उपयोग करीत आहेत. शेगाव येथें बसलेल्या म. गांधींच्या उपदेशाप्रमाणें कॉंग्रेसची वर्किंग कमिटी संघटनेचा कार्यक्रम आंखीत आहे.

**अशोकानंतर गेल्या २॥ हजार वर्षांत अहिंसा तत्त्वावर एवढा मोठा राज्यकारभार चालविल्याचा दाखला इतिहास सांगत नाहीं. हातीं आलेली सत्ता अल्प असली तरी ती स्वावलंबनाच्या तपस्येनेंच मिळालेली आहे. त्या सत्तेनें आपली शक्ति वाढविण्याचा हा नवा प्रयोग संपूर्ण सत्ता जिंकण्याच्या कामीं यशस्वी झालाच पाहिजे अशी महात्माजींनीं आपली श्रद्धा पुन्हां व्यक्त केली आहे.**

महात्माजींच्या ‘ अव्यवहार्य ’ तत्त्वांचा हा व्यावहारिक विजय पाहिला म्हणजे त्यांच्या विभूतिमत्त्वाची थोरवी स्पष्ट दिसून येते. जागृत झालेला भारत महात्माजींच्या दिव्य नेतृत्वाला पात्र झाल्याशिवाय राहणार नाहीं अशी मला दृढ आशा आहे.

---

# खादीचें विश्वरूप

नैतान् विहाय कृपणान् विमुमुक्षुरेक : ।

( ह्या अज्ञानी–गरीब लोकांना सोडून मी एकटाच मुक्त होऊं इच्छित नाहीं. ) —प्रल्हाद

## गांधीवादाची कामधेनु

महात्मा गांधींच्या चळवळीचा सारा भर खादीवर आहे. खादी म्हणजे स्वराज्य आणि स्वराज्य म्हणजे खादी असें त्यांचें समीकरणच आहे. इतकेंच काय परंतु गांधीवादाचें सारसर्वस्वहि खादी हेंच आहे. अहिंसा म्हणजे स्वराज्य आणि खादी म्हणजे अहिंसा. राष्ट्रानें खादीचा अंगीकार केला की अहिंसा स्थिर झाली व स्वराज्यहि निर्भर झालेंच. खादीमध्येंच हिंदुमुसलमानांचें, स्पृश्य–अस्पृश्यांचें ऐक्य निर्माण करण्याचें सामर्थ्य आहे. भांडवलवाला आणि मजूर यांतील द्वैतहि निवारण्याचा खादी हाच एक परिणामाकारक मार्ग आहे. पूर्ण स्वातंत्र्यार्थ सत्याग्रही युद्ध करावयास लागणारें बलहि खादीच्या संघटनेंतच सांठविलें आहे. भौतिक स्वातंत्र्य आणि आत्मिक मोक्ष देण्यास हि खादी पूर्ण समर्थ आहे. अशी खादी ही गांधीवादाची कामधेनु आहे असे मानलें जातें. या मान्यतेचें आज थोडें स्पष्टीकरण करावयाचें योजिलें आहे.

## खादी म्हणजे स्वराज्य

मनुष्याचा संसार सुरळीत चालण्यासाठीं त्याला अन्नवस्त्राचें बाबतींत स्वावलंबी आणि स्वतःसिद्ध बनविलें पाहिजे. हिंदुस्थानांतील लाखों

खेड्यांत राहणाऱ्या जनतेला स्वतःच्या परिश्रमानें अन्न-वस्त्र निर्माण करण्याचें ज्ञान देणें ही स्वावलंबनाची प्रथम दीक्षा आहे. शेतकरीवर्ग आपल्या शेतांत राबून अन्न पिकवितो. त्याचप्रमाणें त्यानें कापूस पिकवून त्या कापसाचें फावल्या वेळांत सूत काढावयाचें ठरविलें तर तो कापडहि निर्माण करूं शकेल. अन्न-वस्त्रांच्या प्राथमिक गरजांसाठीं त्याला कोणावर अवलंबून राहण्याची पाळी येत नाही त्याचा स्वाभिमान सदैव जागृत राहतो. त्याला गुलाम करण्याची कोणाहि जालीमाची प्राज्ञा नाही. अन्न वस्त्रासाठीं परावलंबी झालेल्या व्यक्तीलाच गुलामगिरीच्या बंधनांत ना-इलाजानें जखडून पडावें लागतें. ज्या समाजांतील व्यक्ती अन्नवस्त्रासाठीं कधीं परावलंबी होणार नाहींत त्या समाजाला आपलें जीवन स्वातंत्र्यानें सहज घालवितां येईल. कारण अन्नवस्त्रांचें स्वावलंबन हा सामाजिक अथवा वैयक्तिक स्वातंत्र्याचा पाया आहे. हिंदुस्थानांत इंग्रजांनीं आपली राजकीय सत्ता प्रस्थापन केली यामुळें वस्तुतः हिंदुस्थानांतील सामान्य प्रजेचें कांहीच नुकसान होण्यासारखें नव्हतें. कारण अशा राजसत्ता हिंदुस्थानच्या इतिहासांत अनेकांनीं स्थापन केल्या होत्या. त्यांच्या स्थापनेप्रमाणेंच त्याचे विनाशहि हिंदी जनतेनें निर्विकार मनानें पाहिले होते. जोंपर्यंत समाजाचें आर्थिक जीवन स्वावलंबी आणि स्वतः-सिद्ध होतें तोंपर्यंत केवळ राजकीय पारतंत्र्यानें त्यांचें कांहींच बरेंवाईट होऊं शकलें नाहीं. परंतु इंग्रजांच्या राजकीय सत्तेचें स्वरूप मुख्यतः आर्थिक होतें. आर्थिक स्वरूपाच्या आघातानें भारतीय समाजाच्या मर्म-स्थानावर घाव पडला आणि त्याचें जीवन सर्वस्वी लुलें झालें. इंग्रजी राज्य आलें असतांहि भारतीय समाजानें आपलें आर्थिक जीवन संपूर्ण राखलें असतें तर इंग्रजी राज्य आपोआप नाहींसें झालें असतें. पण आम्ही केवळ राजकीय मुत्सद्देगिरींत अथवा क्षात्रवृत्तींतच हार खाल्ली एवढेंच नव्हे तर समाज-संघटनेच्या शास्त्रीय ज्ञानांतहि अज्ञानी ठरल्यामुळें पराभूत झालों. खादी असतांहि आमचें स्वराज्य कां गेलें हा प्रश्न विचारणाराला आमचें उत्तर असें आहे कीं केवळ जड खादीनें समाजाचें रक्षण होत नाहीं. त्या खादीच्या मागें जें समाज-धारणेचें तत्त्वज्ञान आहे त्या तत्त्वज्ञानानें

धारणेचें हें तत्त्वज्ञान आधींच नाहींसें झालें होतें. यामुळें स्वराज्याच्या नाशाबरोबरच उरलीसुरली खादीहि तावडतोब नाहींशी होऊन आम्ही पूर्ण गुलाम बनलों. खादीचें तत्त्वज्ञान विसरल्यामुळेंच आपलें स्वराज्य गेलें व स्वराज्य गेल्यानंतर खादीहि नामशेष झाली. खादी आणि स्वराज्य यांचा असा अन्योन्य संबंध आहे. यामुळें स्वराज्य मिळवण्याची चळवळ सुरू झाली त्या वेळेपासून आमच्या पुढाऱ्यांनीं आर्थिक पाशांतून सुटण्यासाठी स्वदेशीचा मंत्र सांगितला आहे. आर्थिक पाशांचा छेद हेंच आमचें ध्येय; आमचें स्वराज्य म्हणजे आर्थिक स्वातंत्र्य होय. हा सिद्धान्त दादाभाई नौरोजी, लो. टिळक इत्यादि सर्व पुढाऱ्यांनीं भारतीय राष्ट्राला कळकळीन सांगितला. आपल्या आर्थिक मुक्तींतच आपली राजकीय मुक्ति आहे आणि आपल्या आर्थिक मुक्तीचें साधन स्वदेशी–धर्मांत आहे ही गोष्ट म. गांधींच्या पूर्वीच स्पष्ट झालेली होती. महात्मा गांधींचा विशेष हा आहे की, त्यांनीं स्वदेशी धर्माचा राष्ट्रीय प्रमाणावर प्रचार करविला. खादी हें स्वदेशी–धर्माचें पूर्ण प्रतीक आहे. खादीमध्यें अखिल ग्रामोद्योगांचा समावेश केला कीं स्वदेशी अर्थशास्त्र पूर्ण तयार होतें. या अर्थशास्त्राची सिद्धि हेंच आपल्या देशांतील सामान्य जनतेचें स्वराज्य होय. याच अर्थानें खादी म्हणजे स्वराज्य आणि स्वराज्य म्हणजे खादी असें महात्माजी नेहमीं म्हणत असतात.

## खादी म्हणजे अहिंसा

आतां अहिंसा म्हणजे स्वराज्य आणि खादी म्हणजे अहिंसा या समीकरणाचा अर्थ पाहूं. भारतीय ग्रामांतील सामान्य जनतेचें अन्नवस्त्रादिकांचे बाबतींत स्वावलंबी जीवन म्हणजे स्वराज्य हें एकदां मान्य केलें म्हणजे असलें स्वराज्य मिळविण्यासाठीं तोफा, बंदुका, बॉंबगोळे इत्यादि शस्त्रें, सैन्यबळ आणि गुप्त कट यांची मुळींच गरज नाहीं. इंग्रजांचें राज्य बंदुकीवर चाललें नसून आपल्यांतील दुहीवर, भयावर चाललें आहे. शस्त्राशीं शस्त्र लढविणें आपणाला शक्य नाहीं आणि आवश्यकहि नाहीं. इंग्रजांचें राज्य आर्थिक पिळणुकीसाठीं चाललें आहे. या आर्थिक पिळणुकीला साह्य करावयाचें नाहीं व राज्यतंत्राशीं असहकार करावयाचा या साधनानेंच इंग्रजांच्या पाशवी शक्तीला पांगळी बनवितां येईल. शेतकऱ्यांनीं

आपली आर्थिक स्वावलंबनाची योजना स्वतःच्या बळावर सिद्धीस नेली तर इंग्रजांच्या राज्याचा मुख्य पायाच उखडला जाईल आणि मग शस्त्रास्त्रांचा संभार असूनहि त्यांचें राज्य अशक्य होईल. एका विशिष्ट ठिकाणीं विरोधार्थ जमलेल्या लोकांना शस्त्रांनीं जेरीस आणतां येईल. पण परदेशी वस्तूंना स्पर्श करावयाचा नाहीं, या निष्ठेनें आपापल्या खेड्यांत आपल्या जीवनाला लागणाऱ्या आवश्यक वस्तू निर्माण करावयाचें कार्य भारतीय जनतेनें सुरू केलें म्हणजे या अहिंसात्मक लढ्याला कोणतीं शस्त्रे पुरीं पडणार आहेत ? यामुळेच खादीच्याद्वारा समाजांत जेवढें आर्थिक स्वावलंबन निर्माण होईल तेवढा शेतकऱ्याचा विजय होत जाणार आहे. शस्त्रशक्ति हें इंग्रजांचें बल आहे. अहिंसात्मक संघटनाशक्ति हें भारतीय बल आहे. या बलापुढें मूठभर शस्त्रांचा टिकाव लागावयाचा नाहीं. यासाठीं अहिंसा म्हणजे स्वावलंबन असें महात्मा गांधींनीं सांगितलें आहे. पण ही अहिंसा म्हणजे कांही एकादें तात्त्विक दर्शन नव्हे, ती समाजसंघटनेची पद्धति आहे. खादीनेंच ही समाजसंघटना होत असल्यामुळें खादी म्हणजेच अहिंसा असा निश्चय करण्यांत आला आहे.

**खादीनें समाजसुधारणा**

भारतीय समाजांतील सामान्य जनतेचें रोजचें जीवन आर्थिक प्रश्नांनीच भरलेलें आहे. हे प्रश्न स्वावलंबनानें आणि सहकार्यानें सोडविण्याचें तंत्र म्हणजे खादी–तंत्र होय. यांतूनच हिंदुमुसलमान, स्पृश्य–अस्पृश्य, इत्यादि प्रश्न सुटणार आहेत. खेड्यांतून सर्व वस्तू स्वतंत्रपणें, सहकारितेचा आश्रय करून सोडविण्याचा प्रारंभ झाला कीं, विषमता निर्माण होण्यालाच जागा रहात नाहीं. बेकारीचा रोग निर्माण झाला की दंगे-धोपे, संप मारामाऱ्या, श्रीमंत–गरीब असलीं दृश्यें दिसूं लागतात. या सर्व दुखण्यांवर ग्रामिक जीवनांतील आर्थिक स्वयंपूर्णता हा एकमेव उपाय आहे. खादी हें त्याचें प्रतीक होय.

खादी हा ग्रामसंजीवनाचा प्रश्न आहे. त्यांत यंत्रज्ञानाला, विज्ञानवादाला विरोध नाहीं. विषमतेला, परावलंबनाला अवश्य विरोध आहे. आर्थिक जीवन जितकें परस्परावलंबी, संमिश्र आणि अजस्र प्रमाणावर चालेल तितकें हिंसात्मक वातावरण त्यांत निर्माण झाल्याशिवाय राहाणार

नाहीं. ही हिंसा कोणत्याहि बाह्य उपायांनीं नाहींशी होणार नाहीं. अथवा केवळ धार्मिक प्रवचनांनीं ती दूर होणार नाहीं. आर्थिक जीवनच परस्पर सहकारावर आणि स्वावलंबनावर, साधें पण सुखद अशा रीतीनें उभारलें पाहिजे. आर्थिक जीवनपद्धति जितकी अहिंसामय होईल तितकें समाज-जीवन अहिंसात्मक होत जाईल. म्हणून सामाजिक जीवनांतील अहिंसेचा पाया आर्थिक जीवनांतील अहिंसेवर म्हणजे खादीवर घातला पाहिजे असे गांधीवादाचें निश्चित मत आहे.

### खादीचें धर्मकारण

पण खादी हें केवळ अर्थकारणच नाहीं. तें एक उच्च धर्मकारणहि आहे. वस्तुतः खरा धर्म अर्थकारणाशीं एकरूपच असतो. आणि खरें अर्थ-कारणहि धर्माहूनहि भिन्न अथवा त्याच्याशीं विरोधी असत नाहीं. खादी हें केवळ व्यक्तीच्या श्रीमंतीचें विलासाचें साधन होऊं शकणार नाहीं. हें सर्वोदयाचें तत्त्व आहे. समाजांत समत्वबुध्दि निर्माण होण्याला खादीचा मोठा उपयोग आहे. सामान्य जनता अज्ञानांत राहिली, तिच्यात आळसा-सारखे भयंकर दोष असले, तिचें अन्नवस्त्रहि तिला मिळण्याची सोय उरली नाहीं तर समाजांतील प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या वर्गाची स्थिति तरी चांगली राहील काय? उच्च वर्णीयांनीं वा मध्यम-वर्गीय बुध्दि-मंतांनी आपली बुध्दि, आपलें संघटना-कौशल्य सामान्य जनतेच्या उध्दारा-साठींच वापरलें पाहिजे. आज भारतीय समाजांत बुध्दिमंतांची बुध्दि कार्याभावीं गंजून भ्रष्ट होत चालली आहे. ती जर सामान्य जनतेच्या कल्या-णाच्या कामीं जुंपली जाईल तर अखिल समाजांत नवीन चैतन्य खेळूं लागेल. अज्ञानी आणि ज्ञानी, उद्योगी आणि आळशी, श्रीमंत आणि गरीब असला भयावह विषम देखावा आज दिसत आहे तो नाहींसा होईल. सर्व समाजांतील लोक परस्पर प्रेमानें, बंधुभावनेनें एकमेकांच्या उद्धारा-साठीं झटूं लागतील तर आर्थिक-जीवन हां हां म्हणतां स्वयंपूर्ण होऊं शकेल. आणि बुद्धीचा, शक्तीचा व सत्तेचा उपयोग सेवेसाठीं आहे, ही वृत्ति बाणली असतां समाजांत खऱ्या आध्यात्मिक वृत्तीचा फैलावा होईल.

**खादीचें विश्वरूप**

खादी शेतकऱ्याचा जोडधंदा आहे. बेकारांना अन्न देणारी आहे, खेड्यांतील विस्कटलेली घडी पुनः बसवूं शकणारी आहे, गरीबाच्या खिशांत दोन पैसे टाकणारी आहे, अनाथ स्त्रीबालकांची पोषक आहे, सामान्य जनतेची कार्यशक्ति वाढविणारी आहे, राष्ट्रीय निर्मितींत भर घालणारी आहे, गरीब-श्रीमंत या भेदाला दूर करणारी आहे, सेवेचा मार्ग दाखवून बुद्धीला शुद्धता आणणारी आहे, अर्थाला धर्माचें स्वरूप देणारी आहे, समाजाचें अहिंसा-बल वाढविणारी आहे. ती स्वराज्याची साधक आहे. याप्रमाणें खादी ही सामाजिक जीवनांत आर्थिक आणि आत्मिक गुणांना प्रसविणारी असल्यामुळें गांधी-वादांत तिला कामधेनु मानण्यांत आलें आहे तें किती यथार्थ आहे बरें !

---

# वस्त्रस्वावलंबनाची भूमिका

**स्वातंत्र्य आणि स्वावलंबन**

मानवी जीवनविकासासाठीं संपूर्ण स्वातंत्र्याची साधन म्हणून अत्यंत आवश्यकता आहे. याची प्रत्येक व्यक्तीला प्राप्ति व्हावयाची असेल तर मानवी जीवनाच्या अस्तित्वाच्या अत्यंत प्राथमिक गरजांच्या बाबतींत प्रत्येक व्यक्ति शक्य तितकी स्वावलंबी झाली पाहिजे. अन्नवस्त्र या माणसाच्या मूलभूत गरजा आहेत. यांच्या बाबतींत जितकें स्वावलंबन निर्माण करितां येण्यासारखें असेल तितकें सिद्ध करण्याचा अगदीं कसून प्रयत्न झाला पाहिजे. कारण या स्वावलंबनाच्या सिद्धीशिवाय इतर क्षेत्रांतील स्वातंत्र्य हस्तगत करणें हें बहुधा सामान्य माणसांना अशक्यच आहे. अन्नवस्त्राच्या दृष्टीनें स्वावलंबी असलेल्या व्यक्ती आपल्यावरील होत असणाऱ्या अन्यायाविरुद्ध निर्भयपणें झगडा चालविण्याला सहज सिध्द होऊं शकतात. म्हणून ही स्वावलंबन-सिध्दि स्वातंत्र्य-संपादनाची प्रथम साधना आहे.

### स्वावलंबन आणि सहकार्य

मानवी जीवनाला स्वावलंबनाप्रमाणेंच सहकार्याचीहि अतिशय आवश्यकता आहे. सहकार्यानें भौतिक संपत्ति निर्माण करतां येते एवढेच नव्हे, तर सहकार्याच्या योगानें मानसिक सगुद्णांचाहि विकास होत असतो. पण भौतिक दृष्टीनें सुखकारक आणि आत्मिक दृष्टीनें कल्याणकारक असें सहकार्य हें स्वावलंबनावरच आधारलेलें असलें पाहिजे. सहकार्य करणाऱ्या व्यक्तींमध्यें सहभाव अथवा समभाव असवा लागतो. जेव्हां सहकार्य करणाऱ्या व्यक्तींत विषमता असते तेव्हां त्यांपैकीं अनुकूल पक्षांत लोभ व हिंसा आणि प्रतिकूल पक्षांत भय व दास्य यांचा प्रादुर्भाव होतो. आणि अशा विषम स्थितींतलें सहकार्य हें नामतः कितीहि मधुर भासलें तरी रूपतः तें भेसूरच ठरतें. सहकार्याची शुद्धता राखण्यासाठींहि स्वावलंबनाची जोपासना करण्याची आवश्यकता असते. स्वावलंबनाने आत्मविश्वास उत्पन्न झालेल्या व्यक्तींत जे सहकार्य निर्माण होईल तेंच स्वातंत्र्याला पोषक होईल.

### स्वावलंबन आणि समता

सहकार्यांत सहभावाचा म्हणजेच समभावाचा समावेश होत असल्यामुळें स्वावलंबन हें समतेच्या प्रथापनेसाठी किती आवश्यक आहे हें सहज समजण्यासारखें आहे. समता म्हणजेच स्वातंत्र्य. याप्रमाणें स्वावलंबनाचें स्वरूप असल्यामुळें स्वातंत्र्यप्राप्तीसाठी स्वावलंबनाची उपासना करणें अपरिहार्य आहे हें उघड दिसून येईल.

### आधुनिक कारखानदारी आणि जीवन-स्वातंत्र्य

उपजीविकेच्या साधनांमध्यें परावलंबी असलेल्या समाजांत सहकार्य, समता आणि स्वातंत्र्य यांचें अस्तित्व टिकूं शकत नाहीं, ही गोष्ट जगाच्या सध्यांच्या आर्थिक आणि सामाजिक परिस्थितीकडे लक्ष दिलें असतां स्पष्ट कळण्यासारखी आहे. पाश्चात्य देशांत यांत्रिक उत्पादनाचा आश्रय करून जी नगर-संस्कृति निर्माण झाली आहे तिच्या योगें त्या समाजांतील व्यक्तींचें स्वातंत्र्य संपूर्ण नष्ट झालें आहे, विलक्षण विषमता सर्वत्र पसरली आहे आणि सहकार्याचे जागी स्पर्धा आणि हिंसा यांचें साम्राज्य तेथें माजलेलें आज दिसत आहे. पाश्चात्य संस्कृतीच्या या दुरवस्थेला त्यांनी स्वीकारलेली आधुनिक कारखानदारीची पद्धतिच कारण झाली आहे ही गोष्ट

आतां सर्वांस कळून चुकली आहे. भौतिक शास्त्रांच्या संशोधनाचा उपयोग केंद्रीकृत कारखान्यांकडे करून पाश्चात्यांनीं संपत्तीचें उत्पादन अपरंपार वाढवलें खरें; पण त्या उत्पादनांत मानवी जीवनाचा विकास करण्याचें सामर्थ्य नसून त्यामुळें मानवीजीवनाचा विनाशच सर्व प्रकारांनीं चालला आहे. ही कारखानदारी-पद्धति व्यक्तींच्या मालकींतून काढून समाजाच्या ताब्यांत दिल्यानें आर्थिक समता निर्माण होईल अशी समाजवादी विचारसरणि आहे. पण रशियाच्या प्रयोगावरून या विचारसरणींतील भ्रामकता, चांगलीच प्रत्ययास येत आहे. व्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी भांडवलशाही राष्ट्रांप्रमाणेंच कम्युनिस्ट रशियांतहि निरनिराळ्या मिषांनी चालूच आहे. या गळचेपींतून सामान्य जनतेला बाहेर पडण्याचा मार्ग तेथे कोणाला उपलब्ध झालेला दिसत नाही.

केंद्रीकरणानें उत्पादन-सामर्थ्य वाढतें ही गोष्ट खरी असली तरी त्यासाठी व्यक्तिस्वातंत्र्याचा बळी द्यावा लागतो. पण व्यक्तिस्वातंत्र्याशिवाय संस्कृतीला कांहीच सौंदर्य राहणार नाहीं ही गोष्ट कधी विसरतां कामा नये. व्यक्तिस्वातंत्र्य टिकवावयाचें तर उत्पादनाचें केंद्रीकरण करण्याचा मोह सोडून दिला पाहिजे. उत्पादनाचें केंद्रीकरण न करितां जितकें उत्पादन वाढवितां येईल तेवढ्यावरच संतोष मानण्यास समाजांतील व्यक्तींना शिकविलें पाहिजे. याशिवाय सामान्य जनतेचें जीवन-स्वातंत्र्य सिद्ध होणार नाहीं. महात्मा गांधींच्या खादी-ग्रामोद्योगाच्या चळवळीच्या मागें हा जीवन-स्वातंत्र्याचा महत्त्वाचा सिद्धान्त आहे.

## जीवन आणि संपत्ति

समाजांत ज्या वस्तु निर्माण करावयाच्या त्या जीवनाला पोषक असल्या पाहिजेत. त्यासाठीं व्यक्तीच्या ताब्यांत राहील असा उत्पादनाचा प्रकार असला पाहिजे. व्यक्तींचें स्वातंत्र्य ज्या प्रमाणांत कमी होईल त्या प्रमाणांत उत्पादनांत कृत्रिमता, खोटेपणा, विनाशकारिता हे दोष उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहींत. उत्पादन हे उपभोगासाठीं आहे. व्यक्तीला आपल्या जीवनाला उपयोगी अशा वस्तू जर स्वावलंबनानें निर्माण करितां आल्या तर त्यामुळें जीवनाच्या गरजा सरळपणें भागवितां येतील. आधुनिक काळांत कारखानदार, व्यापारी, दलाल, पेढीवाले यांना अवास्तव

महत्त्व प्राप्त झालें आहे आणि वस्तूंपेक्षां नाण्यांनाच प्राधान्य आलें आहे. यामुळे सामाजिक व्यवहारांत विलक्षण हिंसा पसरत चालली आहे. ही हिंसा थांबविण्यासाठीं उत्पादनाचे छोटे छोटे प्रकार शोधून काढले पाहिजेत. मालक आणि मजूर, निर्माते आणि गिऱ्हाईक, कच्चा माल आणि पक्का माल यांतील अंतर शक्य तितकें नाहींसें केल्याखेरीज अर्थक्षेत्रांतील पारतंत्र्य आणि पिळणूक नाहींशी होणार नाहीं.

### ग्रामप्रधान राष्ट्र आणि उद्योगप्रधान ग्राम

पाश्चात्याच्या नगरसंस्कृतीनें जनतेला सर्व प्रकारची गुलामगिरी आली असून व्यक्तीचें महत्त्व नाहींसें झालें आहे. हिंदुस्थानसारख्या खंडतुल्य आणि ग्रामप्रधान राष्ट्रानें पाश्चात्यांचा आदर्श सोडून दिला पाहिजे. आपलें राष्ट्र ग्रामप्रधानच राहिलें पाहिजे म्हणजे आपल्या समाजांतील व्यक्तींना स्वातंत्र्याचा आस्वाद घेणें शक्य होईल. पण आपलीं ग्रामें मात्र उद्योग-प्रधान बनविलीं पाहिजेत. आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग करून आपल्या ग्रामीण उद्योगांचें संशोधन व संस्करण करतां येण्यासारखें आहे. ग्रामजीवनाला लागणाऱ्या विविध वस्तूंचें उत्पादन ग्रामांतून विविध व्यक्तींच्या घरीं होऊं लागलें तर ग्रामीण जीवन समृद्ध होऊं शकेल.

### अहिंसा आणि ग्रामोद्योग

सध्यां जगभर जी हिंसा चालली आहे त्याला आधुनिक युरोपनें निर्माण केलेली उत्पादनाची पद्धतिच कारणीभूत झाली आहे. औद्योगिक शहरें आणि त्यांनी उध्वस्त केलेली ग्रामें, भांडवलवाले कारखानदार आणि निर्धन परावलंबी मजूर, मागासलेले देश आणि आक्रमणशील साम्राज्यवादी राष्ट्रें इत्यादींच्या परस्परविरोधांतून अनेक प्रकारची हिंसा निर्माण होत आहे. या हिंसेचें कोणत्या प्रकारें निर्मूलन होईल यांकडे विचारवंतांचे लक्ष लागलें आहे. समाजांतील उत्पादनपद्धति व्यक्तिप्रधान आणि राष्ट्रें ग्राम-प्रधान बनविल्याशिवाय ही सामाजिक हिंसा थांबणें शक्य नाहीं असा महात्मा गांधींचा संदेश आहे.

हिंदुस्थानांतील बहुसंख्य जनता खेड्यांतूनच राहात आहे. त्या खेड्यांत अन्न निर्माण करण्याचें काम कसेंबसें चाललें आहे. पण जीवना-ला लागणाऱ्या इतर वस्तूहि जर तेथेंच निर्माण करितां आल्या तर या

ग्रामांना हिंसेच्या जंजाळांत पडण्याचे कारण राहाणार नाही. एकेकाळीं ही ग्रामें उद्योगानें भरलेलीं होतीं, हे उद्योग नवीन राजवटीत मारले गेले. त्यामुळें हजारों, लाखों लोक बेकार झाले आहेत. याना पुन्हां त्यांच्या खेड्यातच उद्योग देता आले तर पुन्हा खेडी भरभराटतील. उद्योग-धंद्यांचें प्राचीन ज्ञान लुप्त होत चाललें आहे; त्याचा जीर्णोद्धार करून शास्त्रीयज्ञानाच्या साह्यानें त्याला नवीन उजळा देतां येईल. आणि खेडया-पाडयातून निसर्गतः निर्माण होणारी व उद्योगाभावी वाया जाणारी कितीतरी संपत्ति जीवनाचे कारणीं लावितां येईल. या उद्योगांना लाग-णारा कच्चा माल, त्यावर श्रम करण्यास लागणारी मनुष्यशक्ति, आणि तयार मालाला लागणारें गिऱ्हाईक या सर्व गोष्टी खेडयातच मिळण्या-सारख्या आहेत; त्यासाठीं दूरवर जाण्याचे कारण नाही. यामुळें हे उद्योग आर्थिक दृष्टया सहजच यशस्वी करितां येतील.

जीवनाच्या मूलभूत गरजा भागविण्याचे कामीं स्वावलंबी असलेल्या या ग्रामप्रधान जनतेला आपलें स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं कोणत्याहि हिंसात्मक साधनाचा अवलंब करावा लागणार नाही. कारण अशा स्वाव-लंबी खेडयाचा नाश करणे किंवा त्याना गुलामगिरी स्वीकारवयास लावणे ही गोष्ट सर्वस्वीं अशक्य होईल. या ग्रामीण जनतेला आपलें आर्थिक स्वावलंबन टिकविण्याची शिकवणूक मिळाली आणि त्यांना सामाजिक जीवनातील सहकार्याची शक्ति समजली म्हणजे तिला आपलें जीवन–स्वातंत्र्य सत्याग्रहाच्या अहिंसात्मक मार्गानें सहज टिकविता येईल.

**खादीचें ग्रामोद्योगांतील स्थान**

अन्नाच्या बरोबरीनें वस्त्राची गरज मनुष्यमात्राला असल्यामुळे खादीचा उद्योग हा राष्ट्रीय जीवनाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. हिंदुस्थानात बहुतेक ठिकाणीं कापूस पिकतो आणि प्रत्येक शेतकऱ्याच्या घरात जर रहाट फिरत राहील तर त्याला आपल्या रिकाम्या वेळात कुटुंबाला लागणारा सर्व कपडा निर्माण करितां येईल. शेतकऱ्याला जोडधंद्याची गरज आहे याविषयीं कोणाचाच मतभेद नाहीं. आणि सूत कांतण्या-सारखा सोपा, बिन–भांडवलाचा आणि सार्वत्रिक होऊं शकणारा दुसरा धंदा नाहीं. यामुळें खादीच्या उद्योगाला ग्रामोद्योगाच्या ग्रहमालेंत मध्यवर्ती

सूर्याचें स्थान आहे असें महात्माजी म्हणत असतात. वस्त्र हें सतत लागणारें, नेहमी फाटणारें आणि सर्व मनुष्यमात्रास आवश्यक असल्यामुळें याच्या अधिक निर्मितीची भीति नाहीं आणि बाजारपेठेची चिंता करण्याचें कारण नाहीं. एका खादीभोंवतीं सुतार, लोहार, विणकर, रंगारी इत्यादी अनेक कारागिरांची मालिका जमत असल्यामुळें खादीच्या प्राणप्रतिष्ठेबरोबर अनेक उद्योगांना जीवन पोंचण्यासारखें आहे.

### खादीचा वाढता प्रचार

महात्मा गांधीनीं खादीला जी प्रतिष्ठा आणून दिली आहे तिच्यामुळें खादीचा प्रचार वाढत आहे. खेडयापाडयांतून सूत कांतण्याचा उद्योग विशेष लाभदायक आहे ही गोष्ट जनतेच्या अनुभवास येऊं लागली आहे. खादीच्या सरंजामांत आणि तन्त्रशास्त्रांत गेल्या वीस वर्षांत विलक्षण प्रगति झाली असुन ग्रामसेवकाला खादीच्या द्वारा कोठल्याहि खेडयांत बैठक मारून राहतां येईल असें निश्चित स्वरूप खादीच्या उद्योगाला प्राप्त झालें आहे.

### वस्त्र-स्वावलंबन

खादीच्या उद्योगाचें अगदी शुद्ध आणि परिणत स्वरूप म्हणजे वस्त्र-स्वावलंबन होय. तकली आणि चरखा यात सध्याच इतके शोध झाले आहेत की, हिंदुस्थानांत कोणाहि माणसाला आपली वस्त्राची गरज स्वावलंबनानें भागवितां येणें सहज शक्य झालें आहे. रोज एक तास कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीनें चरख्यावर किंवा तकलीवर सूत कांतण्याचा संकल्प केला तर कुटुंबाचे वस्त्रस्वावलंबन होतें. वैयक्तिक उत्पादनाची ही आदर्श परिसीमा झाली.

वस्त्र–स्वावलंबनाचा कार्यक्रम शहरांतूनहि बऱ्याच प्रमाणांत होण्यासारखा आहे. शहरांतील मध्यम वर्गांतील स्त्री-वर्गाला पुष्कळ फुरसत असते आणि त्यांनीं वस्त्र-स्वावलंबन करण्याचें ठरविलें तर त्यांच्या आर्थिक जीवनांत महत्त्वाची सुधारणा झाल्याशिवाय राहणार नाहीं.

उत्पादनाची दृष्टि सोडली तरी कलेच्या दृष्टीनेंहि वस्त्र-स्वावलंबनाचें महत्त्व कांहीं कमी नाहीं. लहान मुलांमुलींना सुंदर सूत कातण्याची कला शिकविली तर तिचा त्यांच्या जीवनावर किती चांगला परिणाम होईल बरें !

**सूत्रयज्ञाचें स्वारस्य**

ज्यांना आर्थिक दृष्टीनें सूत कातण्याची गरज नाहीं अशा वर्गानेंहि सूत्रयज्ञाची दीक्षा घेण्याची आवश्यकता आहे. जीवन हें परिश्रमावरच परिपुष्ट होत असतें. शारीरिक परिश्रम टाळण्याच्या मोहांतूनच जगांत विविध प्रकारची विषमता आणि पिळणूक निघालेली आहे. मानवमात्राची प्रतिष्ठा परिश्रमानेंच सिद्ध व्हावयाची आहे. त्या परिश्रमाचें प्रतीक म्हणून सूत्रयज्ञाची कल्पना महात्मा गांधींनीं राष्ट्राला दिली आहे. यज्ञकर्म हें त्रिविध फल देणारें असतें. यज्ञकर्मानें कर्त्याच्या जीवनाचें धारण होतें. यज्ञ-कर्मामुळें लोकसंग्रह साधतो आणि यज्ञकर्माचे योगानें कर्त्याच्या चित्ताची शुद्धि होते. सूत्रयज्ञांतहि या त्रिविध फलांची प्राप्ति होत असते. सूत कांत-णाऱ्याच्या देहाचे आच्छादन होत असल्याने जीवन-धारणाचें फल मिळतें हें उघडच आहे. आपलें वस्त्र आपल्या परिश्रमानें निर्माण करीत असल्या-मुळें सूत कांतणारा कोणाच्या श्रमांचा अपहार करीत नाहीं; यामुळें तो समाजात कोणत्याहि प्रकारचा विग्रह निर्माण करीत नाही. उलट लोकसंग्रह होईल अशीच प्रवृत्ति निर्माण करितो. आणि सूत कांतण्याच्या कर्माबरोबर चित्तात दरिद्रनारायणाशी एकरूप होण्याची साधना चालवावयाची असल्या-मुळें कांतणाऱ्याच्या चित्ताची शुद्धि होत जाते. अशा रीतीनें धारण, संग्रह आणि शुद्धि या तीनहि फलांचा लाभ करून देणारा सूत्रयज्ञ सांस्कृतिक दृष्टीनें सर्वांनीं अंगीकारण्यासारखा आहे.

कर्माची योग्यता त्यात ज्ञान, सौंदर्य आणि शुचिता किती प्रगट झाली यावर असते. सूत कांतणारानेंहि या गोष्टीकडे अगत्यपूर्वक ध्यान दिलें पाहिजे. कर्मातील सर्व प्रक्रियांकडे बुद्धिपूर्वक अवधान दिल्यानें त्या कर्माला ज्ञानपूर्वकता लाभते. ज्ञानपूर्वक केलेल्या कर्मात सौंदर्याची प्रतीति येऊं लागते. जेथें ज्ञान व सौंदर्य ही प्रकटलीं तेथें शुचिताहि आलीच असें समजण्यास प्रत्यवाय नाहीं.

**ग्रामसेवकांस विनंति**

महाराष्ट्रांत सध्यां खादीचा प्रचार सारखा वाढत आहे. अशा वेळीं ग्रामसेवकांना माझी प्रेमाची विनंति आहे कीं, त्यांनीं खादीशास्त्रांत प्रवीण-ता संपादावी; म्हणजे त्यांना खादीच्याबरोबरच अहिंसात्मक जीवनाचा प्रचार करण्याची शक्ति येईल.

# प्रपंच आणि कर्मयोग

लोकमान्य टिळक यांच्या गीतारहस्यांत ' कर्मयोग ' प्रतिपादिला गेल्यानंतर जुन्या मताच्या वेदान्ती मंडळींना ब्रह्मज्ञानाची महती कमी झाल्यासारखें वाटल्यामुळें त्यांनीं त्याचा निषेध सुरू केला. ब्रह्म निर्लेप आणि निष्क्रियच राहिले पाहिजे; लोकसंग्रहाचें लोढणें ज्ञानी पुरुषाच्या गळयांत काय म्हणून ? अशी हाकाटी सुरू झाली. याच्या उलट नव्या मताच्या संसारी मंडळींना आपल्या प्रपंचाची हीनता काढून टाकून त्याला मोक्षाच्या भूमिकेवर ज्ञानाच्या शेजारीं मानानें मिरवण्याची संधि मिळाल्यासारखें वाटून त्यांनी ' कर्मयोगा'चा नेटानें पुरस्कार सुरू केला. तेव्हांपासून स्वार्थाला लोकसंग्रहाचें आणि प्रपंचाला कर्मयोगाचें उजळ स्वरूप मिळण्याची सोय झालेली आहे असे संसारी लोकांना वाटूं लागलें आहे.

### ही चलती की वंचना ?

कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग श्रेष्ठ आणि मोक्षापेक्षां लोकसंग्रह अधिक मूल्यवान् या सिधान्तावरून त्यागापेक्षा भोग श्रेष्ठ आणि अनासक्तीहून आसक्ति उच्च प्रकारची, असे सिद्धान्त निर्माण होऊन त्यांचा फैलाव जारीनें चालला आहे. ' कर्मयोगा ' ची इतकी लोकप्रियता पाहून विचारी माणसाला सहज सशय येऊं लागला आहे की, बुद्ध आणि खिस्त, शंकर आणि रामानुज, ज्ञानेश्वर आणि तुकाराम याच्या पेक्षां श्रेष्ठ प्रतीचे लोक एकाएकी या काळांत उत्पन्न झाले आहेत काय ? रामदास आणि लोकमान्य यांच्या तत्त्वज्ञानाचा हा विजय म्हणजे मानवी समाजाच्या पूर्णतेची प्रसादचिन्हें तर नव्हेतना ! पण आर्थिक उपासमारीनें चाललेली तळमळ, राजकीय गुलामगिरीनें लादलेली लाचारी, ध्येयहीन हृदय आणि सुखहीन जीवन यांमुळें भासणारी भेसुरता या दृश्याकडे पाहिलें म्हणजे ही ' कर्मयोगा ' ची चलती केवळ वंचना आहे असें उघड झाल्याशिवाय राहात नाही. पोटासाठी वाटेल त्या अधम मार्गाचा स्वीकार करण्यांत अपमान मानण्याची वृत्ति नाहींशी झाल्यानें समाजांतील स्वाभिमानवृत्तिच नाहींशी

होत आहे. आणि स्वाभिमान टिकविण्याची आवश्यकताच नाहींशी झाल्यावर तत्त्वज्ञानाची चर्चा कोणी कोणासाठीं करावयाची !

जगणें म्हणजे जीवन नव्हे. मानाने, ध्येयवादानें जगणें हें जीवन होय. अपमानानें मिळणारीं सुखें लोलुपतेने मिळवूं इच्छिणारा मनुष्य 'कर्मयोग' समजण्याला देखील पात्र नाहीं. तो केवळ पोटार्थी पामर होय. श्रेयोर्थी जीवाची अशा जीवनाकडे कधींच प्रवृत्ति होणार नाही. पुरुषार्थासाठीं ज्याला जगावयाचें त्याचें जीवन आणि केवळ सुखासाठीं ज्याला जगावयाचें त्याचें जीवन यात कधींच न मिटणारा विरोध आहे. धर्म, शास्त्र, तत्त्वज्ञान हें पुरुषार्थासाठीं आहे. गुलामांना यांची गरज नसते. मिळाल्या भाकरीचे मालक ते. मिळेल ते खाऊन आशाळभूतपणाने आणखी कसें पदरांत पडेल याची वाट पाहाणाऱ्याला ज्ञानाची कदर नाहीं, कर्माची खटपट नाही. ज्याला कांही मिळवावयाचेंच नाही त्याला काहीं घालविण्याची भीतिच नाहीं. मेल्या मनाच्या या माणसांना सत्तेची गरज नाहीं. सत्याची तळमळ नाही. त्यागाची उठाठेव अशाना कशासाठीं सुचावी !

**शब्दार्थाची भूल**

प्रपंच आणि कर्मयोग यांत दास्य आणि स्वातंत्र्य, अंधकार आणि प्रकाश इतका आत्यंतिक भेद आहे, नितात विरोध आहे. जगण्यासाठीं कोणतीहि किंमत देऊन जगणारा दुर्बल माणूस हा प्रपच करतो. पण जीवनाच्या उच्च विकासासाठी देहेंद्रियांना अखंड राबविणारा पुरुष कर्मयोग करतो. दुबळ्यांचा प्रपच. वीरांचा कर्मयोग. प्रपंच सत्य–असत्य, उच्चनीच, वर्ज्य–अवर्ज्य हा भेद मानीत नाहीं. त्यागाची भाषा त्याला रुचत नाहीं. क्लेशाची कल्पना त्याला सहन होत नाही. उलट कर्मयोग हा असत्याचा त्याग करितो, उच्चतेचा पुरस्कार करतो. क्लेशाची कमाल करून जीवनाची ध्येयें सत्यसृष्टींत प्रतिष्ठित करतो. कर्मसंन्यासी आणि कर्मयोगी हा भेद निराळा आहे.प्रपंचांत लोळणारा तो कर्मयोगी व ध्येयाचें मागें धांवणारा तो कर्मसंन्यासी ही भयंकर भूल आहे. कर्मसंन्यासी आणि कर्मयोगी हे दोघे वीर आहेत. दोघेहि पुरुषार्थी आहेत. ध्येयवादाचें वेड लागलेले, ध्येयासाठी जीवनांतील सर्व सुखांची आहुति करणारे असे ते

दोघे शूर वीर महात्मे आहेत. लोभी प्रापंचिकांनीं यापैकीं कोणत्याहि भूमिकेकडे पाहण्याची गरज नाहीं.

कर्मसंन्यासी हा जीवनातील सर्व सुखें तोडून केवळ ध्येयवादांत-ध्यानांत मग्न असतो. त्या ध्येयध्यानातून तो जीवनाची उत्तमोत्तम साध्य शिखरें शोधून आत्मसात करतो. कर्मयोगी हा ध्येयवाद आचरणांत आणण्याच्या विशाल साधनेंत व्यग्र असतो. मानवजातीला जीवनाच्या गौरीशंकरावर नेण्यासाठी राजमार्ग निर्माण करण्याचें कार्य तो करीत असतो. कर्मसंन्यासी महात्म्याच्या ध्यानानें जीवनांत उदात्त कल्पनांचे वारे सुरू होतात. कर्मयोगी महात्म्याच्या त्यागाचरणानें, सत्यसाधनानें, प्रेमसेवेनें मानवी जीवन हें दैवीजीवनाचें अंग बनून जातें. यांचा भेद केवळ तात्त्विक आहे. कर्मसंन्यासी ज्ञानी असतो. त्याचे ध्यानानेंच लोकसंग्रह होतो. कर्मयोगी ज्ञानी असतो. त्याचे कर्मानें देखील लोकसंग्रह होतो. ज्ञान, वैराग्य व आत्मानुभव यांत परिणति दोघांची सारखीच. कर्मयोगाच्या स्तुतीनें हुरळून जाऊन आपल्या प्रपंची वृत्तीलाच धन्य समजणारा मनुष्य आपली मोठीच फसवणूक करून घेतो. त्याने पक्के ध्यानांत ठेवावें कीं, आपला प्रपंच हा ' कर्मयोग ' नव्हे.

### हें पोटभरूंचें तत्त्वज्ञान नव्हे

' रामदासांनीं ' प्रपंच ' करावयाला सांगितला आहे, ' 'लोकमान्यांनी कर्मयोग' प्रशंसिला आहे, ' ' भगवान् कृष्णांनी जनकांना श्रेष्ठ ठरविलें आहे ' या वाक्यांचा वारेमाप उपयोग ऐकला म्हणजे माणसाच्या मनाच्या कोतेपणाची कीव येऊं लागते. देवाच्या सख्यत्वासाठीं सर्वहि अर्पण करून शेवटी प्राणहि वेचण्याचा उपदेश करणाऱ्या रामदासांचा ' प्रपंच ' करण्याचा उपदेश पाळणाऱ्याची धन्य होय परंतु ' नेटका प्रपंच ' करावा म्हणून सांगणाऱ्या रामदासांच्या या आधुनिक शिष्यांनीं दोन लक्ष रुपये मिळवून मग देशभक्तींत पडावें आणि संसारांत नष्टपणानें वागावें असें जरी सांगितलें तरी रामदासांनी ' नेटका प्रपंच ' सांगितला तो हा नव्हे, हें साधकाला सहज समजण्यासारखें आहे. इंद्रियनिग्रह, परमेश्वरनिष्ठा आणि अखंड शुचिता यांचा ध्यास घेतलेल्या रामदासांच्या उपदेशांत आपल्या हीन मनोवृत्तीनें दुराचार आणि स्वार्थ यांचें मिश्रण केलें तरी तें राम-

दासांच्या नांवानें कोणी ऐकून घेणार नाहीं. लोकमान्यांच्या ' कर्मयोग ' शास्त्रानें आधिभौतिक सुखवादाचें खंडन केलें आहे, हें प्रपंची मनुष्याला विसरणें सोईचें वाटलें तरी ' गीतारहस्या ' चा आधार त्याला कधींच मिळणार नाहीं. कारण कर्माचें महत्त्व लोकमान्यांनीं वर्णिलें असलें तरी निष्कामतेचें पथ्य फारच कडकपणें त्यांत सांगून ठेविलें आहे. पोटभरू माणसाचें तें तत्त्वज्ञान कधींच होऊं शकणार नाही. भगवंताच्या नांवानें शाठ्य आचरण्यास प्रवृत्त झालेल्या पामरांनीं भगवंतांच्या नांवानेंच नवनीतीचा प्रसार करणाऱ्या लैंगिक स्वातंत्र्यवादी पंथाला आपला बंधु म्हणून अवश्य जवळ करावें. भगवंतांचा गीतोपदेश या दोनहि मनोवृत्तीहून अत्यंत उच्च, शुद्ध आणि पवित्र आहे.

इंद्रियांच्या विलासांत मग्न राहणाऱ्या प्रापंचिक पामराला जीवनाचा उदात्त ध्येयवाद दाखवून त्याला संयमाच्या द्वारां स्वत:बरोबर सर्व विश्वाला सात्त्विक सुख, मानसिक आनंद, बौद्धिक शुद्धता आणि आत्मिक शांति यांची इहजन्मींच अखंड प्रतीति मिळवून देण्यासाठीं गीतेची प्रवृत्ति आहे. रामदासाचें सारें जीवन आणि मठसंस्थापन व संप्रदायचालन याच कार्यासाठी झालें. आधुनिक काळी दुर्बल झालेल्या समाजाला श्रेष्ठ पुरुषार्थाचा अंशभाक् करण्यासाठी, त्यागाला उत्सुक आणि पराक्रमाला सोत्साह बनविण्यासाठी तोच जीवनयोग लोकमान्यांनी पुन्हां प्रकट केला.

## तडजोडीनें सत्य तुटतें

या ' कर्मयोगा ' चें हें दिव्य स्वरूप समाजानें समजून घ्यावें. आपली विचारहीनता टाकावी. अन्यायांचें नृत्य समोर चाललें असतां आपल्याच क्षुद्र विलासांत मग्न राहूं नये. साऱ्या समाजालाच आपल्या जीवनध्येयाची जाणीव उत्पन्न होईल आणि सारे लोक पुरुषार्थी होतील अशी खटपट होईल तरच त्यांना ' कर्मयोग ' समजला.

प्रपंची जसा कर्मयोगी नव्हे तसेंच प्रपंची पुरुषाचें सुख म्हणजेच केवळ जगत्कल्याण नव्हे. प्रपंची पुरुषांचा ध्येयवाद व्यवहारानें रुद्ध होतो. तडजोड सुरू झाली कीं सत्य तुटतें आणि असत्य जडतें. उच्चता जाते आणि

हीनता प्रवेश करते. व शेवटीं ' प्रपंच गेला हातींचा, लेश नाही परमार्थाचा' अशी केविलवाणी स्थिति होऊन तो जीवन्मृत होऊन पडतो.

निश्चयी, धृतिमान् त्यागैकनिष्ठ असा कर्मयोगी विश्वजीवनांत आपल्या अहंकाराचा विलय करून जीवन्मुक्त होतो हे ध्यानांत ठेविलें पाहिजे.

---

# कर्मयोग आणि 'नेटका प्रपंच'

लोकमान्यांनीं केवळ कर्म करावयास सांगितले नाहीं आणि समर्थांनीं ' प्रपंच ' करावयाचा उपदेश केला नाही हें खरे असलें तरी लोकमान्यांच्या ' कर्मयोगी ' कल्पनेंत गृहस्थाचें कर्म आवश्यक मानले आहे आणि समर्थांच्या उपदेशांत संसारी पामराला ' नेटका प्रपंच ' करावयास सांगितलें आहे यांत संशय नाही. यामुळें पोटभरूपणाहून कांहीं निराळें वैशिष्ठ्य ' कर्मयोगात ' अथवा ' नेटक्या प्रपंचांत ' असलें पाहिजे हें उघड आहे.

## साधना सुलभ, सहज व रोचक हवी

अध्यात्मवाद हें एक जीवनाचे अत्यंत उच्च दर्शन आहे. मनुष्य हा त्या दर्शनाचा एक द्रष्टा आहे. प्रत्येक जीवनांत हा परम अर्थ जाणला जाऊन जीवनाची परिपूर्णता व्हावी हें अध्यात्मवादाचें म्हणणें आहे आणि तें मनुष्यजीवनाचें परिणत होणारें रूप आहे. तथापि या दर्शनाची साधना मानवी जीवनांत प्रत्येकी आणि सामुदायिकीं झाली पाहिजे. विश्वाशीं एकरूप होणें ही स्थिति ध्येयरूप असली तरी व्यक्तीच्या अधिष्ठानावरच ती उभी राहावयाची आहे. शिवाय ध्येयदर्शन पूर्ण होईपर्यंत, अनेक विरोधी कल्पनांचा गोंधळ व्यक्तीच्या हृदयांत चालू राहिलेला असतो. या सर्व गोंधळातून यशस्वितेनें बाहेर पडण्यासाठीं साधनेचा दीर्घक्रम अवलंबावा लागतो. ही साधना सामान्य माणसालाहि साधतां येईल इतकी निर्दोषी आणि सुलभ, रोचक आणि सहज असली पाहिजे. ' कर्मयोग ' अथवा 'नेटका प्रपंच' या साधनमार्गांत हीच दृष्टि राखलेली

आहे. मानवी जीवन जर साधलें तर दिव्य आनंदाचें आगर होईल आणि न साधलें तर अशांततेचें माहेरघर बनेल. शरीराचें पोषण झाल्याशिवाय मनाचें धारण होणार नाही आणि मानसिक धृतीशिवाय आत्मिक स्थिति आटोक्यांत येणार नाहीं अशी सामान्यतः परिस्थिति असल्यामुळें व्यक्तीच्या वारेमाप धांवणाऱ्या प्रवृत्तींना एकसूत्रीपणा देण्यासाठीं आवश्यक प्रवृत्तीची प्रथम ओळख करून घेण्याचा उपदेश अपरिहार्य होतो. अनेक प्रवृत्तिसमूहांतून आवश्यक प्रवृत्तींची निवड करावयास लागलें कीं, बेताल मनाला शिस्त लागत जाते. आणि मग अधिक इष्ट प्रवृत्ती कोणत्या यांचें संशोधन करावयास सवड मिळते.

## व्यक्तीला समाज सोडतां येत नाहीं

प्रत्येक व्यक्तीला अन्न, वस्त्र, शिक्षण, आरोग्य, काम, क्रीडा यांच्या प्रवृत्ती आवश्यक आणि अपरिहार्य आहेत. अर्थात् आयुष्याच्या साधनेला आरंभ करावयाचा त्यांत या प्रवृत्तींची हेळसांड करून चालणार नाही. एखादी अपवादात्मक व्यक्ति समाजाचा सर्वस्वी त्याग करून अरण्यवास करील तर केवळ वनचर पशूंप्रमाणें झाडपाल्यावर शरीर धारण करू शकेल. आच्छादनाची गरज नाही आणि कामवृत्तीचा जय झाल्यामुळें कुटुंबविषयक यातायात नाहीं अशी होऊं शकेल. तथापि जन्मापासून अशा व्यक्तीला अरण्यांत जातां येणार नाहीं. धांवण्याफिरण्याची व थोडाफार विचार करण्याची योग्यता येईपर्यंत तिला समाजांतच राहावें लागेल. इतरांच्या सेवेचा स्वीकार केल्याशिवाय केवळ स्वतःच्या प्रयत्नानें तिलाहि अगदीं प्रारंभापासून जगतां येणार नाहीं. परंतु संपूर्ण शरीराशा सोडून समाजाला सर्वथा नाकारून निघून गेलेल्या या व्यक्तीची अपवादात्मक गोष्ट वगळली तर बाकीच्या सर्व व्यक्तींना कोणत्याना कोणत्या प्रकारें समाजसंस्थेची गरज आहेच. म्हणून समाजसंस्थेचें धारण ज्यानें होईल अशा प्रकारच्या व्यक्तिजीवनाचा त्यांनीं प्रथम मार्ग शोधला पाहिजे. अर्थ आणि काम या वैयक्तिक प्रवृत्ती आहेत. यांचा समूल त्याग सर्व समाजाला एकदम करतां आला तर ठीक आहे. परंतु तो शक्य नाहीं हें दिसत असल्यामुळें त्यांची तृप्ति करणें हें न्याय्य आहे. पण प्रत्येक व्यक्ति जर आपल्या तंत्राप्रमाणेंच अर्थ, काम शोधूं लागेल तर या

व्यक्तिवादानें अर्थ-कामांची प्रत्येक व्यक्तीला आवश्यक तितकी प्राप्ति होईल काय ?

## व्यक्तिस्वार्थास समाजहिताची गरज

समाजाच्या अनेक सहस्रकांच्या अनुभवानें शहाणा झालेला इतिहास आणि त्या इतिहासानें स्थिर झालेली मनुष्यांतील व्यवसायात्मिक बुद्धि हीं या प्रश्नाला स्पष्टपणें नकारात्मक उत्तर देत आहेत. व्यक्तीला व्यक्तीचें सुख साधण्यासाठी देखील व्यक्तिवादी राहतां येत नाहीं. आपल्या सुखासाठीं देखील त्याला स्वार्थी राहून चालत नाहीं. सर्व समाजाच्या परस्पर-सहकाराशिवाय व्यक्तीला आपणांस इष्ट वाटणारी सुखें मिळत नाहींत या दर्शनानेंच व्यक्तीनें आपल्या सुखवासनेवर सामाजिक सुखाला मान्यता देण्याचें नियंत्रण शहाणपणाच्या स्वार्थानें मान्य करणें भाग आहे असें उघड होतें. हें समाजनियंत्रण कोणत्या स्वरूपाचें असावें याच्या विचारा-तून आणि प्रयोगांतून धर्मवृत्ति निघाली आहे. आणि अर्थकाम यांचा व्यापार संवादीरूपानें चालण्यासाठीं धर्मानें घालून दिलेल्या मर्यादेंतच त्यांनी वागलें पाहिजे. अर्थ आणि काम यांत अर्थाला म्हणजे शरीर-पोषणात्मक कर्मांना अधिक महत्त्व आहे. कारण शरीरच ज्याला पोसतां येत नाहीं त्याला इतर कामविषयक कल्पनांची कशी तृप्ति करतां येणार ! यासाठी उदरपोषण करण्याचे ज्ञान प्रथम मिळविलें पाहिजे. त्या ज्ञानालाहि समाजधर्माचे दृष्टीनें शुद्ध करून घेतलें पाहिजे. नाहींतर केवळ उदरपोषणहि साधणार नाही. कसेंहि करून उदरपोषण करून घेणें ही व्यक्तिवादी, प्रपंची, पोटभरू दृष्टि; ही अशास्त्रीय, अनिष्ठ, आणि अधः-पाताकडे नेणारी आहे. समाजधर्माचे दृष्टीनें शुद्ध अशा मार्गानें उदर पोषणाचा व्यवसाय करणें ही कर्मयोगाची दृष्टि. केवळ पोट भरणें याचा उद्योग तो 'कर्म' या नांवाला पात्र. समाजधर्मानें परिपूत झालेल्या मार्गानें पोट भरणें याला 'कर्मयोग' म्हणावयाचें. केवळ पोटभरूला देखील अर्थशांति आधीं करावी लागते. कामशांति त्यानंतर. परंतु पोटभरू जसा 'कर्मयोगी' नव्हे तसा प्रत्येक कामशांति करणारा 'गृहस्थधर्मी' नव्हे. अर्थसाधनेला जसें समाजधर्मानें नियत केलें पाहिजे, तसेंच काम-शांतीलाही समाजधर्माच्या नियंत्रणाखाली राहिलें पाहिजे. ज्या अर्थसाध-

नेने समाजांतील जास्तींत जास्त लोक अर्थशांति मिळवूं शकतील ती साधना उत्तम व ती प्रत्येकानें आचरली पाहिजे. त्याचप्रमाणें ज्या कामसाधनेनें समाजांतील जास्तीज जास्त व्यक्तींना कामशांति मिळूं शकेल ती कामसाधना मान्य समजून प्रत्येकानें तीच आचरली पाहिजे. अर्थकामांची व्यक्तीच्या आवश्यक प्रवृत्तींत गणना करून समाजधर्म शोधून काढणाऱ्या लोकांनीं—समाजधर्मचिंतकांनीं—जी व्यवस्था निर्माण केली असेल तो त्या काळचा समाजधर्म होय.

## समाजधर्माचा पाया कोणता ?

व्यक्तिवादी विचारसरणीचे पुरस्कर्त्यांस देखील हा समाजधर्म अथवा समाजवाद मान्य करणें भाग पडतें. सामान्यतः पोटभरू मनुष्य हा सुखवादी आणि स्वतःपुरतेंच पाहणारा असतो. त्याला त्याच्याच गृहीत कृत्यांवरून समाजसुखवादी बनण्याची आवश्यकता प्रतिपादणे हें ' कर्मयोगा 'चें पहिलें कार्य आहे. ' नेटका प्रपंच ' शिकविण्यांत समर्थांचा हाच कटाक्ष आहे. समाजांत भोळे आणि भामटे यांची जोडी समांतरपणाने आढळत असल्यामुळें भामट्यांना ओळखून काढणें आणि त्यांचें स्वरूप भोळे लोकांना उघड करून सांगणें हें एकंदर समाजाच्या फार हिताचें आहे. कोणत्याहि उच्च तत्त्वज्ञानाचा आपल्या स्वार्थाकरितां उपयोग करण्याची भामट्यांची शक्ति अवर्णनीय आहे. भामट्यांना स्वार्थ साधावयाचा तर असतोच. सुख, स्वतःचें सुख हे तर त्यांचे ध्येय असतेंच; पण आपण सुखाच्या मागें लागलो नाही हेंहि दाखवितां आलें व प्रतिष्ठा मिळवितां आली तर मिळवावी हाहि त्यांचा हेतु असतो; जें ज्या वेळीं समाजांत प्रतिष्ठित समजले जात असेल त्याचा पुरस्कार करून आपलें स्वार्थी तट्टू पुढें दामटावयाचें अशी त्यांची नीति असल्यामुळें भोळे लोक सहजच अशा भामट्यांचें भक्ष्य होतात. तथापि भोळ्यांचें अज्ञान घालवून त्यांना विचार-संपन्न बनविणें एवढेंच भामट्यांच्या विरुद्ध शस्त्र वापरणें योग्य असल्यानें ' कर्मयोग ' कल्पनेची ही स्पष्टता आवश्यक वाटते. समर्थांनीं या भामट्या लोकांचें स्वरूप तर जागोजाग उघड केलेंच आहे. पण भोळ्या व दुर्बल लोकांनीं ज्ञानी आणि बलवान् बनावें यासाठीं या सर्व लोकांना योग्य उपदेश केला आहे. पोट भरण्याची

आवश्यकता जर सिद्ध आहे तर समाजांतील सर्व घटकांना योग्य प्रकारें पोटाला मिळालें पाहिजे या तत्त्वाचा अवश्य अंगीकार केला पाहिजे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला कष्ट करून अन्न मिळविण्याची संधि मिळेल अशी समाजव्यवस्था निर्माण करणें हें समाजधर्माचें कार्य होय आणि या समाजधर्माचें नियंत्रण न मानणारी कोणतीहि व्यक्ति कितीहि बुद्धिमान आणि सामर्थ्यसंपन्न असली तरी ती 'कर्मयोगी' म्हणतां यावयाची नाहीं. समाजसंस्थेंतील प्रत्येक घटकाला आपल्या भरणपोषणाची सारखी संधि असली पाहिजे हें समतेचें तत्त्व या समाजधर्माचा पाया आहे.

## समर्थांचा 'विवेकयोग' समजून घ्या

ज्या व्यक्ती किंवा जो व्यक्तिसमूह या तत्त्वाचा स्वीकार करणार नाही तो इतराच्या या न्याय्य हक्काची पायमल्ली करणारा असल्यामुळें 'कर्म योगी' या नांवाला पात्र नाहीं. त्याचा प्रपंच विवेकानें चालला आहे अ म्हणता यावयाचें नाहीं. प्रपंच करावा म्हणून सांगणाऱ्या राम दासांनीं या दृष्टीनेंच पोटाच्या उद्योगाची तजवीज आधी करावयास सांग असतांनां 'आधीं प्रपंच करावा नेटका' असा शब्दप्रयोग केला आ 'नेटका' प्रपंच कशानें करितां येईल या प्रश्नाला त्यांनींच दिलेले उत्त प्रपंची समर्थभक्तांनी लक्षांत ठेविलें पाहिजे. 'प्रपंच मुळींच नासका' अ म्हणून तो 'विवेकें करावा नेटका' असा विवेकयोग स्पष्ट सांगित आहे. इतरांच्या जीवनाचा विचार न करितां केवळ नष्टपणानें गडग संपत्ति मिळविण्यास सांगितलें नाहीं. अर्थसाधनेंत ज्याप्रमाणें सर्व व्यक्तीं समानतेचें तत्त्व लावणें अवश्य आहे त्याचप्रमाणें कामसाधनेतही स्त्रीपु हा भेद न करतां दोघांनाहि समानतेचेंच तत्त्व लावण्याची तय ठेविली पाहिजे. अर्थसाधनेंत ज्याप्रमाणें कोणाहि एका व्यक्तीनें वर्गानें आपल्या सुखासाठीं दुसऱ्या व्यक्तीचें वा वर्गाचें शोषण करि कामा नये त्याचप्रमाणें कामसाधनेत पुरुषांनीं स्त्रीवर्गाला के आपल्या उपभोगाचें साधन म्हणून मानतां कामा नये. स्त्रीचें स्व अस्तित्व मान्य करून तिच्या आर्थिक गुलामगिरींतून तिला मुक्त पाहिजे. कोणताही पोटभरू जसा 'कर्मयोगी' नव्हे त्याचप्रमाणें प्र विवाहित पुरुष 'गृहस्थधर्मी' आहे असें समजतां कामा नये. स्त्री

आर्थिक सत्ता नसतां तिच्या वृत्तींचा संकोच करून केवळ तिच्याकडून दासीकर्म करवून घेणें हा स्त्रीवर अत्याचार आहे. स्त्री ही पुरुषाची भोग्य-वस्तु नाही. पुरुष हा स्त्रीचा स्वामी नाहीं. आदर्श गृहस्थधर्मात पुरुष हा गृहाचा स्वामी व स्त्री ही गृहाची स्वामिनी असते. या स्वामिनीपदावरील स्त्रीचा हक्क धर्मतः मान्य केल्याशिवाय ‘ गृहस्थ–धर्म ’ उत्पन्न होत नाहीं. स्त्रीचें स्वतंत्र स्थान मान्य करूनच पुरुष स्त्रीच्या स्वेच्छेनें, प्रेमानें मिळालेल्या सहकार्याने आपला जीवनधर्म पुढें नेऊं शकतो. पुरुषाला जर धर्म नसेल तर स्त्री त्याची ‘ सहधर्मिणी ’ कशी होईल ? स्त्री आणि पुरुष यांना आपापल्या धर्माची जाणीव झाल्यावर एकमेकांच्या सहकारितेनें त्यांना जीवन-धर्म आचरितां येईल. अशा प्रज्ञामती, स्वातंत्र्यवती स्त्रीला गृहिणी हें नांव सार्थ शोभेल. स्त्रीवर पुरुषाचा हक्क तर नाहीच. पण अधर्मानें वागणाऱ्या पतीला सत्याग्रहपूर्वक धर्मदर्शन करविणें हे पत्नीचें महनीय कार्य आहे. या कार्याला लायक होण्याच्या सर्व संधी तिला मिळाल्या पाहिजेत आणि या साठीं तिचें समाजातील स्वतंत्र स्थान सर्व पुरुषांनीं मान्य केलें पाहिजे.

**नेटक्या प्रपंचाचा खरा अर्थ**

अर्थकामांच्या आवश्यक प्रवृत्ती अशा रीतीनें समाजधर्माच्या समता-तत्त्वानें नियंत्रित केल्या म्हणजे मनुष्याच्या अत्यंत तांतडीच्या वृत्ती ताब्यांत येण्याची सोय होईल.तथापि मनुष्याच्या मनांत केवळ या शारीर जड वृत्तींचाच अंमल चालतो असें नाही. शरीर आवश्यक असल्यामुळें शरीराचें देणें शरीराला दिलें पाहिजे हें खरें;पण शरीराचें देणें देत असतां मनुष्याला आपल्या दुसऱ्याहि कांहीं सूक्ष्म भावनांकडे नजर द्यावीशी वाटते. प्रेम ही एक मानवी वृत्ति अगदीं उपजतच आहे. केवळ जड भोगांनीं मनाचें समाधान होऊं शकत नाही. यामुळें प्रेमाच्या प्राप्तीसाठी माणूस तळमळत असतो, आणि प्रेमपूर्तीसाठीं तो शारीरिक भोगांचा स्वेच्छेनेच त्याग करितो. इतकेंच नव्हे तर तो क्लेशांचा स्वीकार करण्यासहि तयार होतो. प्रेमवृत्तीला कुटुंब, समाज या संस्था पोषक होत जातील तर समाजधर्माचें नियंत्रण मनुष्य आनंदानें स्वीकारण्यास तयार होईल. या प्रेमवृत्तीचा परिपाक सर्व विश्वजीवना इतका होण्याची शक्यता असल्याकारणानें या विश्वरूपाशीं एकरूप होण्याची वृत्ति मनुष्यांत जी सूक्ष्मरूपानें वावरते तिला

व्यापक आणि प्रत्यक्ष रूप देणें हें समाजधर्माचें अंतिम ध्येय झालें पाहिजे. शरीराचें देणें शरीराला देत गेल्यानें जसें शरीराच्या जाचांतून मनुष्याला स्वातंत्र्य मिळत जाईल तसें प्रेमस्वरूपाचें दर्शन घेण्याचें त्याचें सामर्थ्य वाढत जाईल. या प्रेमदर्शनांत मानवी आत्म्याला अखंड शांति मिळत असल्यानें समाजधर्माचेंहि मोक्ष हें ध्येय आपल्याकडच्या संतऋषींनीं मानलेलें आहे आणि त्याचेवर दृष्टि ठेवूनच समाजधर्म सांगितला पाहिजे असा त्यांचा कटाक्ष आहे. या समाजधर्मालाच शरण जाऊन व्यक्तीनें आपला व्यक्तिधर्म निवडला पाहिजे आणि आपल्या सर्व वासनांना या धर्मानें शुद्ध करून आपल्या मोक्षाची तयारी केली पाहिजे असा या 'कर्मयोगा' चा अथवा 'नेटक्या प्रपंचा'चा इत्यर्थ आहे.

---

# गीतेचें धर्म-जीवन

**अमृतस्यैष सेतुः**

जीवनाचे दोन मार्ग आहेत. आंधळेपणानें कर्माची आवृत्ति करीत राहण्याचा दक्षिणायनं मार्ग आणि डोळसपणानें कर्म आचरून आत्म्याची अनावृत्ति प्राप्त करून घेण्याचा उत्तरायण मार्ग. पहिला मार्ग केवळ कृष्णपक्ष होय. या मार्गात जीवनध्येय अस्पष्ट होत होत शेवटी पूर्णपणें अदृश्य होतें. दुसरा मार्ग शुक्लपक्ष आहे. जीवनाचें ध्येय अधिक प्रगट होत होत शेवटीं या मार्गात तें पूर्ण आविष्कृत होतें. जीवनाच्या या द्विविध गती शाश्वत आणि सनातन आहेत. जीवन हें ऊर्ध्वगामी आहे. क्रमाक्रमाने तें उत्तर, उत्तम होत जाणें यांतच त्याची सफलता आहे, जीवन हें गतिशील असल्यामुळें त्याची ऊर्ध्व गति थांबली तर केवळ स्थितिशील न राहतां तें अधोगामी होते. या ऊर्ध्व गतीसाठी जीवनाच्या सर्व कर्मांना पुरुषार्थाशी जोडून द्यावें लागतें, नाहीं तर केवळ भ्रमण चालत राहतें व त्यामुळें जीवनाला जडता येते. जीवनाला या आवृत्तकर्मांतून

सोडविणें हें महत्त्वाचें कार्य आहे. सर्व कर्मांना केवळ आवृत्तीतून सोडवि-णाऱ्या साधनेला धर्म म्हणतात.

धर्मरहित जीवन असूंच शकणार नाहीं. जीवनप्रवृत्ति ही प्रयोजनरहित असणारच नाही. त्या प्रयोजनाच्या दर्शनाचा परिणाम जीवनकर्मांवर होणारच. हें जीवनदर्शन जितके सत्य किंवा पूर्ण असेल त्या मानानें जीवन सत्य किवा पूर्ण होईल. जीवनध्येयदर्शन म्हणजेच धर्म.

धर्माचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, साध्य आणि साधन यांची एकता सिद्ध करणें. बाह्य साधनें आणि आंतर साध्य यांच्या स्वरूपांत मेळ घडवून आणणे हें धर्माचें कार्य. जगांतील सर्व धर्मांचा सूक्ष्म विचार केला तर आढळून येतें की, धर्मांची स्थूल स्वरूपे भिन्न अथवा कांही ठिकाणीं क्वचित परस्परा विरोधी वाटलीं तरी खरी तत्त्वदृष्टि एकच आहे. साऱ्या जीवनाला ती समानतेनेंच व्यापून राहिली आहे. धर्म अनंत असले तरी धर्मतत्त्व एकच आहे.

व्यक्तीच्या जीवनांतील परस्पर विरोधांचा परिहार करण्याचें कार्य धर्माला करावयाचें असतें. व्यक्तीचा संबंध इतर व्यक्तींशी, समाजाशीं, आणि अखिल चराचर विश्वाशी येतो. व्यक्ति, समाज आणि विश्व यांच्या जीवनांतील सर्व व्यवहार शोधून ते ध्येयानुसारी बनवि-ण्याचें महनीय कार्य धर्मवृत्तीनेच शक्य आहे. आपल्या सर्व प्रवृत्तींचें अंतिम फल आत्मप्रसाद हे असले पाहिजे. यासाठीं देहाची देणी देहाला पुरविली पाहिजेत. केवळ एकांगी झाल्याने प्रसाद लुप्त होतो असा अनु-भव आहे. जीवनांत जर पूर्ण प्रसादाचा उदय व्हावा असें इष्ट असेल तर धर्माचें स्वरूपहि पूर्ण असावयास पाहिजे. सुख म्हणजे केवळ इंद्रिय-भोग नव्हे तर त्यांत मनाची तृप्ति आणि आत्म्याची शांति याचाहि समावेश झाला पाहिजे. याला पूर्ण सुख अथवा पूर्ण आनंद म्हणतां येईल. पूर्ण आनंद ज्यांत उत्पन्न होईल व अखंड राहील त्यालाच पूर्ण जीवन म्हणतां येईल. धर्माचें साध्य पूर्ण जीवन आणि पूर्ण आनंद होय. गीतेंत अशा पूर्ण जीवनाचा पूर्ण योग सांगितला आहे. इन्द्रियापासून आत्म्या-पर्यंत सर्वांची व्यवस्थिति यांत आहे. इन्द्रियांचा छळ यांत नाहीं. तथापि त्यांचा केवळ विलासहि नाहीं. मनाला मार नाहीं तथापि त्याचीच

कवळ साधना नाही. बुद्धीला गुलामगिरी नाहीं तथापि बुद्धीचीहि गुलामगिरी तेथें नाहीं. इंद्रियें मनाच्या ताब्यांत वागतात. मन बुद्धीचा निर्णय मान्य करतें. बुद्धि आत्म्याच्या प्रेरणेनें वागण्यातच कृतार्थता मानते. व्यक्तीचे हें पूर्ण जीवन. तथापि समाजाच्या पूर्ण जीवनांतच व्यक्तीला पूर्णता शक्य असल्यानें समाजजीवनाच्या पूर्णतेसाठींहि व्यक्तिजीवन व्यतीत झालें पाहिजे. व्यक्ति आणि समाज यांत विरोध असल्यास समाजाच्या पूर्ण जीवनासाठीं व्यक्तीनें आपलें जीवन यज्ञार्थ सिद्ध ठेविलें पाहिजे. समाजानें अखिल विश्वाच्या पूर्ण जीवनासाठी आपल्या कर्मांना धर्ममय बनविलें पाहिजे. धर्माने जीवनांत शुद्धता उत्पन्न होते. या एकाच कसोटीवर सर्व व्यवहार वैयक्तिक, सामाजिक घासून पाहिले पाहिजेत. कर्मांनी जर शुद्धता उत्पन्न झाली नाहीं. तर तें कर्म व्यर्थ झाले असें समजण्यास हरकत नाहीं. शुद्धतेची परम सीमा तोच परमेश्वर. या शुद्धतेचा सर्वांशानें अनुभव घेणें हीच जीवनाची इतिकर्तव्यता. आर्थिक, कामिक, राष्ट्रिक, वांशिक सर्व व्यवहारांचे अंतिम फल ही शुद्धताच होय. शुद्धतेंच साध्य सिद्ध होण्याला जीवनाच्या सर्वक्षेत्रांतील साधना केवळ शुद्धतेनेंच चालल्या पाहिजेत. ज्या मानानें साधनात शुद्धता कमी पडेल त्या मानाने साध्यात अशुद्धता उत्पन्न झाल्याशिवाय राहाणार नाहीं. धर्म म्हणजे संसारातील सर्व व्यवहारांना शुद्ध बनविण्याचा प्रयोग. आपलें सर्व ज्ञान या कर्मांना शुद्ध करण्यांत खर्ची पडेल पाहिजे. खरा लोकसंग्रह तो हाच, लोकजीवन शुद्ध करणें. स्वतःचे जीवन काय किंवा लोकसंग्रह काय हा शुद्ध साधनेनेंच चालविला पाहिजे हाच धर्माचा अखेरचा संदेश आहे. ही शुद्धता जितकी प्रत्यक्ष उत्पन्न होत जाईल तितकें आपलें जीवन निरहंकार, निर्वैर आणि निरासक्त होईल. ही बुद्धि ज्याच्या चित्तांत उत्पन्न झाली त्याला संयम सहजसाध्य होतो. आणि महत्कार्यें करण्याला लागणारी बुद्धि, धृति आणि उत्साह याची उणीव भासत नाहीं.

धर्मवृत्तीनें संसाराचें स्वरूप पालटून जातें. पानांची पत्री होते, पाण्याचें तीर्थ होतें, अन्नाचा प्रसाद बनतो. कर्म हा यज्ञ होतो. आणि साधन हेंच साध्य होतें. दुःखांची तीव्रता नाहीशी होते. जीवनाचा भार वाटत नाहीं आणि जन्ममृत्यूंच्या खेळांतहि अमृतत्वाचा आस्वाद मिळूं लागतो.

पूर्ण जीवनाचा हा महान् पूर्णयोग भगवंतांनीं गीतेंत आकर्षक आणि उत्साहवर्धक भाषेंत मांडला आहे. समाजाच्या पुनर्घटनेच्या या कोलाहलाच्या कालांतहि आपणाला मार्गदर्शक होण्याचें सामर्थ्य त्यांत खचित आहे. गीताजयंतीच्या निमित्तानें आपण हा योग समजून घेऊन आपल्या उद्योगांत अधिक शुध्दता आणण्याचा प्रयत्न करूं या,

---

# समर्थांचें स्मरण

समजले आणि वर्तले । तेचि भाग्य–पुरुष झाले ॥

काल दास–नवमीचा उत्सव महाराष्ट्रांत साजरा झाला. महाराष्ट्राच्या भाग्य–पुरुषांच्या प्रभावळीत समर्थांची मूर्ति आपल्या तपस्या-तेजानें अखंड तळपत राहिली आहे. शंकराचार्य आणि विद्यारण्य या पूर्वकालीन ऋषींशी आणि दयानंद आणि विवेकानंद या आधुनिक तपस्व्यांशी समर्थांचे विलक्षण साम्य आहे. तपश्चर्येचें तेज, विद्येचें वैभव, धर्मरक्षणाची कळकळ आणि संघटनेचें कौशल्य या गुणानीं भरतभूमींत त्यांनीं आपल्या कार्याचा विशिष्ट ठसा ठेवून दिला आहे. समर्थाच्या विचारसृष्टीत तीन गोष्टी महत्त्वाच्या आहेत. अद्वैत ज्ञान, चातुर्वर्ण्यपालन, उपासना. या तीन सिद्धान्तावर त्यानीं आपल्या संप्रदायाची उभारणी केली. ज्ञान–कर्म–भक्ति यांचा एकत्र योग त्यांनीं आचरिला आणि आग्रहाने त्याचा उपदेश केला. ढोंगी वेदान्ती, आळशी परमार्थी आणि करंटे प्रपंची यांच्या स्वरूपाचें कठोर शब्दांनीं आविष्करण करून प्रत्ययाचें ब्रम्हज्ञान उपासनेचा गजर, सावधपणाचा संसार यांचा सर्वत्र प्रसार केला. समर्थांचें जीवन–कार्य धर्म–संस्थापन हेंच होतें. सर्व समाजांतील प्रवृत्तींची पुरुषार्थाशी जोड घालून देण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. शंकराचार्यांप्रमाणेंच ‘ ब्राह्मणत्वाच्या रक्षणानें वैदिक धर्माचें रक्षण होते ’ असे समर्थांचें मत होतें. त्या काळच्या परिस्थितीप्रमाणें समाजांत ब्राह्मण आणि क्षत्रिय यांनाच महत्त्व होतें. भगवद्गीतेच्या कालापासून पुण्य

ब्राह्मण आणि भक्त राजर्षी यांनींच समाजाचें धारण-पोषण चालविलें होतें. चातुर्वर्ण्याची संस्कृति टिकविण्यास याच दोन वर्णांनीं परस्परसहकारितेनें आणि धर्मवृत्तीनें वागण्याची आवश्यकता होती. वैश्य, शूद्र आणि चातुर्वण्याबाहेरचे पापयोनि मानले गेलेले कांहीं वर्ग यांच्या आणि स्त्रियांच्या उन्नतीसाठीं भागवत धर्मानें विशेष त्वेषानें प्रेमाचें, समतेचें निशाण उभविलें होतें आणि त्यांच्या दास्यविमोचनाची त्वरा चालविली होती. ब्राह्मण आळशी आणि क्षत्रिय लोभी झाला की समाजाचा तोल नष्ट होई. तपस्वी पण सेवारत असे ब्राह्मण आणि पराक्रमी पण धर्मपरायण असे क्षत्रिय उत्पन्न होण्यांतच त्या संस्कृतीचा उत्कर्ष होता. म्हणून वेदकालांतील अद्वैत, स्मृतिकालांतील चातुर्वर्ण्य आणि पुराणकालांतील उपासना या तीनहि साधनाचा योग्य समन्वय साधून त्या वेळचे समर्थ पुरुष समाजाची सु-स्थिति राखण्याचा प्रयत्न करीत. समर्थांनींहि याच तत्त्वांवर आपला महाराष्ट्रधर्म उभारला. समर्थ आणि शिवाजी यांच्या ध्येयदृष्टींत एकत्व असल्यामुळें महाराष्ट्रधर्म महाराष्ट्रांत प्रभावी झाला आणि परचक्रापासून त्यांचें रक्षण झालें. महाराष्ट्राच्या इतिहासांत समर्थ-शिवाजीची जोडी अभेद्य झाली आहे.

समाजांतील सर्वसाधारण लोकांना नेहमींच मार्गदर्शकाची गरज असते. समाजाला आवश्यक वृत्तींचें शोधन करण्यासाठीं केवळ समाजहिताच्याच दृष्टीनें या कार्याला वाहून घेतलेल्या वर्गाची आवश्यकता असते. हा वर्ग सर्व प्रकारच्या भौतिक ज्ञानांत निष्णात असला पाहिजे आणि त्या ज्ञानाचा उपयोग समाजहितासाठींच करावयाचा अशा धर्म-प्रतिज्ञेनें तो बद्ध असावयास पाहिजे. समर्थांच्या महंतांची व त्यांच्या मठांची कल्पना अशीच होती. परमार्थ विचारानें आपल्या वैयक्तिक वासनांचा लय केल्यानंतर समाज-हितासाठीं समुदाय करून, आपल्या शुद्ध आचरणानें समाजांतील अज्ञजनांना शाहाणे करीत महंतानें आपलें जीवन घालवावें असा त्यांचा दंडक होता. महाराष्ट्रांतील इतर साधुसंतांपेक्षां समर्थांचा विशेष या समुदाय-संदेशांतच आहे. ब्रह्मज्ञान आणि उपासना यांचा संदेश सर्व संतांनीं आपल्या आचरणानें जनतेला दिला. आपापल्या कर्माबद्दल अभिरुचि त्यांनीं उत्पन्न केली. तथापि समाजरक्षणासाठीं अखंड शोध

करणारे महंत निर्माण करून त्यांचे आश्रम महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेर सर्वत्र स्थापण्याची समर्थांची कल्पना विशेष महत्त्वाची व समाजसंघटनेच्या दृष्टीनें अधिक मोलाची होय. या महंतांनीं आपल्या तपश्चर्येच्या बळावर वेळीं उन्मत्त झालेल्या क्षत्रियांनाहि धर्ममार्ग दाखविण्याचें काम करावयाचें. आपल्या शुद्ध आचरणानें लोकांमध्यें सदाचरणाचा उत्साह उत्पन्न करावयाचा. आपल्या वैराग्यानें लोकांतील लोभवृत्तीला लगाम बसेल अशी व्यवस्था राखावयाची. समर्थांनीं या महंतांना चारित्र्य, निग्रह आणि सेवा यांची मोठी कडक शिस्त लावून दिली होती. समर्थ आणि शिवाजी यांच्यामागून या तत्त्वांचा परिपोष करण्याची शक्ति राष्ट्रांत उरली नाहीं आणि यामुळें पाश्चात्यांच्या रेट्याखालीं हिंदुस्थानचा चुरा झाला.

आजच्या अनुभवानें मागच्या इतिहासाकडे पाहूं लागलें म्हणजे वाटतें कीं, युरोपांत उत्पन्न होणाऱ्या नव्या संस्कृतीची कल्पना आमच्या ज्ञात्यांना वेळींच झाली असती तर भारतीय समाजाला वेगळेंच वळण मिळूं शकलें असतें. युरोपांत भौतिक शक्ति उत्पन्न होत होती. पण त्याचे आधीं तेथें व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिवाद आणि समता यांचा प्रत्यक्ष समाजरचनेंत प्रवेश करून देण्याचा जोराचा प्रयत्न चालला होता. या नवीन कल्पनांनी प्रेरित होऊन उत्साहाने युरोपांतील लोक सर्व जगावर आक्रमण करीत निघाले आणि आंधळेपणामुळें, भोळेपणानें आमच्या मोठमोठ्या ज्ञात्यांच्या प्रयत्नातहि भयंकर अज्ञान राहून गेलें. आमच्या ज्ञात्यांच्या अज्ञानाचा परिणाम आज आपण भोगीत आहों. युरोपीय लोक हिंदुस्थानांत घुसत असताहि आमचे समर्थ भागवतांतील भूवर्णनांतच संतुष्ट होते आणि परमेश्वराचे पुढे सर्व लेंकरें सारखींच असें म्हणत असतांहि सामाजिक भेदाचा तीव्रतेनें पुरस्कार करीत होते ही गोष्ट समर्थांचे सामर्थ्य कमी करणारी खरीच.

आज समर्थांच्या स्मरणकालीं त्यांचा वैराग्याचा, शुद्धतेचा, समाजहित-चिंतनाचा, सामर्थ्याचा संदेश आपण घेतांना तो या ऐतिहासिक दृष्टीनें पारखून शुद्ध करून, वाढवून घेतला पाहिजे. नाहींतर शब्दप्रामाण्यानें

वागून समर्थांच्या उणीवांचाहि जर आपण आग्रह धरिला तर जीवनाच्या संग्रामांत आपलें निशाण अचल राखणें शक्य होणार नाहीं.

थोरांच्या विचारांतील सत्याचा अंशच सनातन म्हणून स्वीकारावयाचा असतो. त्यांचें अपूर्णत्व कालानें विफल केल्यानंतर त्याचा आग्रह धरून आपलें हंसें व त्यांची विटंबना करण्यांत औचित्य काय !

---

# आजचा महाराष्ट्र-धर्म

पहिलें हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ॥
तिसरें तें सावधपण । सर्वविषयीं ॥ श्रीसमर्थ.

## रामदासांच्या संघटनेचें स्वरूप

महाराष्ट्र धर्माचे प्रवक्ते श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं आपल्या दासबोध ग्रंथांत महाराष्ट्र धर्माचीं तीन तत्त्वें सांगितलीं आहेत. ईश्वरोपासना, स्वराज्यसाधना आणि जीवनाच्या सर्व क्षेत्रांत अखंड सावधानता हीं तीं तीन तत्त्वें होत. या तीन तत्त्वांचा महाराष्ट्र धर्म बनतो. या महाराष्ट्र धर्माचें सतराव्या शतकांत महाराष्ट्रांतील लोकांनीं निष्ठापूर्वक आचरण केल्यामुळें महाराष्ट्राचें त्या वेळीं आनंदभुवन बनून गेलें. महाराष्ट्र-धर्म हा केवळ व्यक्तीच्या अभ्युदयाचा अथवा आध्यात्मिक मोक्षाचा मार्ग नव्हे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीचा अभ्युदय साधून सामाजिक निःश्रेयस निर्माण करण्याचें ते अनुभवसिद्ध शास्त्र आहे. महाराष्ट्र-धर्म महाराष्ट्रा पुरता मर्यादित नाहीं. तो सर्व मानवजातीला उपयोगी पडणारा विश्वधर्म आहे. सर्व हिंदुस्थानांत परकीयांच्या आक्रमणाखालीं हिंदु समाज चिरडून गेला असतां महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांनीं आपल्या श्रद्धेच्या आणि त्यागाच्या जोरावर तत्कालीन समाजाची पुनर्घटना घडवून आणिली. इतर प्रांतांत अभ्युत्थानाची आशा नष्ट झाली असतां त्या काळीं महाराष्ट्रीय लोकांव

आशावाद जागृत होता. यामुळें महाराष्ट्राला जागृत करण्यासाठीं महाराष्ट्र-धर्म अशी शब्दयोजना झाली. ‘ मराठा तितुका मेळवून महाराष्ट्र-धर्म वाढविण्या ’चा उपदेश करण्यांत समर्थांचा इतरांवर आक्रमण करण्याचा हेतु नव्हता. समाजाच्या विकासाला आवश्यक अशा सर्व संस्थांचें संघटन करून सर्वत्र रामराज्य प्रस्थापित व्हावें एवढीच त्यांची मनीषा होती. पाप्यांचा लोप झाल्यानंतर स्नानसंध्या करण्यासाठीं ‘ उदंड पाणी ’ उरावें इतकीच त्यांची वैयक्तिक अपेक्षा होती. महाराष्ट्रधर्म म्हणजे सर्वांगपरिपूर्ण हिंदुधर्म होय.

## हिंदूंची वर्णव्यवस्था

हिंदुधर्मांतील विचारकांनीं समाजधारणेला आवश्यक असलेल्या सर्व संस्थांचा विचार केलेला आहे. अध्यात्म हेच हिंदुधर्माचें सर्वस्व असल्यानें हिंदु-धर्मांतील सर्व संस्थांची उभारणी आध्यात्मिक भूमीवर करण्यांत आलेली आहे. समाजधारणेसाठीं राजसत्तेची गरज असते हा विचार भारतीयांच्या अत्यंत प्राचीन ग्रंथांतहि आढळतो. राजसत्ता नसेल अथवा ती समाजधर्मानुसारिणी असणार नाहीं तर समाजाचा अधःपात झाल्याखेरीज राहात नाहीं. हें भारतीय तत्त्ववेत्त्यांच्या नेहमी लक्ष्यांत असे. महाभारतांत राजसंस्थेची आवश्यकता सर्वत्र प्रतिपादिली आहे. ‘ राष्ट्रस्य यत् कृत्यतमं राज्ञ एवाभिषेचनम् ’। (राजाला अभिषेक करणें हेंच राष्ट्राचें प्रधान कर्तव्य आहे. ) ‘ राजानम् प्रथमं विंदेत् ततो भार्यां ततो धनम् ’। ( आधीं राजा निर्माण करावा, नंतर विवाह अथवा संपत्ति-साधन यांकडे लक्ष्य द्यावें. ) अशा प्रकारचीं शेंकडों वचनें आढळतात.राजसंस्था असल्याशिवाय समाजांत कोणतीच व्यवस्था नांदू शकत नाहीं. यासाठीं समाजांतील सर्व व्यक्तींनीं राजसंस्था निर्माण करण्यासाठीं प्रथम खटपट केली पाहिजे. राजसंस्थेसाठीं राजकारणधुरंधर मुत्सद्दी आणि समाजकंटकांचा निग्रह करण्यास समर्थ असें रक्षकदल यांची गरज असते. मुत्सद्यांचें बुद्धिबल आणि रक्षकांचें बाहुबल हीं एकत्र झालीं असतां त्यांचें सामर्थ्य विलक्षण विशाळतें. आणि लोकसंरक्षणाऐवजीं लोकसंहार होतो. यासाठीं राजसंस्था ही निष्काम बुद्धीच्या मुनिवर्यांच्या तपोबलाखालीं वांकणारी असली पाहिजे असा भारतीय शासनशास्त्रांतील महत्त्वाचा सिद्धांत आहे. पुण्य ब्राह्मण

आणि भक्त राजर्षी यांच्या संयुक्त नेतृत्वाखालीं प्राचीन काळीं हिंदुस्थानांत सर्व प्रकारचे मानववंश सुखासमाधानानें एकत्र नांदत असत. त्या काळीं संपत्तीचें उत्पादन व्यक्तिगत असल्या कारणानें निरनिराळे धंदे निरनिराळ्या जातींनी वंशपरंपरागत रीतीनें वाटून घेतले होते. समाजांत स्वार्थामुळें जी विषमता उत्पन्न होई तिचा प्रतिकार करण्यासाठीं साधुसंत समतेच्या चळवळी करीत. या साधुसंतांना शासनसंस्थेचा पाठिंबा मिळे. यामुळें कित्येक सहस्रकेंपर्यंत हिंदूंची समाजव्यवस्था सुरळीतपणें चालली होती. या व्यवस्थेला चातुर्वर्ण्य असें नांव होतें. व्यक्तिगत जीवनासाठीं चतुर्विध आश्रमांची धर्मकारांनीं व्यवस्था लावून दिली होती. वर्णव्यवस्था आणि आश्रमव्यवस्था यांच्या सम्यक्पालनानें व्यक्तीचें सामाजिक आणि वैयक्तिक जीवन सफल होत असे.

### वर्णव्यवस्था ढिली झाली

कालमानानें या दोनहि व्यवस्था शिथिल होत गेल्या.समाजांत अग्रस्थान भोगणाऱ्या ब्राह्मण–क्षत्रिय वर्गांची स्वार्थपरायणता वाढून समाजव्यवस्था भंगून गेली आणि परकीय लुटारू रानटयांच्या हल्ल्याखालीं हिंदुस्थानांतील लोक चिरडून गेले. महाराष्ट्रांतहि देशपांडे कुलकर्ण्यांचीं वतनें मिळविण्यांत आणि वर्णगुरुत्वाचा टेंभा मिरवून सामान्य-जनतेला तुच्छ लेखण्यांत ब्राह्मणांचा आणि परकीय सरकारच्या सरदारक्या मिळवण्याच्या व पाशवी बलाच्या जोरावर सामान्यजनतेला भरडून काढण्याच्या कामांत क्षत्रियांचा काल जात होता. राजसत्तेचा जुलूम आणि दुष्काळादि अस्मानी–सुलतानी यांच्याखालीं बेजार झालेल्या भोळ्याभाबड्या लोकांना सुशिक्षित आणि धैर्यसंपन्न करण्याचें कार्य महाराष्ट्रातील संत मंडळी तीन चार शतकें करीत होती. या संतांनीं समाज–घटनेचें मोठें कार्य घडवून आणलें.

### संतांची कामगिरी

सामाजिक उच्चनीच भेदांची तीव्रता कमी करून सर्व लोकांत बंधुभावाची त्यांनीं वृत्ति जागृत केली. स्वधर्माचा, स्वसंस्कृतीचा व स्वभाषेचा अभिमान यांचें संवर्धन केलें.या संत मंडळांतील शेवटचे श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं या धर्मकार्याला समाजाच्या सर्वांगीण संघटनेचें स्वरूप दिलें. संतांप्रमाणेंच महाराष्ट्रांतील क्षत्रिय वीरांतहि स्वराज्य संस्थापनेची तळमळ

निर्माण झाली होती. अनेक स्थित्यंतरांतून श्रीशिवाजीमहाराजाच्याकालीं त्या चळवळीला मोठें स्वरूप आलें. समर्थांनी भारतीयांचा प्राचीन समाजधर्म अत्यन्त परिश्रम पूर्वक पुनरुज्जीवित करण्यासाठीं सर्वत्र मठस्थापना केली. स्वराज्य स्थापन करणाऱ्या पुरुषाची महाराष्ट्रांतील लोक उत्कंठेनें वाट पाहात होते. शिवरायांचा उदय झाल्याबरोबर आपलें धर्मजीवनाचें कार्य सफल होणार या कल्पनेनें ' महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं तुम्हांकरितां ' असा समर्थांनीं शिवरायांचा जयजयकार केला. समर्थांच्या हयातींत महाराष्ट्र-राज्य प्रस्थापित झालें. याच तत्त्वाचा सर्व हिंदुस्थानांत विजय व्हावा या हेतूनें ' महाराष्ट्र-राज्य जिकडे तिकडे करण्याची ' शंभू छत्रपतीला त्यांनी प्रेरणा दिली. हाच महाराष्ट्र-धर्म होय. या महाराष्ट्रधर्मामुळें महाराष्ट्राप्रमाणेंच सकल हिंदुस्थानचें संजीवन व्हावयाचें होतें. परंतु इतर प्रांतांतील लोकांच्या अंगीं स्वराज्य स्थापण्यास लागणारे एकजूट, पुढारी-पण, चिवटपणा इत्यादि उदात्त गुण नसल्यामुळें महाराष्ट्राबाहेर स्वराज्य-स्थापना स्वतंत्रपणानें होऊं शकली नाहीं आणि मराठयांनीं आपल्या सत्तेचे जाळे सर्व हिंदुस्थानभर पसरविण्याचा प्रयत्न केला. त्यांत महाराष्ट्रधर्माची दृष्टि सुटून केवळ स्वार्थी साम्राज्यशाही वृत्तिच बळावली. यामुळें हिंदुस्थानांत हिंदूंचें स्वतंत्र संयुक्त राज्य होऊं शकलें नाहीं. स्वजनद्रोह, स्वार्थपरायणता, राष्ट्रीय दृष्टीचा अभाव, आधिभौतिक ज्ञानांतील मागासलेपणा आणि संयुक्त राज्यतंत्र निर्माण करण्याच्या अकले-चा अभाव इत्यादि दोषामुळें पाश्चात्यांच्या आक्रमणाला हिंदुस्थानला बळी पडावें लागलें.

## इतिहासापासून बोध

महाराष्ट्रांत गेल्या पन्नास वर्षांत सुशिक्षितांचें ' महाराष्ट्रधर्म ' या कल्पनेकडे लक्ष गेलें आहे. आजहि महाराष्ट्रीय मनाला महाराष्ट्रधर्माची मोहिनी वाटते. महाराष्ट्रधर्म ही एक अद्‌भुत शक्ति आहे यांत शंका नाहीं; परंतु ती एक ऐतिहासिक कल्पना आहे. इतिहासापासून बोध घ्यावयाचा म्हटला तरी तो केवळ सामान्य स्वरूपांतच घेतला पाहिजे. इतिहास हा काळ, स्थल, व्यक्ति यांनीं मर्यादित झालेला असल्यामुळें ऐतिहासिक घटनेचा त्याग करून त्यांतील सनातन तत्त्वाचाच स्वीकार केला पाहिजे. ही मर्यादा

न ओळखतां इतिहासाचा उपयोग करूं लागल्यास आपल्या जीवनाला प्रेरित करण्याऐवजीं तो आपला जीवनाश करील. महाराष्ट्रधर्म या कल्पनेतील ऐतिहासिक मर्यादा टाकून आपणांला त्यांतील सनातन तत्त्व अवश्य घेतां येईल. समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें अध्यात्म, स्वातंत्र्य आणि सावधानता या तीन तत्त्वांची आजहि आपणांला उपयुक्तता आहे. इतकेंच काय, पण या तीन तत्त्वांचा सर्व जगाला उपयोग आहे. अध्यात्म हें सर्व धर्मांचें सर्वस्व होय. त्याच्या अनुभूतीसाठीं परोक्ष वा अपरोक्ष जीवनाची धडपड चाललेली आहे. या आध्यात्मिक अनुभवासाठींच जीवनांतील सर्व संस्थांची उभारणी झाली पाहिजे. अध्यात्म ही आंतर अनुभवाची आणि बाह्य सदाचाराची गोष्ट आहे. असत्य, हिंसा, परस्वापहार, भोगलोलुपता, द्वैत आणि मत्सर यांचा त्यांत कांही संबंध नाही. या अनुभवासाठीं समाजांतील सर्व व्यक्तींना आपल्या विकासाचे न्याय्य मार्ग उपलब्ध झाले पाहिजेत. यासाठीच राजकीय स्वातंत्र्य आणि आर्थिक समता यांची गरज आहे यामुळें आपल्या उद्धारासाठीं आपण सर्वांनीं महाराष्ट्रधर्माचा अवलम्ब केला पाहिजे. हिंदुस्थान निद्रित असतांना महाराष्ट्र जागृत झाला. त्यानें जागृत होऊन इतरांना जागृत करण्याचा शक्यतों प्रयत्न केला हा इतिहास आपणांस भूषणावह आहे. आज विसाव्या शतकांतील परिस्थिति अधिक भीषण झाली आहे. आपलें राजकीय स्वातंत्र्य नष्ट झालें आहे एवढेंच नव्हे तर आपल्याला आर्थिक दास्य प्राप्त झालें आहे. मनुष्य म्हणून जगावयाचें असेल तर आपणांस या आर्थिक आणि राजकीय गुलामगिरींतून मुक्त झालें पाहिजे. यासाठी आपणांला कर्तृत्वान पुरुषाचें एकीकरण घडवून आणलें पाहिजे. महाराष्ट्रधर्मांत 'मराठा तितुका मेळवावा' असा उपदेश आहे. लोकहितबुद्धीनें स्वातंत्र्यासाठी अखंड झुंज घेणारा तो मराठा. मराठा शब्द जातिवाचक नसून वृत्तिवाचक आहे. स्वातंत्र्याच्या वृत्तीनें भारला गेलेला प्रत्येक वीर मराठाच समजला पाहिजे. आजचा प्रश्न केवळ हिंदूंच्या रक्षणाचा नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व हिंदी प्रजेच्या रक्षणाचा प्रश्न आहे. यामुळें आजच्या महाराष्ट्रधर्मांत मुसलमानांचा द्वेष अथवा प्रतिकार येऊं शकत नाहीं. हिंदी प्रजेच्या स्वातंत्र्याचें रक्षण झाल्यानंतरच हिंदुस्थानांतील सर्व धर्मांचें रक्षण होणार आहे. स्वातंत्र्यप्राप्तीच्या आधीं धर्मरक्षणाच्या

गोष्टी व्यर्थ आहेत. व्रतें, उद्यापनें, पूजाअर्चा, नामस्मरण, असल्या किरकोळ वैयक्तिक धर्मांनें आपला मोक्ष समीप येणार नाहीं. त्यासाठीं समुदाय संघटना करून सामाजिक जीवनाची पुनर्घटना केली पाहिजे. यासाठीं स्वातंत्र्याच्या निशाणाखालीं सर्वांनीं गोळा झालें पाहिजे हें स्वातंत्र्य साधुसंतांनीं प्रकट केलेल्या अध्यात्मबलावरच मिळविलें पाहिजे अशी आजच्या जगाची परिस्थिति झाली आहे. विज्ञानाच्या सामर्थ्यावर हिंस्र शक्ति इतकी पोसली आहे, मुत्सद्दी आणि शास्त्री हे शस्त्रबलानें इतकें धुंद झाले आहेत कीं, सामान्य जनतेनें या शस्त्रबलाचा परिणामकारक निषेध केल्याशिवाय तिला सुखासमाधानानें जगतां येणार नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणांत वसत असलेल्या परमेश्वरी प्रेरणांना जागृत करून सृष्टींतील हा सैतानी खेळ थांबविला पाहिजे. या महान धर्मकार्याला बुद्धिमत्तेची, श्रद्धेची, त्यागाची आणि प्रेमाची जरूरी आहे. आजच्या महाराष्ट्रधर्मांचें हेंच स्वरूप असलें पाहिजे.

### महाराष्ट्र धर्माचरणानें परंपरा राहील

महाराष्ट्रधर्म याचा आणखी एक अर्थ होतो. राष्ट्रधर्माहून मोठा तो महाराष्ट्रधर्म. राष्ट्रधर्मांच्या नांवाखालीं पाश्चात्यांनीं जगाची नासाडी चालविली आहे. हिंदुस्थानानें स्वतंत्र होतांना असल्या संकुचित राष्ट्रधर्माचा स्वीकार करितां कामा नये. युरोपांतील राष्ट्रधर्माला जर्मनी, इटली इत्यादि देशांतून जें आसुरी स्वरूप आलें आहे त्याचा तर आपण तीव्रतर धिक्कार केला पाहिजे. राष्ट्र म्हणजे केवळ श्रीमंत, बुद्धिवंत, सामर्थ्यवंत लोकांची मिरास नव्हे. राष्ट्रांतील गोरगरीब जनता सुशिक्षित, संपन्न आणि सुखी होईल तोच खरा राष्ट्रधर्म. महाराष्ट्रधर्मांत बुद्धिवान लोकांनीं निर्बुद्धांना ज्ञानदान केलें पाहिजे. श्रीमंतांनीं आपली संपत्ति गरिबांच्या विकासाकडे वेचली पाहिजे. समर्थांनीं आपलें सामर्थ्य दुर्बलांच्या रक्षणासाठीं उपयोगांत आणलें पाहिजे. अशा महाराष्ट्रधर्माचे उपासक महाराष्ट्रांत निर्माण होतील तर आपली परंपरा आपण राखली असें होईल. या महाराष्ट्र धर्माची दीक्षा महाराष्ट्रीयांनी हिंदुस्थानांतील लोकांना देण्याची उमेद बाळगली पाहिजे. निदान हिंदुस्थाननें स्वीकारलेल्या राष्ट्रधर्मापेक्षां महाराष्ट्रधर्माचें स्वरूप संकुचित असतां कामा नये.

# धर्मविचारांत क्रांतीची घोषणा

## महाराष्ट्रांतील सुधारक पंडितांची कामगिरी

गेल्या महिन्यांत नगर येथें स्वामी केवलानंद ( नारायणशास्त्री मराठे ) यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्रांतील तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी धर्मपंडितांची परिषद झाली. तिने मान्य केलेलें ठराव प्रसिद्ध झालेच आहेत. या परिषदेनें रूढधर्म–विचारांत मोठीच क्रांति होईल असें आपलें धोरण ठरविलें आहे. धर्मनिर्णयामध्यें केवळ शास्त्रवचनांनाच प्रामाण्य असेंत अशी आज समाजांतील पुष्कळ लोकांची समजूत आहे. वेदापासून धर्मसिंधूपर्यंत सर्वच वचनें सारखीच प्रमाण मानून आजच्या सामाजिक व्यवहारांचें नियमन करावें असें म्हणणारा सनातनी पक्ष आहे. या पक्षाला जुने ग्रंथ-पंडित आणि सामान्य अज्ञानी जनता यांचा आधार आहे. सनातनधर्म या नांवाखालीं समाजांतील एकूण एक रूढींचे समर्थन करण्याची या पक्षाची पद्धति आहे. संस्कार लोपले, वर्ण नाहींसे झाले, धंदे बुडाले, आचाराला अर्थ राहिला नाहीं तथापि प्रत्यक्षाकडे डोळेझांक करून ' धर्म ' शब्दाचा जप करून आणि प्रगतीला आणि प्रयत्नाला विरोध करून आपण मोठी धर्मसेवा करीत आहों असा यांचा भ्रम आहे. ऐहिकाची सर्व आशा नष्ट झाल्यामुळें यांचा धर्म केवळ परलोकाचा विषय बनला आहे. व्यवहाराशीं फारकत झाल्यामुळें तत्त्वाना आधार उरलेला नाहीं. अशावेळीं धर्माचें खरें स्वरूप लोकांच्यापुढें मांडणें हें अवश्य झालें आहे.

### श्रद्धा आणि विवेक यांची जरूरी

या सनातनी पक्षाच्या विवेकहीनतेमुळें बुद्धिमान नवशिक्षितांचा एक वर्ग धर्माचा तिरस्कार करण्यास प्रवृत्त झाला असून धर्मविचारांचा वैरी झाला आहे. धर्मामध्यें बुद्धीला वाव नाहीं तर बुद्धीमध्यें धर्माला वाव नाहीं असा विरोध निर्माण झाला आहे. बुद्धि आणि धर्म यांचा विरोध सत्य असेल तर धर्मभोळेपणा अथवा नास्तिकता यांपैकीं एकाची निवड

करावी लागणार. पण जीवनाशीं या दोहोंचाहि मेळ बसत नाहीं. मांगल्याच्या श्रद्धेशिवाय जीवनांत समाधान मिळणार नाहीं. श्रद्धेला विवेकानें तपासून घेतल्याशिवाय जीवनांतील जडता नाहींशी होणार नाही. श्रद्धा आणि विवेक यांच्या आधारानेंच जीवनाची यात्रा सफल होऊं शकेल.

आध्यात्मिक सत्यें सामाजिक न्यायरूपानें परिणत झाल्याशिवाय संसाराला संस्कृतीचें रूप लाभत नाही. सामाजिक व्यवहार हा तत्त्वांपासून जितका दूर जाईल तितकीं तत्त्वें आभासरूप होतात. सामाजिक व्यवहाराचा आध्यात्मिक अनुभवाशी वाढता मेळ घालून देण्याचें काम धर्मविचारकांचें आहे. अलीकडे कित्येक शतकें सामाजिक व्यवहाराची आपण हेळसांड होऊं दिली आहे. यामुळें आज व्यवहाराचा धर्मशास्त्रांशी काहींच संबंध उरलेला नाही. बुद्धिवंतांना ही उणीव दिसून आल्यापासून त्यानी आपल्या रूढ विचाराविरुद्ध बंड सुरू केले. आजच्या आकांक्षा पुऱ्या करण्याचें सामर्थ्य आजच्या समाजपद्धतींत उरलें नाहीं. यामुळे समाजसुधारकांनीं आपल्या समाजपद्धतीवर चौफेर हल्ला चालू केला. नवीन धर्मग्रंथ निघाले. अज्ञेयवादी विवेकवादाचा पुरस्कार करूं लागले. आपली संस्कृति सुधारली पाहिजे असें प्रतिपादन चालू झालें.

### गीतारहस्यानें दिलेली नवी दृष्टि

गेल्या शतकांतील विचारमंथनाचा समन्वय म्हणून लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्य निर्माण केलें. गीतारहस्यांत सामाजिक उन्नतीला अवश्य असणारें तत्त्वज्ञान मांडण्यांत आलें आहे. मुक्तीवरचा एकांतिक भर काढून टाकून मुक्तीच्या शेजारीं लोकसंग्रहाला जागा करून देण्यांत आली आहे; आणि हें तत्त्वज्ञान आपल्या प्राचीन धर्मांशी विरोधी तर नाहींच पण आपल्या सर्व विचारपरंपरेचा हाच खरा अर्थ आहे, असें अत्यंत परिश्रमपूर्वक सिद्ध केलें आहे. गीतारहस्यानें जुन्या समाजाला नवीन प्रश्नांकडे पाहण्याला उद्युक्त केलें. तथापि सामाजिक व्यवहारांत स्वतंत्रपणें कसा विचार करावा याच्या तपशीलाची चर्चा त्यांत येण्यासारखी नव्हती. तें कार्य—नागपूर येथील विद्वद्रत्न केशव लक्ष्मण दप्तरी यांनी आपल्या ‘धर्मरहस्यां’त केलें आहे. वेदांत्यांची कोंडी फोडून अध्यात्मज्ञानाला लोकसंग्रहाशीं जोडून देण्याचें कार्य जसें गीतारहस्यानें केलें त्याचप्रमाणें

मीमांसकांची कोंडी फोडून धर्मविचाराला ऐहिक अभ्युदयाशीं जोडून देण्याचें कार्य धर्मरहस्यानें केलें. धर्मरहस्याच्या प्रसिद्धीच्या वेळेला त्यांतील सिद्धान्तांचा उघड पुरस्कार करण्यास फारसे कोणी धजले नाहींत. मुंबईचे काणे, बदलापूरचे चापेकर, केसरीकार यांनीं त्या ग्रंथावर प्रतिकूल मत प्रगट केलें. तथापि नारायणशास्त्री मराठे यांनी आपली सहानुभूति दाखविली. आणि नारायणशास्त्र्यांच्या शिष्यवर्गातून महादेवशास्त्री दिवेकर, लक्ष्मणशास्त्री जोशी, कोकजेशास्त्री इत्यादि सुधारक पंडित निर्माण झाले.

**सनातनी पंडित जागे झाले**

शुद्धि, अस्पृश्यता–निवारण इत्यादि चळवळींना जोर लागल्यामुळें सनातनी मंडळींत किंचित हालचाल सुरू झाली. सोनगीर येथें कुकुरमुंडेकर महाराजांच्या प्रयत्नानें सनातनी व सुधारक पंडितांची मोठी परिषद झाली आणि तेव्हांपासून या दोन पक्षांतील विचारभेद तीव्र होऊं लागले. अकोला, काशी येथील संमेलनानंतर परिवर्तनवादी पक्ष स्वतंत्र फुटून निघाला. यापुढें हे दोन्ही पक्ष एकत्र येण्याची आशा राहिली नाहीं. जुना पक्ष आपली जडता सोडण्यास तयार नाहीं. वचनप्रामाण्याच्या बाहेर जाण्याची त्याची ताकद नाहीं. प्रगतीला या पक्षाचा मुळींच उपयोग नाहीं.

परिवर्तनवादी पक्षाने केवळ ग्रंथप्रामाण्याचा आग्रह सोडून दिला असून समाजाच्या धोरणाला आणि उत्कर्षाला आवश्यक असे नवीन आचार समाजाला सुचविण्याची हिंमत धरली आहे. मीमासक पद्धतीचा त्याग करून ऐतिहासिक पद्धतीचा स्वीकार केला आहे. मनुष्यमात्राच्या आत्यंतिक कल्याणाच्या दृष्टीनें समाजाचे सर्व व्यवहार चालले पाहिजेत अशी दृष्टि स्वीकारली आहे. केवळ रूढीचाच नव्हे तर समाजहिताला बाध आणणाऱ्या कोणत्याहि शास्त्रवचनाचादेखील अनादर करावयाचा असें आपलें धोरण आंखलें आहे. भावना आणि तर्क या द्विविध प्रकारच्या बुद्धीनें समाजधर्माचा शोध केला पाहिजे, असा आपला विश्वास प्रकट केला आहे. शुद्धबुद्धीनें केलेल्या आचारानें पारलौकिक हितहि साधलें जातें अशी इहपराची सोय लावली आहे.

या सर्व कारणांमुळें धर्मविचाराला जिवंतपणा येऊन सामाजिक जडता नाहींशी होईल व सामान्य जनतेला धर्मभावनेच्या द्वारानेंच आपला अभ्युदय साधतां येईल.

# युगधर्माची हांक

## समतेसाठीं अखंड संग्राम

मनुष्य समाजामध्यें समता प्रस्थापित करण्यासाठीं अखंड संग्राम चालू आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला संपूर्ण न्याय मिळेपर्यंत तो चालू राहील. हा झगडा फार मोठा असल्यामुळें सुधारकानें कधीं निराश होतां कामा नये. मानवी आत्म्याला समतेचीं, पूर्णतेचीं अनेक स्वप्नें दिसलेलीं आहेत. कांहीं निःस्वार्थी महानुभावांनीं आपल्या सुखाची पर्वा न करतां त्या स्वप्नांना मूर्तरूप देण्यासाठीं अनेकदां आपलें बलिदान दिलें आहे. तथापि सर्व समाजाला अद्यापि समतेचा अनुभव मिळालेला नाहीं. धर्म समतेचा विरोधी असूं शकणार नाहीं. व्यक्तींना समतेच्या मार्गावर पुढें पुढें नेण्याचें कार्य धर्माचें आहे. हें कार्य ज्या धर्माच्या हातून होणार नाहीं तो धर्म जडस्वरूप होईल. हिंदुधर्माचा विचार करतांना आजच्या समाजस्थितीचा अथवा रूढ आचारधर्माचा केवळ विचार करून चालणार नाहीं. हिंदूधर्माचीं मूलतत्त्वें आणि त्यांतील थोर ऋषिमुनींचा आणि साधुसंतांचा आचार हीं देखील पाहिलीं पाहिजेत. हीं पाहिलीं असता अद्वैत आणि भक्ति हीं दोनच हिंदुधर्माचीं आद्य तत्त्वें आहेत आणि सर्व थोर पुरुषांनीं याचाच पुरस्कार केलला आहे असें आढळून येईल. सामाजिक भेदांतून आत्मिक अद्वैतापर्यंत पोंचण्याचा मार्ग बराच अवघड आहे. यामुळें काळाकाळाला सामाजिक संस्थांचें परिवर्तन करण्याची आवश्यकता उत्पन्न होते. हिंदुधर्मानें या परिवर्तनाला तात्त्विक विरोध केला आहे असें म्हणतां येणार नाहीं. ब्राह्मणांच्या श्रेष्ठपणाशीं झगडा करून क्षत्रियांनीं अध्यात्मविद्येंतील आपला अधिकार उपनिषत्कालींच प्रस्थापित केला. उपनिषत्कार ब्रह्मर्षीनीं याला मान्यता दिली. त्रैवर्णिकांचें श्रुतिभांडार फोडून ' स्त्री, शूद्र, द्विजबंधू 'ना भारतासारखे ग्रंथ रचून संस्कृतीचा मार्ग दाखविण्यात आला. वैदिक धर्माच्या विषमतेशीं भागवतधर्मानें प्रेमाचा झगडा करून ब्रह्मज्ञान अंत्यजादि ' पापयोनी 'पर्यंत

आणून सोडलें. मध्ययुगांतील संतमहंतानी कर्मठ ब्राह्मणांच्या हेकट संस्कृतीविरुद्ध बंड करून सर्व ज्ञान मातृभाषेंत आणिलें आणि लोकांना भक्तिमार्गाची सुलभ उपासना सांगितली. ज्ञानेश्वरासारख्यांनीं अध्यात्माच्या भूमीवर ‘ एथ भक्ति सरे जाति अप्रमाण ’ अशी घोषणा केली.

### आजच्या पिढीचा धर्म

सामाजिक समता हा आधुनिक युगाचा विशेष धर्म आहे. साधुसंतानीं समतेचें निशाण अध्यात्म क्षेत्रांत कायम केलें. आधुनिक काळांतील रानडे, भांडारकर, राजा राममोहनराय, दयानंद, विवेकानंद यांसारख्या धर्मसुधारकांनीं तें निशाण सामाजिक क्षेत्रांत आणून उभविलें. गेल्या शंभरदीडशें वर्षांच्या भारतीय इतिहासांत या निशाणाखालीं एकूण एक विचारवंत वीर गोळा झाले आहेत. ही समताप्रस्थापनाची चळवळ राजकीय, आर्थिक आणि सामाजिक अशा समाजाच्या सर्व क्षेत्रांत सिध्द करणें हा आजच्या पिढीचा धर्म बनला आहे. या धर्माला महात्मा गांधींनीं मोठें भव्य स्वरूप आणून दिलें आहे. हा धर्म संपूर्ण यशस्वी होण्यासाठीं श्रद्धेनें झगडणें इतकेंच अवश्य आहे. समतेची ही मोठी जळवळ सुरू झाल्यापासून जड बनलेल्या समाजांत नवीन चैतन्य खेळूं लागलें आहे. आजपर्यंत प्रतिष्ठितपणा ज्यांनीं मिरविला त्यांना या नवीन चळवळीचें भय वाटत असून ते अनेक प्रकारच्या भल्याबुऱ्या साधनांनीं प्रतिकार करूं पहात आहेत. तथापि जागृत होत असलेला समाज यामुळें अधिकच लवकर जागा होईल.

आजच्या या युगधर्माच्या हांकेला हिंदुधर्माची साथच आहे. अद्वैताचें स्वप्न सामाजिक क्षेत्रांत मूर्तरूप घेतांना पाहून सर्व साधुसंतांना समाधानच वाटेल. या झगड्यांत अहिंसा-धर्माचें आचरण करणें म्हणजेच भक्तितत्त्वाचें अनुसरण होय.

---

# व्यासांचा आक्रोश !

" ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति मांम् ।
धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ॥ " –महाभारत.

समाजाच्या प्रारंभापासून आदर्शभूत समाजाची रचना कोणत्या प्रकारें करतां येईल याचीं स्वप्नें समाजांतील प्रतिभावंत पुरुषांना सतत पडत आलेलीं आहेत. कवींनी आदर्शाचीं चित्रें रेखाटलीं. सुधारकांनीं आदर्शाकडे नेणारे आचार दाखविले, वीरांनीं आदर्शाच्या मूर्ततेसाठीं आपल्या प्राणांचेंहि बलिदान केलें, तथापि आदर्श अद्यापि प्रत्यक्षपासुन अतिशय दूरच–कल्पनेच्या अंतरालांतच राहिले आहेत !

भारतीय संस्कृतींतील रामायण व महाभारत या प्रमुख आर्ष काव्यांत जीवनाचे दोन आदर्श दाखविलेले आहेत. व्यक्तिशः आदर्शमानव चित्रित करण्यासाठीं रामायणांत वाल्मीकीची प्रतिभा खर्ची पडलेली आहे; आणि महाभारतांत आपलें बुद्धिसर्वस्व वेंचून व्यासांनीं जीवनाचा सामाजिक आदर्श उभा केला आहे. वस्तुतः या दोनहि आदर्शांचा परस्पर दृढ संबंध आहे. कारण, आदर्शभूत समाजाच्या निर्मितीसाठीं जरी असामान्य व्यक्तींची आवश्यकता असली तरी आदर्शसमाजांतच आदर्शमानवहि निर्माण होणें शक्य आहे. यामुळें समाजाचे सर्व व्यवहार आदर्शजीवन निर्माण करण्याच्या दृष्टीनें कसे चालवावे याची, म्हणजे आदर्शाच्या व्यावहारिक साधनेचीच मुख्य गरज आहे.

व्यवहारांतील नित्याचे व महत्त्वाचे प्रश्न म्हटले म्हणजे अर्थ व काम हेच होत. मानवी जीवनाच्या पूर्णतेला भारतीय ऋषींनीं ' मोक्ष ' असा शब्द वापरलेला आहे. जीवनाचें प्रत्यक्ष स्वरूप अर्थकाममय असून त्याचें परोक्ष स्वरूप मोक्षमय–आनंदमय आहे. जीवनाच्या या प्रत्यक्ष व परोक्ष स्वरूपांत जरी कांहीं विरोध भासला तरी वैर नाहीं, अशी भारतीय द्रष्टयांची व समाजसुधारकांची परंपरागत समजूत आहे; आणि अर्थ–काम

व मोक्ष या द्विविध अंगांचें साधन म्हणून त्यांनीं धर्म या एकाच साधनाचा पुरस्कार केला आहे. ' धर्म ' या शब्दानें जीवनाच्या सर्वांगीण साधनेचा बोध होतो. प्रस्तुत लेखाच्या प्रारंभीं उद्धृत केलेल्या महाभारतातील प्रसिद्ध श्लोकांतहि ' धर्म ' शब्दाचा असाच अर्थ सूचित केलेला आहे. धर्मसाधनेनें मोक्षसिद्धि होते याविषयीं कधींच कोणी संशय प्रकट केलेला नाहीं. तथापि अर्थ-कामांची जी सिद्धि धर्माचरणानें होते तीविषयीं पुष्कळ मतभेद दर्शविला जातो. परंतु भारतीय विचारपद्धतींत धर्मापासूनच अर्थ-कामाची सिद्धता होतो हा सिध्दान्त सर्वमान्य गणण्यांत आलेला आहे. ' धर्म ' म्हणजे ' न्याय ' असें लक्ष्यात ठेविलें तर भारतीयाचा वरील सिद्धान्त जवळजवळ जगन्मान्य आहे असें आढळून येईल. समाजांतील व्यवहार सर्वांच्या सुखाचे जर कधीकाळीं व्हावयाचे असतील, तर त्या सर्व व्यवहारांचा पाया न्यायबुद्धि हाच व्हावा लागेल. सुख व न्याय यांच्यामध्यें तत्त्वतः विरोध नाहीं. परंतु सुखाचें स्वरूप जेव्हां संकुचित होतें त्यावेळीं त्या संकुचित सुखाचा, म्हणजेच स्वार्थाचा न्यायाशी विरोध येतो. सर्वांचें सर्व काल टिकणारें सुख हें खरोखर न्यायाशीं अविरोधी आहे इतकेंच नाहीं, तर न्यायाचा तो केवळ परिपाकच आहे. पण सामाजिक इतिहास पाहिला असतां समाजांत ही न्यायनिष्ठा अद्यापि दृढपणें रुजलेली दिसून येत नाहीं. त्यामुळें व्यासांसारख्या ज्ञानी व ' सर्वभूतहिते रताः ' अशा थोर पुरुषांना दुःखाचा आक्रोश करावा लागलेला आहे.

साऱ्या महाभारताचें निरीक्षण केलें असतां व्यासांचा हा आक्रोश किती यथार्थ होता हें सहज दृष्टीस पडतें. धर्मसंस्थापनेकरितां प्रतिज्ञेनें अवतीर्ण झालेल्या भगवान् श्रीकृष्णांच्या चारित्र्याचा प्रत्यक्ष परिणाम आपणांस समाजसाफल्याच्या दृष्टीनें काय झालेला दिसतो ? ज्या यादवांच्या कुळात श्रीकृष्णांचा जन्म झाला ते लोक त्यांच्या डोळ्यांदेखत मदिरामत्त होऊन नाश पावले. ' यादवी ' हा शब्दच त्यांचें स्मारक आहे ! पितामह भीष्मांनीं आपल्या वैयक्तिक सुखजीवनाचा आत्यंतिक होम करून जी कुलसेवा केली तिचें फल म्हणूनच कीं काय, त्यांना आपल्या कुलाचा सर्वतोपरीं विनाश झालेला पाहावा लागला; आणि विदुरासारख्या स्थितप्रज्ञ,

ज्ञानी संताला आपला उपदेश निरर्थक होत आहे म्हणून जगत्कल्याणाची इच्छा असतांहि जागच्या जागीं हळहळत बसावें लागलें! स्वतः 'महाभारत'कार व्यासांचे शेवटचे तळमळीचे उद्गार आरंभीं दिलेच आहेत.

तथापि भारतीय विचारवंतांनाच हा अनुभव आलेला आहे असें नाहीं. युरोपीय संस्कृतीच्या अग्रभागीं चमकणारे सॉक्रेटिस व प्लेटो यांचीहि कथा अशीच आहे. जीवनाचें सौख्य विचाराच्या शुद्धतेवर अवलंबून आहे असें आग्रहानें प्रतिपादन केल्याबद्दल सॉक्रेटिसला विषाचा पेला प्यावा लागला! प्लेटोची कहाणी तर याहूनहि करुणाजनक आहे. प्लेटो हा पाश्चात्य संस्कृतीचा आद्य आचार्य होय. सामाजिक जीवनाचा संपूर्ण आदर्श आपल्या विशाल प्रतिभेनें निर्माण करून आपल्या 'रिपब्लिक' या सर्वश्रेष्ठ ग्रंथाच्या द्वारें त्यानें त्या काळच्या जगापुढें ठेविला. "जीवनाचें परमसत्य जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषांच्या हातींच समाजाचें शासनसूत्र असावें," या त्याच्या सिद्धान्ताला आजहि जग मान डोलवीत आहे.परंतु त्याचा स्वतःचा अनुभव किती शोचनीय! तत्त्वज्ञानें राजा होण्यापेक्षां राजानें तत्त्वज्ञ होणें सुलभ होईल, या कल्पनेनें त्यानें सिराक्यूजच्या राजाच्या निमंत्रणावरून त्याला प्रथम शिष्य म्हणून स्वीकारिलें. परंतु राजाला तत्त्वज्ञ होणें गैरसोयीचें आहे असें आढळून आल्यामुळें त्यानें या प्रसिद्ध जीवनाचार्याला गुलाम म्हणून विकून टाकिलें! तेथून कोणातरी मित्राच्या दयाळूपणामुळें बिचारा कसातरी प्राण बचावून स्वदेशी परत आला.

प्राचीन चीन देशाचा प्रसिद्ध ज्ञानी पुरुष कान्-फू-त्से यानेहि समाजधारणेचें संपूर्ण दर्शन बनविलें होतें. कोणातरी राजपुत्रानें आपलें शिष्यत्व पत्करावें म्हणजे आपण आपल्या दर्शनानुसार चीनचें जीवन घडवून दाखवूं अशी त्याला मोठी उमेद होती. पण त्याच्या वेळचे राजे आपसांत प्राणघातक युद्धें करण्यांत इतके गुंतलेले होते कीं, त्यांना कान-फू त्सेकडे लक्ष देण्यासहि सवड मिळाली नाहीं. मरणकालीं त्याच्या शिष्यांनीं आपली अंतःकाळची काय इच्छा राहिली आहे?" असें त्यास विचारिलें असतां "माझ्या दर्शनाचा प्रयोग करण्यासाठीं संधि देणारा राजपुत्र शेवटपर्यंत मला लाभला नाहीं, ही गोष्ट माझ्या हृदयाला फार लागून राहिली आहे!" असे त्यानें उद्गार काढिले असें सांगतात.

प्राचीन इराणी लोकांचा धर्मसंस्थापक जरदुष्ट्र याचीहि कथा अशीच मौजेची आहे. त्या महापुरुषाच्या ठायीं समाजसौख्याची दिव्य दृष्टि होती; आणि प्लेटो-कानू-फू—त्सेप्रमाणें त्यालाहि एखाद्या राजाचें गुरुत्व करण्याची पुष्कळ दिवस महत्त्वाकांक्षा होती. एका राजाला निरुपायास्तव जरदुष्ट्राचा शिष्य व्हावें लागलें. राजाचे घोडे आकस्मिकपणें आजारी पडले, आणि जरदुष्ट्राला अश्वविद्या अवगत असल्यामुळें त्यानें ही संधि साधून आपलें गुरुत्त्व त्याच्यावर लादलें. या घटनेमधून काय निर्माण झालें असेल याची सहज कल्पना येईल.

आधुनिक युरोपांतील 'युटोपिया' ('आदर्शसमाज') या ग्रंथाचा कर्ता सर टॉमस् मूर याला राजाच्या हाती मरावें लागलें, आणि त्याच्या ग्रंथनामावरून 'युटोपियन' असें एक अवहेलनादर्शक विशेषण इंग्रजी भाषेंत रूढ झालें!

आदर्शवाद्यांची ही नामावली हवी तेवढी लांबवितां येईल. जगांतील सर्व साधुसंत मनुष्यांनीं धर्मशील बनावें म्हणून अत्यंत कळकळीनें सतत सांगत आलेलेच आहेत. ख्रिस्ताचा किंवा बुद्धाचा उपदेश संन्यासवादाचा होता अशी पुष्कळ लोकांची समजूत आहे तथापि त्यांच्या उपदेशाचें प्रत्यक्ष अवलोकन केलें असतां ही समजूत बरोबर नाहीं असें म्हणावें लागतें. ख्रिस्ताचें ' Kingdom of Heaven ' म्हणजे ' Kingdom of Righteousness ' होय, ही गोष्ट त्यानें स्पष्ट शब्दांत सांगितली आहे. म्हणजे, त्याचें ' स्वर्गीय राज्य ' हें ' धर्मराज्य 'च होतें. " तुम्ही धर्मानें, न्यायानें वागा, म्हणजे तुम्हांला जीवनाचीं ऐहिक सुखेंहि सहज मिळतील, " हाच त्याचा मुख्य संदेश होता. हा सिध्दान्त प्रथमारंभीं सांगितलेल्या भारतीय सिध्दान्ताशीं तंतोतंत जुळणारा असाच आहे. परंतु या सिध्दान्ताकरितां येशू ख्रिस्ताला वधस्तंभावर चढावें लागलें! गौतम बुध्दानें उपदेशिलेला अष्टांगमार्गहि केवळ संन्यासजीवनालाच उपयोगी आहे असें म्हणतां येणार नाहीं. सामाजिक जीवनाचाहि तोच आधार आहे हें उघड आहे. वैशालीच्या वज्जी लोकांना त्यानें जे सात प्रसिध्द नियम सांगितले होते ते समाजांत धर्मराज्य प्रस्थापित करण्याचें साधन म्हणूनच त्यानें उपदेशिले आहेत.

इस्लामी धर्मसंस्थापक महमद पैगंबर व यहुदी धर्माचार्य मोझेस हे दोघेहि महापुरुष कर्मयोगीच होते. त्यांनीं अनुक्रमें अरब व इस्रायल जातींच्या लोकांची सामाजिक संघटनाच मुख्यत्वें घडवून आणिली. तथापि त्या दोघांनीहि आपल्या सामाजिक आदर्शांच्या सिध्दीसाठीं धर्मसाधनेचाच उपदेश केलेला आहे. यामुळें धर्म हेंच अर्थकाम–सिध्दीचें एकमेव साधन होय या व्यासांच्या सिद्धान्ताला सार्वत्रिक मान्यता आहे असें दिसून येतें. परंतु असें असतांहि प्रत्यक्ष व्यवहारांत धर्मबुद्धीनें आचरण करणाऱ्यांचा वर्ग अद्यापि अतिशय अल्पच दिसून येतो. सामाजिक सुधारणेच्या दृष्टीनें ही एक गूढ घटना समजली पाहिजे.

आधुनिक युगांतील समाजसुधारकांचे प्रयत्न पाहिले असतां आपणांला हें गूढ अद्यापि उकललें आहे असें दिसत नाहीं. आधुनिक काळांत न्यायप्रस्थापनेसाठीं राजकीय, आर्थिक, शैक्षणिक इत्यादि विविध क्षेत्रांत अनेक क्रांतिकारक प्रयोग झाले आहेत. या नानाविध प्रयोगांत इतर कितीहि भेद दिसले तरी सामाजिक व्यवहार न्यायबुद्धीवर आधारले तरच सर्व समाजाला सुख व समाधान यांची प्राप्ति होऊं शकेल, हा सिद्धान्त सर्वत्र सारखाच गृहीत केलेला आढळून येतो. तथापि या प्रयत्नांनाहि कोठेंच म्हणण्यासारखें यश आलेलें दिसत नाहीं. या प्रयोगकर्त्यांचाहि व्यासांसारखाच आक्रोश आढळतो!

मनुष्य हा बुद्धिवादी प्राणी आहे आणि त्याच्या बुद्धीला सत्य जाणण्याची शक्ति आहे, ही कल्पना फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. “ ज्ञान हाच मनुष्याचा अलंकार होय, ” असें आपल्याकडे मानीत असत; आणि “ ज्ञान हाच सद्गुण होय, ” असा सॉक्रेटिसाचा सिद्धान्त होता. आधुनिक काळांत पाश्चात्त्य देशांत बुद्धिपूजेचें पुनरुज्जीवन मोठ्या उत्साहानें करण्यांत आलें; परंतु या बुद्धिपूजकांची श्रद्धा प्रत्यक्ष व्यवहारांत बहुतांशीं विफल ठरलेली सध्या दिसत आहे! प्रख्यात इंग्लिश लेखक जॉर्ज बर्नार्ड शॉ याचा अनुभव मोठा उद्बोधक आहे. बुद्धिवादी इंग्लंडमध्यें वाढलेल्या या प्रतिभाशाली पुरुषाला तरुणपणीं असें वाटलें कीं समाजांतील सर्व वर्गांत पुरेसें ज्ञान पसरविलें म्हणजे सर्व प्रकारचे अन्याय व विषमता आपोआप कोसळून पडतील. म्हणून वाणी व लेखणी यांच्या

साह्यानें शॉनें इंग्लंडांतील अखिल जनतेवर ज्ञानाचा मुसळधार पाऊस पाडला. तथापि समाजाची क्रियाशून्यता कमी होत नाहीं असें त्याला दिसून आलें! व्याख्यानें–प्रवचनें ऐकण्याकडे अथवा निबंध–प्रबंध वाचण्याकडे लोकांची प्रवृत्ति विशेष नसून रंगभूमीकडे त्यांची धाव असते, असें त्याला आढळून आल्याबरोबर त्यानें आपल्या मतांचा प्रचार करण्यासाठीं रंगकलेचा आश्रय केला, आणि करमणुकीसाठीं जमणाऱ्या सर्व स्त्रीशूद्रांना ‘ज्ञानी’ करून सोडण्याचें त्यानें ठरविलें. परंतु या नव्या साधनाची उपासना दोन तपांहून अधिक काळ केल्यानंतरहि आपली इष्टसिद्धि झालेली शॉला आढळली नाहीं! शेवटीं निराश होऊन त्यानें “प्रचलित मानवप्राणी आदर्शसमाजनिर्मितीला स्वभावतःतच अपात्र आहे आणि आदर्शसमाजासाठीं ‘नवमानव,’ ‘अतिमानव’ निर्माण करण्याची योजना केली पाहिजे,” अशी मोठी नाट्यमय घोषणा केली! केवळ बुद्धिवादाच्या पराभवाची ही स्पष्ट कबूली आहे. माणसांमध्यें बुद्धीपेक्षां भावनांना व विकारांना अधिक प्राधान्य आहे, आणि तर्कबुद्धीला झालेलें ज्ञान माणसाच्या संकल्पशक्तीला जागृत करूं शकत नाहीं असा याचा निष्कर्ष आहे. अलीकडे पाश्चात्त्य विचारांत बुद्धिवादाविरुद्ध प्रतिक्रिया चालूं झालेली दिसते. मनुष्याच्या जीवनावर विकारांचें प्रभुत्व असतें, आणि त्याच्या बुद्धीवरहि विकारांचाच अंमल चालत असल्यामुळें बुद्धिवादाच्या नांवाखालीं सत्याचें विकृत दर्शनच पसरतें. ही गोष्ट पुष्कळ विचारवंतांच्या ध्यानीं येऊं लागली आहे. माणसाला स्वतःच्या सुखाची इच्छा असली तरी त्याच्या सामान्य प्रेरणा बहुधा बुद्धिविरोधी व बहुतांशीं दुःखनिर्मितीलाच कारण होत असतात, असे विचार कित्येक लेखकांनीं व्यक्त केले आहेत. उदाहरणार्थ, बर्ट्रँड रसेल यांनी आपल्या विविध ग्रंथांतून सुखी समाज निर्माण करण्याच्या अनेक कल्पनांचा ऊहापोह केलेला आहे; परंतु शेवटीं शेवटी त्यानीं हताश होऊन “मनुष्य हा स्वतःच आपल्या विनाशाची योजना करणारा प्राणी आहे,” असे उद्गार काढले आहेत!

सामाजिक ध्येयवादाच्या वैफल्यपूर्ण इतिहासाची ही कहाणी कितीहि करुणाजनक असली, तरी मानवी अंतःकरणांतील पूर्णतेची ओढ मनुष्याला

कधींच संपूर्णतया निराश करूं शकणार नाहीं; आणि आजपर्यंतच्या प्रयोगवीरांना कितीहि अपयश आलेलें असलें तरी नवे प्रयोगवीर नव्या उत्साहानें पुढें आल्याशिवाय राहणार नाहींत. इतकेंच काय, पण प्रत्येक अपयश हें मनुष्याच्या ध्येयवादाला अधिकाधिक शुद्ध करीत जाईल. एकंदर सृष्टीच्या इतिहासांत मानवसंस्कृतीचा प्रयोग चालू झाल्याला अगदींच थोडा काळ लोटला आहे. सापेक्ष दृष्टीनें पाहतां मानवसमाज अद्यापि बाल्यावस्थेंतच आहे. आपल्या जीवनांतील आंतरिक प्रेरणांचें अद्यापि त्याला यथार्थ आकलन झालेलें नाहीं. यामुळें त्याला सुखाची इच्छा असूनहि सुखाचा मार्ग बरोबर दिसत नाहीं; आणि क्वचित् दिसला तरी त्याच्यावर स्थिरपणें पावलें टाकीत जाणें त्याला साधत नाहीं. मानवाच्या हृदयांत जी पूर्णतेची प्रेरणा आहे ती त्याच्या दैवी अंशाची द्योतक आहे. परंतु अद्यापि त्या दैवी अंशाची त्याच्या अखिल जीवनांत प्रभुता प्रस्थापित झालेली नाहीं। खलिल जिब्रॉ यानें आपल्या 'prophet' ('जीवनद्रष्टा') नामक ग्रंथामध्यें म्हटल्याप्रमाणें,

"Much in you is still man,
and much in you is not yet man,
But a shapeless pigmy, that
walks asleep in the mist,
searching for its own awakening."

मानवामध्ये अद्यापि अमानव अंशच मोठ्या प्रमाणांत वावरत आहे, आणि या अमानव अंशाला मानवतेचें स्वरूप घेण्यासाठीं अद्यापि दीर्घ तपस्येतून जावें लागणार आहे. "विधात्याच्या हातीं" रवींद्रनाथांनीं म्हटल्याप्रमाणें, "काल अनंत आहे. त्याला त्वरा नाहीं."

"प्रतीक्षा करिते जानो। शतवर्ष धरे
एकटि पुष्पेर कलि फुटाबार तरे
चेले तव धीर आयोजन।"

विधात्याला विकासासाठीं वाट पाहण्याची शक्ति असते. एक पुष्पकळी फुलविण्यासाठीं त्याची शेंकडों वर्षें धिम्मेपणानें तयारी चाललेली असते. पण माणसाला धीर नसतो. त्याला फळाचा आस्वाद घेण्याची आतुरता असते;

आणि त्यामुळें तो अत्याचारी व अश्रद्ध बनूं लागतो. ध्येयवादाला जर कशाचें भय असेल तर तें त्याच्या स्वतःच्याच हृदयांतील उतावळेपणाचें आहे. मानवी पूर्णतेचें कार्य हें कोणा एकाच व्यक्तीचें नाहीं. तें विधात्याचें विश्वकार्य आहे. तें यथाकालीं सफल झाल्याशिवाय राहणार नाहीं. ध्येयवादी पुरुषानें आपल्या हृदयांतील प्रेरणेशीं सत्यनिष्ठ राहून आपल्या शक्त्यनुसार स्वकर्तव्य बजाविलें म्हणजे त्याचें कार्य संपलें. तात्कालिक फलाच्या मोहानें त्यानें आपली श्रद्धा नासविणें बरें नाहीं. प्रस्तुत अर्थानेंच 'अनासक्तियोगा'चा उपदेश सर्व तत्त्वज्ञांनीं केलेला आहे.

न्याय व सुख यांचा जर तत्त्वतः अविरोध असेल, तर आज ना उद्यां सामाजिक जीवनांत या सिद्धान्ताची सर्वांना प्रतीति अवश्य झालीच पाहिजे. परंतु ही प्रतीति होण्यासाठीं समाजाला अनेक आघात सोसावे लागतील. त्याच्या हृदयांतील उन्मादी विकारांना विवेकांकित होण्याला अनेक आपत्तींतून कदाचित जावें लागेल. समाजांतील ज्ञानी व्यक्तींना समाजदुःखासंबंधीं कितीहि कळवळा वाटला तरी त्यांना अपेक्षित असलेली समाजव्यवस्था त्वरित मूर्त स्वरूपास येणार नाहीं. केवळ शाब्दिक उपदेशानें विशेष कार्य होणार नाहीं; इतकेंच काय, पण प्रत्यक्ष उदाहरणानेंहि ताबडतोब कांहीं मोठे बदल होण्याचा संभव नाहीं. तथापि ध्येयवादी लोकांच्या कृतीं-उक्तींमुळें समाजाच्या अंतर्मनावर शुभ संस्कार सतत होत राहतात, आणि शेवटीं त्यामुळेंच समाजाचा हृदयपालट घडून येणार आहे. समाजसुखासाठीं समाजशुद्धीची आवश्यकता आहे; आणि सामाजिक शुद्धीसाठीं समाजांत मंगल भावनांचें सतत आवाहन होण्याची आवश्यकता आहे. यासाठीं "बुडती हे जन न देखवे डोळां, म्हणोनी कळवळा" येणें हा जरी आवश्यक गुण असला तरी समाजहितासाठींसुद्धां "पिटून काढितों या लोकां," ही वृत्ति कधींहि उपकारक होणार नाहीं. कारण कोणत्याहि हिंसात्मक साधनांनीं समाजाच्या अंतर्मनाची शुद्धि घडून येत नाहीं; उलट, अहंकार व अविवेक यांनाच उसळी येते. हिंसा म्हणजे केवळ पाशवी शक्तीचा उपयोग, असा अर्थ समजण्याचें कारण नाहीं. नैतिक मूल्यांची श्रेष्ठता प्रतिपादितांना जर अवहेलना व असहिष्णुता यांचा अंगीकार केला गेला तर हिंसेचाच आश्रय होतो. यामुळें समाजशुद्धीच्या प्रयत्नांत दंडधारी

राजे, कर्मठ शास्त्रज्ञ अथवा उतावळे शस्त्रवीर सदा विफल होत आलेले आहेत; आणि अक्रोधानें क्रोधाचा, साधुतेनें असाधुतेचा अथवा अहिंसेनें हिंसेचा प्रतिकार करणाऱ्या प्रेमळ संतांनाच समाजाच्या मानसिक जीवनांत अढळ पद प्राप्त झालें आहे.

सामाजिक ध्येयवादाच्या इतिहासांत असा एक विरोधाभास नित्य आढळून आलेला आहे कीं, बुद्धिमान् व साधनसंपन्न असा वर्ग हळूहळू ध्येयजीवनापासून भ्रष्ट होत जातो. त्याची न्यायबुद्धि मलिन अथवा विकृत होऊं लागते, आणि त्याची जीवनश्रद्धाहि लोपते. परंतु बुद्धिहीन व साधनहीन सामान्य जनतेला ध्येयवादाचा आचार सर्वस्वी साधला नाहीं तरी तिच्या हृदयांत ध्येयवादी पुरुषांविषयीं भक्ति वास करीत असते; आणि सामाजिक सत्ययुगाच्या प्रतिष्ठापनेविषयींच्या श्रद्धेचा दीप कधींहि मालवत नाहीं. सामाजिक न्यायप्रस्थापनेवरच व्यावहारिक सुखाची निर्मिति अवलंबून असल्यामुळें सामान्य जनतेला ही श्रद्धा अपरिहार्यच आहे, हें सहज दिसून येण्यासारखें आहे.

प्रत्यक्ष जीवनांतील अर्थकामप्राप्ति व परोक्ष जीवनांतील मोक्षसिद्धि या दोनहि अंगांचें साधन धर्म हेंच आहे. कारण, प्रत्यक्ष व परोक्ष हीं एकाच जीवनाचीं दोन अंगें आहेत. तीं दोनहि अंगें तत्त्वतः अविरोधीच असलीं पाहिजेत. धर्माचें संशोधन व संस्थापन करणारे जीवनाचार्य मोक्षाच्या अंतरंगाकडे स्वभावतःच वळलेले असल्यामुळें त्याच्या बाबतींत धर्मसाधना ही निष्काम व निरपेक्ष जीवनवृत्ति झालेली असते. त्यातच त्यांना निरतिशय आनंदहि लाभत असतो. हा आनंद आपल्या बांधवानाहि उपलब्ध करून द्यावा अशी त्यांना सहजच तळमळ वाटूं लागते. सामान्य लोक आपल्या व्यावहारिक जीवनांतील अर्थकाम–विषयक प्रश्नांतच धडपडत असले, तरी त्यांना त्या प्रश्नांचा उलगडा करण्यासाठीं धर्माचा–न्यायाचा–आश्रयच करावा लागतो. यामुळें ते व्यावहारिक साधन म्हणून वरील जीवनाचार्यांच्या उपदेशाचा पुरस्कार करितात. तथापि अद्यापि संपूर्ण अहिंसेनें जीवनांतील सर्व व्यवहार सिद्ध करून दाखविणारा श्रेष्ठ जीवनाचार्य निर्माण व्हावयाचा आहे; आणि व्यवहाराचा मोक्षाशीं मेळ दाखवून देणारा धर्महि अद्यापि सिद्ध व्हावयाचा आहे.

सत्याग्रहाचा मार्ग हा या दृष्टीनें पाहतां संपूर्ण जीवन-धर्माचा एक महान् प्रयोग आहे, आणि म. गांधी हे या धर्माचे पहिले आचार्य आहेत, असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. लोकनायक अण्यांनीं महात्माजींना चालू सत्याग्रह-संघर्षाच्या प्रारंभीं व्यासांचा वरील श्लोक म्हणून दाखविला होता, आणि अहिंसाधर्माची विफलता सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता. म. गांधींनीं त्यावर दिलेलें उत्तर खऱ्या ध्येयवाद्यांनीं हृदयाशीं जतन करून ठेवण्यासारखें आहे: "अर्थकाम मिळवून देणाऱ्या धर्माचें लोक कां बरें सेवन करीत नाहींत?" या व्यासांच्या उद्गारावरून धर्मवादाची आवश्यकताच सिद्ध होत आहे, आणि समाज-कल्याणाची चिंता वाहणाऱ्याचें धर्मालाच चिकटून राहिलें पाहिजे, असा म. गांधींनीं व्यासांच्या आक्रोशाचा अर्थ केला आहे. आदर्शसमाज निर्माण करणाऱ्या प्रत्येक ध्येयनिष्ठ साधकानें याच विचारानें आपली श्रद्धा जिवंत राखिली पाहिजे, आणि आपापल्या क्षेत्रांत ध्येयशुद्धीसाठीं मरण पत्करण्यासहि सिद्ध झालें पाहिजे. कारण, असा ध्येयवादी प्रयत्न बाह्यतः अपेशी दिसला तरी त्याच्याच अंगीं जीवनाला अंतिम यशाकडे नेण्याची शक्ति आहे.



## आमच्याकडे एजन्सीनें असलेलीं पुस्तकें

| | |
|---|---|
| विद्यार्थ्यांचें साम्राज्य--न. ल. आठवले | २-०-० |
| गांधीजींचीं पत्रें—म. गांधी | ०-६-० |
| काँग्रेसकथा—गो. आ. देशपांडे | ०-८-० |
| दरबार गोपाळदास—ह. मो. जोशी | ०-२-० |
| हिंदी चष्म्यांतून दिसणारा रशिया—मसाणी | ०-६-० |
| विवाहसंस्थेचा इतिहास--डॉ. किर्लोस्कर | ०-८-० |
| हिंदी कारखान्यांतील स्त्रिया व मुलें | ०-३-६ |
| राष्ट्रसंवर्धक कार्यक्रम—वाळुभाई मेहता | १-४-० |
| गांधींचा अहिंसावाद—त्र्यं. र. देवगिरीकर | २-८-० |
| लोकमाता—आचार्य काका कालेलकर | ०-१२-० |
| काम आणि कामिनी--प्रेमा कंटक | २-८-० |
| पुरोगामी साहित्य—आचार्य जावडेकर | २-०-० |
| जीवनयोग—ना. ग. जोशी | ०-१२-० |
| पाकिस्तान—अॅड्. ग. वा. जोशी | १-०-० |
| गीताहृदय—साने गुरुजी | ०-८-० |
| विनोबाजी भावे—साने गुरुजी | १-०-० |
| देशबंधु दास—साने गुरुजी | ०-१४-० |
| स्वराज्यसंस्थापक श्रीशिवराय—साने गुरुजी | ०-४-० |

आचार्य विनोबा भावे, आचार्य जावडेकर व श्री. साने गुरुजी
यांचें समग्र वाङ्मय

---

**सर्व प्रकारच्या राष्ट्रीय पुस्तकांकरितां प्रथम आमचेकडे चौकशी करा.**

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : : १२ टिळक रोड, पुणें २**